# गडकऱ्यांचें अंतरंग

रा. श्रं. वाळिंबे

.....चित्रशाळा प्रकाशन, पुणें २......

# गडकऱ्यांचें अंतरंग

गडकऱ्यांच्या कवितांचे रसोद्ग्राही
विवेचन

लेखक
प्रा. रा. शं. वाळिंबे, एम्. ए.

---

चित्रशाळा प्रकाशन पुणें

# प्रस्तावना

प्रस्तुत पुस्तकाचा विषय गेलीं निदान दहा वर्षे तरी माझ्या मनात सतत घोळत होता. गेल्या वर्षी **साहित्यांतील संप्रदाय** या माझ्या ग्रंथासाठी ' महाराष्ट्रातील स्वच्छंदवाद ' हा भाग लिहीत असता गडकऱ्याच्या वाङ्मयाचें विवेचन करणे अगत्याचे झाले. परतु तेथे मला तें विवेचन विस्ताराने करता येणें शक्यच नव्हते. यामुळे गडकऱ्याच्या काव्याचें सपूर्ण व सागोपाग विवेचन करण्याची इच्छा तृप्त करण्यासाठी मला हें स्वतंत्र पुस्तक लिहावें लागलें.

वाग्वैजयंतीत समाविष्ट झालेल्या गडकऱ्याच्या कवितामधील आशय स्पष्ट करून व त्याचे मर्म उकलून दाखवून त्यायोगे खुद्द गडकऱ्याच्या व्यक्तित्वातील अत्यंत महत्त्वाचीं वैशिष्टये विशद करणे हा माझ्या विवेचनाचा सर्वात प्रधान हेतु आहे. हा हेतु साधावा यासाठी त्याच्या काहीं अप्रकाशित कविता व नाटके याची मीं भरपूर मदत घेतलेली आहे. तथापि गडकऱ्याच्या नाटकाची समग्र चर्चा करणे हा माझा मुळीच उद्देश नाही. माझ्या विवेचनाला ज्यायोगे पुष्टि मिळेल व माझे म्हणणे ज्यायोगें अधिक स्पष्ट होईल इतकाच त्याच्या नाटकातील भाग मीं आधारादाखल घेतलेला आहे.

अर्थात्, या पुस्तकात मीं मुख्यत्वेंकरून आस्वादपद्धतीचा किंवा रसोद्ग्राही टीकापद्धतीचा सर्वत्र अवलंब केलेला आहे. गडकऱ्यांच्या कवनाचें रसग्रहण करून त्यांच्या आधारें त्यांच्या व्यक्तित्वाचें दर्शन घडविणें हाच हेतु याच्या मुळाशीं आहे. या हेतूच्या सिद्धीसाठी ज्या इतर साधनाचा उपयोग करणें आवश्यक वाटले त्याचा समुचित उपयोग त्या त्या ठिकाणीं मीं करून घेतला आहे.

गडकऱ्याच्या चरित्रातील सर्वांना ज्ञात असलेल्या गोष्टींच्या आधाराने मीं प्रथम त्याच्या कविताचा तपशीलवार अभ्यास केला. परंतु विशिष्ट मर्यादेपलीकडे या पद्धतीचा उपयोग होईना. कारण माझ्या विवेचनाला उपयोगी पडेल अशी फार थोडी माहिती मला त्याच्या उपलब्ध चरित्रातून मिळाली. त्याच्या अनेक महत्त्वाच्या कविताचें मर्म जिच्यायोगें सहज विशद करता येईल अशा साधार व अधिकृत माहितीची उणीव मला पदोपदीं जाणवूं लागली. माझ्या मनात काही तर्क प्रबळ होऊ लागले होते व त्याना सिद्धाताचें स्वरूपहि येऊं लागले होते. तथापि गडकऱ्यांच्या चरित्रातील अपुऱ्या माहितीच्या आधारावर हे सिद्धात प्रस्थापित करण्याचा प्रयत्न करून पाहावा एवढाहि धीर मला होईना. पण गडकऱ्याचीं बहुतेक सर्व महत्त्वाचीं प्रेमगीते आत्मचरित्रात्मकच आहेत या विचाराने माझ्या मनावर जें विलक्षण वर्चस्व गाजविले होतें तें मुळीच कमी होईना. अखेर, ज्या कवितांत गडकऱ्यानी आत्माविष्करण अगदी स्पष्टपणे व प्रामाणिकपणे केले आहे अशी माझी खात्री झालेली होती त्याचा निराळ्या दृष्टीने पुन्हा अगदी सूक्ष्म अभ्यास करून त्याच्या भावजीवनाच्या कहाणींतील महत्त्वाचे दुवे मी जुळवूं लागलो. आणि माझ्या अपेक्षेप्रमाणें अत्यत सुसंगत अशी ही कहाणी तयार झाली. आपल्या प्रेमगीतामध्ये गडकऱ्यानी आपल्या मनातील साऱ्या भावनाचा अगदी प्रामाणिकपणाने व मनमोकळेपणाने आविष्कार केलेला आहे असा माझा सिद्धात आहे. निराळ्या भाषेंत सागावयाचे झालें तर प्रेमाच्या क्षेत्रात गडकऱ्याना स्वतःला जे अनुभव साक्षात् आले त्याचाच इतिहास त्याच्या अनेक प्रेमगीतात समाविष्ट झालेला आहे.

या बाबतींत जे तर्क केवळ गडकऱ्यांच्या कवितांच्या आधारानेच माझ्या मनात रुजलेले होते (व जे अगदी खरे आहेत असा माझा दृढ विश्वास होता,) ते पडताळून पाहण्यासाठी मीं अनेक व्यक्तींच्या भेटी (अनेक वेळा) घेतल्या. गडकऱ्याना पूर्ण ओळखणाऱ्या व त्यांच्या सहवासात काही दिवस राहिलेल्या काही प्रसिद्ध लोकाशीं मीं कित्येक तास चर्चा केली. ज्या ज्या ठिकाणाहून विशेष काही माहिती मिळण्याची शक्यता होती त्या त्या ठिकाणाहून मी ती चौकसपणे गोळा केली. ही जी माहिती मला मिळाली तिच्या योगाने माझे सारे तर्क अगदी बलवत्तर झाले व ते सिद्धांतरूपाने मांडावयाचा मला धीर आला. गडकऱ्यांच्या अगदी खाजगी जीवनातील अत्यंत नाजूक अशी जी माहिती मला उपलब्ध झाली तिचा जरूर तेवढाच उपयोग मी करून घेतलेला आहे. गडकऱ्यांचें साधार चरित्र लिहावें हा माझा हेतु नसून त्यांच्या कवितांत प्रकट झालेल्या त्यांच्या व्यक्तित्वाचें मर्म विशद करून सांगावे हाच माझा एकमेव हेतु आहे. यासाठी त्यांच्या कविता हाच माझा सर्वांत महत्त्वाचा आधार. हा आधार अधिक मजबूत व्हावा यासाठी त्यांच्या खाजगी जीवनातील मला कळलेल्या काही घटनांचा मीं यथायोग्य उपयोग केला आहे इतकेंच. पुढे मागे गडकऱ्यांचें विस्तृत व अधिकृत चरित्र कोणा महाभागाने प्रसिद्ध केल्यास या पुस्तकात मीं मांडलेले सिद्धांत व गडकऱ्यांच्या प्रेमकहाणीचें मीं केलेले विवेचन या गोष्टी पडताळून पाहता येतील.

हें पुस्तक लिहीत असता व हस्तलिखित तयार झाल्यावर तें छापून पूर्ण होईपर्यंत मला अनेक व्यक्तींची फार मोलाची मदत झालेली आहे. त्या सर्वांचा मी कायमचा ऋणी आहें. विशेषतः श्री. त्र्य. सी. (अण्णासाहेब) कारखानीस, प्रा. राजे, प्रा. पाटणकर, श्री बाळाराम देशपांडे याना मीं या पुस्तकाच्या निमित्ताने भारीच तकलीफ दिली. या सर्वांनी ती उदार अंतःकरणान सहन केली हा त्यांचा मोठेपणा होय. गडकऱ्यांचे अगदी निकटचे आप्त श्री. बाळाराम देशपांडे यांचा किती वेळ मीं घेतला असेल त्याचा हिशेबच करता येणार नाही. पुस्तकाचे हस्तलिखित करीत असता

एस्. पी. कॉलेजांतील माझा विद्यार्थी स. ह. परांजपे याने मला खूपच मदत केली.

चित्रशाळा प्रकाशनविभागाचे प्रमुख, माझे मित्र, श्री. दा. पा रानडे यांचें मला पहिल्यापासून हार्दिक उत्तेजन नसतें तर हें पुस्तक इतक्या त्वरेने पूर्ण होणेंच शक्य नव्हतें. आर्यसंस्कृति छापखान्याचे व्यवस्थापक श्री. मधुकरराव चापेकर यानी छपाईच्या बाबतींत बहुमोल साहाय्य केलें. या सर्व सुहृदांचे मी मन:पूर्वक आभार मानतों.

या पुस्तकांत सर्वत्र महाराष्ट्र-साहित्य-परिषदेने पुरस्कृत केलेल्या शुद्ध-लेखनाचा अवलंब केलेला आहे.

शेवटीं शुद्धिपत्र दिलें आहे. त्याप्रमाणें प्रथम दुरुस्त करून वाचावें अशी वाचकास विनंती आहे.

कॉमनवेल्थ कॉलनी, पुणें
१५ जुलै १९५१

रा. शं. वाळिंबे



# अनुक्रमणिका



प्रा रा. शं. वाळिंबे यांचे
टीकात्मक प्रबंध

१. साहित्याचा ध्रुवतारा
२. वाङ्मयीन टीका : शास्त्र आणि पद्धति
३. सुधाकर कीं एकच प्याला ?
४. मुक्तात्म्यापासून प्रमद्वरेपर्यंत
५. बालकवि
६. साहित्यांतील संप्रदाय
७. गडकऱ्यांचें अंतरंग

# गडकन्यांचें अंतरंग

O, world ! oh, life ! oh, time !
On whose last steps I climb
Trembling at that where I had stood before
When will return the glory of your prime ?
No more—O, never more !

Out of the day and night
A joy has taken flight,
Fresh spring, and summer, and winter hoar,
Move my faint heart with grief, but with delight
No more—O, never more !

—*Shelley*

# १. काळाच्या पायखुणा

गेल्या शतकाच्या पहिल्या चरणात फ्रान्समध्ये जो स्वच्छंदवादी ( रोमॅंटिक ) संप्रदाय उदयाला आला त्या संप्रदायाचा अध्वर्यु व्हिक्तोर ह्यूगो ज्या वर्षी दिवगत झाला त्याच वर्षी गडकऱ्यांचा जन्म झाला. नाट्याच्या व काव्याच्या क्षेत्रात ह्यूगोने अनेक अभिनव व त्या काळीं बंडखोर वाटणाऱ्या विचाराचा तत्त्वतः पुरस्कार केला आणि प्रत्यक्षात वापर केला. ' हर्नॅानि ' या प्रसिद्ध फ्रेंच रोमॅंटिक ट्रॅजेडीच्या कर्त्यामध्ये व गडकऱ्यामध्ये काही बाबतींत तरी फार मोठे साम्य आहे शब्दसृष्टीवर ह्यूगोचें असामान्य प्रभुत्व होतें; त्याच्या शैलींत अलकाराची पखरण झालेली आहे, एक प्रकारचा अवखळ उद्दामपणा हें त्याच्या शैलीचें वैशिष्ट्य आहे; त्याच्या भाषेच्या ढगदारपणाचा दिमाख काही अलौकिकच आहे. अनेक वेळां त्याचा उन्मत्त व स्वैर कल्पनाविलास वाचकाला बेभान करून सोडतो, आणि त्याच्या नवनवोन्मेषशालिनी प्रतिभेच्या विभ्रमाने त्याचें मन मोहरून जातें. आकाशातून सहस्रधारानी बरसात व्हावी त्याप्रमाणे त्याच्या वेचक व मोहक शब्दाची बरसात होत असते. स्वैर व तरल कल्पनाविलासाच्या साहाय्याने असामान्य सौंदर्याने निथळणारीं दृश्यें चित्रित करणारा ह्यूगो गतकाळातील गूढरम्य घटनांशीं तादात्म्य पावून त्या घटनांना मोहक आकार प्राप्त करून देण्याच्या कामात वाकबगार होता; त्याचप्रमाणें प्रणयसगीताच्या मधुर ध्वनींनी वाचकाच्या भावना आंदोलित करण्याच्या बाबतींतहि तो चतुर होता. मानवी मनांतील

संमिश्र स्वरूपाच्या भावनाचीं तरल आंदोलनें प्रकट करीत असतां होणारा त्याच्या प्रतिभेचा उन्मेष अत्यंत हृद्य असतो.

ह्यूगोच्या कलाविलासाचें वर जे वर्णन केलें आहे तें बरेंचसें गडकऱ्याच्या कलाविलासालाहि लागू आहे मराठी नाट्याच्या व काव्याच्या क्षेत्रात गडकऱ्यांनी ह्यूगोप्रमाणेच अनेक अभिनव गोष्टी करून दाखविल्या. ह्यूगोप्रमाणे गडकऱ्यानाहि स्वैर व उत्तुंग कल्पनाशक्तीची देणगी मिळालेली होती; आणि ह्यूगो ज्याप्रमाणे शब्दसृष्टीचा ईश्वर होता त्याप्रमाणे गडकरीहि शब्दसृष्टीचे ईश्वर होते. स्फूर्ति आणि प्रतिभा जणु ऋद्धिसिद्धींप्रमाणें त्याच्यावर चवऱ्या ढाळीत असत. मानवी मनातील गुतागुतीच्या भावनाचें आविष्करण करण्याच्या बाबतींत ते तरबेज होते, आणि संगीताच्या मधुर आलापाप्रमाणें धुद करणाऱ्या उन्मादक काव्यपंक्ति ते लीलेने लिहून जात असत.

१८८५ हें गडकऱ्याच्या जन्माचे वर्ष इतर अनेक दृष्टींनी महत्त्वाचें आहे. कितीतरी महत्त्वाच्या घटना या वर्षाच्या स्मृतीशीं निगडित झालेल्या आहेत. याच वर्षी प्रसिद्ध मराठी नाटककार अण्णासाहेब किर्लोस्कर एखाद्या नटाप्रमाणे जगाच्या रगभूमीवरून काळाच्या जवनिकेत कायमचे अंतर्धान पावले. शाकुंतल, सौभद्र व रामराज्यवियोग याच्या कर्त्यांने आपली उभी हयात मराठी रगभूमीचा उत्कर्षासाठीच वेचली, आणि त्याने ज्या वर्षी नाट्यकलेचा व रगभूमीचा शेवटचा निरोप घेतला त्याच वर्षी वाग्वैजयंतीच्या व प्रेमसंन्यास इत्यादि नाटकाच्या कर्त्याचा जन्म झाला. याच वर्षी सर्व प्रकारच्या सामाजिक सुधारणाविषयीं सर्व प्रकारची तळमळ बाळगणाऱ्या हरीभाऊची मधली स्थिति ही सामाजिक कादंबरी प्रसिद्ध झाली; आणि याहिपेक्षा आधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे ज्याच्या काव्याचा प्रभाव गेलीं पासष्ट वर्षें मराठी कवींवर स्पष्टपणें दिसून येत आहे व ज्यानी अनेक बाबतींत मराठी कवितेला नवीन वळण लावलें त्या केशवसुताची— ज्याचे आपण सर्व चेले आहोत असें गडकरी मोठ्या अभिमानाने म्हणत असत त्या केशवसुताची—पहिली कविता याच वर्षी प्रसिद्ध झाली. खोट्या परंपराविरुद्ध, अंधश्रद्धेविरुद्ध, घातक सामाजिक रूढींविरुद्ध, वेडगळ

आचाराविरुद्ध, अनेक सामाजिक अन्यायाविरुद्ध व विसंगतींविरुद्ध बंड पुकारून व्यक्तिवादाचा व व्यक्तिनिष्ठेचा प्रभावी पुरस्कार करणाऱ्या, आणि आपल्या मनातील कोमल भावनांचा प्रामाणिकपणें आविष्कार करून आत्मनिष्ठ काव्याची नवीनच परंपरा मराठींत सुरू करणाऱ्या, वृत्तविषयक प्रयोग धीराने करणाऱ्या आणि काव्याच्या क्षेत्रातील जीर्ण संकेत उद्ध्वस्त करण्याची लालसा बाळगणाऱ्या केशवसुतांचें शिष्यत्व गडकऱ्यांनी सागून सवरून पतकरलें होतें. अशा केशवसुतांची अगदी पहिली कविता ज्या सालीं प्रसिद्ध झाली त्याच सालीं गडकऱ्यांचा जन्म व्हावा हा एक योगायोगच आहे.

१८८५ सालीं राजकीय क्षेत्रात एक प्रभावी घटना घडली. हिंदी राष्ट्रीय सभेची स्थापना ही ती घटना होय. राजकीय बाबतींत व्यक्तीला स्वत:च्या जन्मजात हक्काची जाणीव तीव्रपणें करून देऊन पारतंत्र्याच्या शृंखला तोडून टाकण्यास त्याला उत्तेजन देणाऱ्या अनेक गोष्टी यानंतरच्या काही वर्षांत राजकीय क्षेत्रात घडल्या. त्याची ही नांदीच होय. हा काळच एकंदरींत आंदोलनाचा होता. राजकीय क्षेत्रात घडणाऱ्या प्रभावी घटनांच्या जोडीला इतर अनेक क्षेत्रात कमी अधिक प्रमाणात क्षोभ होऊ लागलेला स्पष्ट दिसून येतो. वाङ्मय, समाजसुधारणा, राजकारण, धार्मिक सुधारणा इत्यादि निरनिराळ्या विभागात या काळाच्या आसपास घडलेल्या घटनांचा दूरगामी परिणाम तत्कालीन वाङ्मयावर जसा झाला तसाच परिणाम तेथून पुढे कित्येक वर्षे निर्माण झालेल्या वाङ्मयावरहि झालेला दिसून येतो. आणि हें सारें अपरिहार्य असेंच होतें. जो सौंदर्यवाद महाराष्ट्रात बालकवि, गडकरी व नंतर तांबे या कवींनी पुरस्कृत केला त्या सौंदर्यवादाचा इंग्लंडमध्ये आवेशाने पुरस्कार करणाऱ्या ' प्रीरॅफेलाइट ब्रदरहुड ' नावाच्या प्रसिद्ध कविमंडळाचा व चित्रकारमंडळाचा अध्वर्यु डी. जी. रॉझेटी हा कवि १८८४ मध्यें दिवंगत झाला. रॉझेटीच्या सौंदर्यवादाचा प्रभाव गडकऱ्यांचे समकालीन कवि तांबे यांच्यावर प्रत्यक्षपणें किंवा अप्रत्यक्षपणें पडलेला दिसून येतो हें मीं अन्यत्र विस्ताराने स्पष्ट केलें आहे. इंग्लंडमध्ये गेल्या शतकात प्रसृत झालेल्या अनेक वाङ्मयीन किंवा कलाविषयक प्रणालींचा

प्रभाव प्रत्यक्षपणें किंवा पर्यायाने मराठी काव्याच्या व नाट्याच्या क्षेत्रांत दिसणें अपरिहार्य होतें. बालकवींनी पुरस्कृत केलेला सौंदर्यवाद ही गोष्ट महाराष्ट्रात तरी सर्वस्वीं अभिनव होती. आणि या सौंदर्यवादाचे मूळ कीट्स-पर्यंत व गडकऱ्याच्या जन्माच्या आधी एकच वर्ष दिवंगत झालेल्या डी. जी. रॉझेटीपर्यंत जाऊन पोचतें.

गडकऱ्याच्या जन्मानंतर वर्षाच्या आतबाहेर गोविंदराव देवलाचे मृच्छकटिक नाटक उदयाला आलें. मराठी रंगभूमीवर या नाटकाने आणि संशयकल्लोळ व शारदा या देवलाच्या दुसऱ्या दोन नाटकानी जें अभूतपूर्व वर्चस्व अनेक वर्षें गाजविलें तें लक्षात घेतलें असता यापुढच्या अर्ध्या शतकाच्या काळांत महाराष्ट्रात ज्या नाट्यविषयक घडामोडी झाल्या त्याच्यातील मर्म बरेंचसें कळून येईल. देवलाच्या नाट्यकौशल्याचा व कवित्वाचा गडकऱ्याच्या मनावर केवढा परिणाम झाला होता याचें प्रत्यंतर त्यांच्या देवल या कवितेंत मिळेल. इतर अनेक मोठे कवि इतरत्र असले तरी 'देवल ते देवल' असे धन्यतेचे उद्‍गार गडकऱ्यानी या कवितेंत काढले आहेत.

तथापि याहिपेक्षा अधिक प्रभावी गोष्ट गडकऱ्याच्या जन्मानतर तीनच वर्षांनी म्हणजे १८८८ मध्ये घडली. या सालीं आगरकराच्या सुधारक या बंडखोर साप्ताहिकाचा जन्म झाला; आणि आगरकरांच्या बंडखोर, मूर्तिभजक, सुधारणावादी अभिनव विचारांनी यापुढचीं कित्येक वर्षें अक्षरशः भारून टाकलीं. १८९३ मध्ये केशवसुतानी तुतारी ही प्रसिद्ध कविता लिहून आगरकरांच्या नवीन बुद्धिवादाचा, व्यक्तिवादाचा व मूर्तिभंजक विचाराचा काव्याच्या द्वारे अत्यंत जोरदार प्रसार व प्रचार केला. याच सुमारास पण लक्षांत कोण घेतो ! ही हरीभाऊंची समाजसुधारणाविषयक उत्कृष्ट कादंबरी प्रसिद्ध झाली, आणि १८९९ मध्ये देवलानी जरठकुमारी-विवाहाच्या घातुक परिणामांचें आविष्करण करणारें शारदा हें नाटक लिहिलें. तात्पर्य, गडकऱ्यांच्या जन्मापासून एकोणिसावें शतक उलटून जाईपर्यंतचीं पधरा वर्षें सर्व महाराष्ट्र आगरकरी बुद्धिप्रामाण्याने व रूढिभंजक विचारांनी भारलेला होता. या साऱ्या विचारांचे भरपूर पडसाद केशवसुतांच्या अनेक कवितामधून अगदी स्पष्टपणें उमटले. रे. टिळकाच्या कांही

कावितांतहि या विचारांचा प्रभाव दिसून येतो. तात्पर्य, या साऱ्याच काल-खंडांत अत्यंत अभिनव व प्रभावी अशा राजकीय, सामाजिक व धार्मिक विचारांचा महाराष्ट्रांतील तरुण सुशिक्षित पिढीवर फार मोठा परिणाम झालेला होता, आणि समाजांत एका विलक्षण नवचैतन्याचें स्फुरण दिसूं लागले होतें. अशा स्थितींत १९०५ सालीं केशवसुतांचा अंत झाला; आणि याच सुमारास ऐन विशींत असलेले गडकरी कविता लिहूं लागले होते. केशवसुतांचा अंत झाल्याबरोबर सर्व महाराष्ट्रांत त्यांच्या काव्याच्या अभ्यासाचें वारें संचारलें. तरुण भावनावश मनांवर केशवसुतांच्या अनेक कवनांतील प्रभावी सामाजिक विचारांचा फार विलक्षण पगडा बसला; आणि केशवसुताच्या धर्तीवर, त्यांच्या विचारांसारखेच विचार काव्यात प्रकट करावयाचे असा अभिनिवेश तरुण कवींच्या मनात निर्माण झाला. ज्या भावनावश तरुण कवींच्या मनाची पकड केशवसुतांच्या कवनांनी घेतलेली होती त्यांच्यांतच गडकऱ्याची प्रामुख्याने गणना करावी लागेल. केशवसतांच्या तुतारीचें अनुकरण करून गडकऱ्यांनी लिहिलेली दसरा ही गाजलेली कविता १९१३ आक्टोबरच्या मनोरंजनांत प्रसिद्ध झाली. १९०६ पासून १९१३ पर्यंत आठनऊ वर्षें तरी गडकरी केशवसुतांच्या प्रभावी वर्चस्वाखाली होते. याच कालखंडांत आणखी एका व्यक्तीच्या वर्चस्वाखाली गडकरी होते. श्री. कृ. कोल्हटकर ही ती व्यक्ति होय. केशवसुतांच्या बंडखोर सामाजिक विचाराचा गडकऱ्याच्या मनावर जसा परिणाम झालेला दिसतो तसाच परिणाम तात्यासाहेब कोल्हटकराच्या नाटकांतील सुधारणावादी विचाराचा, कल्पनाविलासाचा, कोटीबाजपणाचा, गूढरम्य घटनाचा व नवीन प्रकारच्या कवित्वाचाहि झालेला स्पष्ट दिसतो. गोविंदराव टेंबे आपल्या जीवनविहार या ग्रंथात लिहितात—"कोल्हटकरांच्या भोंवतीं गडकरीप्रमुख तरुणांचा नेहमीं गराडा पडे. त्यांच्या नाटकांतील कोट्यांवर सर्व तरुण पिढी बेहद्द खूष असे." कोल्हटकराच्या पदांतील सुंदर स्थळांची निवड करून व अन्वयार्थ देऊन एक छोटें पुस्तकहि गडकऱ्यानी प्रसिद्ध केलें होतें असाहि उल्लेख गोविंदरावांनी केला आहे.

*   *   *

गडकऱ्यांच्या वैयक्तिक जीवनांतील महत्त्वाच्या घटनाची नोंद अनेकांनी करून ठेवली आहे. १९०४ सालीं ते प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झाले आणि लगेच फर्ग्युसन कॉलेजात त्यांनीं नाव दाखल केले. परंतु पदवी मिळवण्याची महत्त्वाकांक्षा असूनहि कॉलेजातील पहिल्याच परीक्षेत यश न मिळाल्यामुळे उच्च शिक्षणाचा नाद सोडून देऊन त्यानी किर्लोस्कर संगीत मडळींतील लहान मुलांना शिकवण्याचें काम पतकरलें. त्यांच्या व्यावहारिक जीवनाची सुरवात ही अशी झाली. १९१० पर्यंत ते किर्लोस्कर मडळींत होते. या चारपांच वर्षाच्या काळात त्याचा अनेक नटाशीं निकटचा परिचय झाला, काही प्रसिद्ध नाटककाराच्या नित्य सहवासात राहण्याचे भाग्य त्यांना लाभलें. नाटकी जीवन त्याना अगदी जवळून पाहतां आलें, आणि नाट्यलेखनातील व नाट्यप्रयोगांतील अनेक कलात्मक व व्यावहारिक अडचणीहि त्यांना हेरता आल्या. नाटकमडळींतील ठराविक कामें करीत असतानाच त्यांनी अफाट वाचन केले आणि कांही कविताहि लिहिल्या. देवल व कोल्हटकर या नाट्याचार्यांच्या नाट्यकलेचा व कवित्वाचा सूक्ष्म अभ्यास त्यांनी याच काळात केला. विनोदी लेखनाची अल्पशी सुरवातहि त्यानी किर्लोस्कर मंडळीच्या बिऱ्हाडींच केली. १९०१ पासून गडकऱ्यानी कविता लिहावयास सुरवात केली होती हें खरें असलें तरी रसिकांच्या मनाला आकर्षून घेतील अशा कविता लिहिण्यासाठी आणखी सात आठ वर्षें त्याना थांबावें लागले. हा काळ अनेक दृष्टींनी त्याचा शिक्षकच ठरला. या काळांत व्यावहारिक जगतातील अनेक अनुभव त्याना प्राप्त झाले. यांपैकी बहुतेक अनुभव कडूच होते—काही तर पराकाष्ठेचे उद्वेगजनक होते. नाटकमंडळीच्या बिऱ्हाडी मानवी मनाचे अनेक नमुने त्यांना पाहावयास मिळाले असले पाहिजेत. त्याचे अवलोकन अतिशय सूक्ष्म व मार्मिक असल्यामुळे साऱ्या दुष्ट व घातक मानवी प्रवृत्तींचा क्रूरपणा त्यांच्या भावनावश मनाला चागलाच जाणवला असेल. स्वतःच्या दारिद्र्यामुळे व इतर अनेकविध दौर्बल्यामुळे भोवतालच्या जगांतील निरनिराळ्या दुष्ट प्रवृत्तींचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य त्याच्या ठायीं मुळीच नव्हतें. स्वाभाविकच, जगाच्या चांगुलपणाविषयीं संशयाचीच भावना त्याच्या चित्तांत

प्रबळ झाली; जग हे फसवेंच आहे, त्याच्यावर विश्वास ठेवणाराची वंचना झाल्याशिवाय राहणार नाही असा त्यांचा दृढ समज झाला. जगाच्या चागुलपणाविषयीं हा जो अविश्वास त्याच्या मनात तारुण्याच्या ऐन उमेदींतच निर्माण झाला तो पुढे केव्हाच नष्ट झाला नाही. हे एक प्रकारचे 'सिनिसिझम्'आहे हें खरें. पण ते नष्ट व्हावे यासाठी ज्या सुखपूर्ण अनुभवाची प्रतीति यावयास पाहिजे तिची प्राप्ति दुर्दैवाने गडकऱ्याना कधीच झाली नाही, आणि कांही विलक्षण औदासीन्याने त्यांच्या मनाला जें ग्रासून टाकले तें अगदी त्यांच्या अंतापर्यंत !

---

## २. केशवसुतांचा सच्चा चेला

१९०९ च्या मे महिन्यांत गडकऱ्यानी अल्लड प्रेमास ही कविता लिहिली. याच्याच आसपास केव्हा तरी त्यांनी किर्लोस्कर मंडळींतील नोकरी सोडून दिली आणि १९१० पर्यंत सुमारे वर्षभर ते न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शिक्षक म्हणून काम करीत होते. शाळेच्या कामात आस्था बाळगून नेकीने चाकरी करणे ही गोष्ट त्याच्या प्रकृतिधर्माशीं पूर्ण विसंगत होती. किंबहुना स्थिरपणें कांहीहि करणे त्याना कधीच जमण्यासारखें नव्हतें. तरल, स्वैर व अमर्याद कल्पनाशक्ति प्राप्त झालेला गडकऱ्यांसारखा भावनाप्रधान कवि शाळेतील रूक्ष जीवनाशीं समरस होणेंच शक्य नव्हतें. ज्या चंचलतेबद्दल व लहरीपणाबद्दल १९१६ मध्ये हृदयास या कवितेंत त्यांनी आपल्या प्रेयसीला कटु शब्दात अनेक दूषणें दिलीं तीच चंचलता किंवा तोच लहरीपणा त्याच्या रक्तांत अगदी भिनलेला होता. भोवतालची व्यावहारिक परिस्थिति सर्वस्वीं प्रतिकूल आहे हें स्पष्टपणें दिसत असतांहि उदरनिर्वाहाचें एकमेव साधन असलेली चाकरी गडकऱ्यानी सोडून दिली आणि आपल्या बेदरकार जीवनाची नादी म्हटली !

नोकरीचे पाश सोडून दिल्यानतर काव्याची मनसोक्त उपासना करण्याशिवाय दुसरें कोणतेंहि कार्य त्या वेळीं गडकऱ्यांच्या पुढे नव्हतें. केशवसुतांविषयीं अमर्याद आदर बाळगून त्यांच्याच पद्धतीने नवीन विचारांनी ओतप्रोत भरलेल्या कविता लिहिण्याचा हव्यास या काळांतील अनेक तरुण कवींच्या ठायीं होता हें मागे सांगितलेंच आहे. या हव्यासाला मूर्त

स्वरूप देण्याच्या इराद्यांने तीन तरुण कवि एकत्र आले आणि केशव-सुतांच्या अभिनव सामाजिक विचाराचा प्रसार करण्यासाठी नेहमी कार्य करणारें एक मंडळच स्थापन करावें असे त्यानी ठरविले. या मंडळाचे उद्देश ज्यामध्ये पूर्णपणें अंतर्भूत होतील असें एक सार्थ नाव या मडळाला त्यांनी दिलें. तुतारीमंडळ[1] हें या कविमडळाचें नांव. सदर कविमंडळ रविवार ता. १९ फेब्रुवारी १९११ या दिवशी स्थापन झालें. स्वतः गडकरी, श्री. त्र्यं. सी. ऊर्फ अण्णासाहेब कारखानीस व 'भालचंद्र' या टोपण नावाने कविता लिहिणारे श्री. ग. ना. टिपणीस हे तीन तरुण कवि या मंडळाचे सभासद होते. मडळाच्या स्थापनेच्या दिवशींच गडकऱ्यानी केशवसुतांच्या गौरवासाठी केशवसुत मेले? ही कविता लिहिली व मंडळात वाचून दाखविली. सदर कविता पुढे १९१३ ऑगस्टच्या मनोरंजनांत प्रसिद्ध झाली. केशवसुताच्या सामाजिक क्रांतिविषयक कल्पनाविषयी गडकऱ्याच्या मनात जो निःसीम आदर भरलेला होता तो या कवितेच्या प्रत्येक ओळींत प्रकट झाला आहे. 'जगतास जागवायाला केशवसुत गाउनि गेले!' ही या कवितेची पहिली ओळ आहे. या ओळीतील 'जगतास जागवायाला' हे शब्द अत्यंत महत्त्वाचे आहेत. केशवसुताना काव्याचें जें प्रयोजन अभिप्रेत होतें त्याचाच उल्लेख गडकऱ्यानी येथे केला आहे. 'पद्यपंक्तिची तरफ आमुच्या करीं विधीनें दिली असे। टेकुनि ती जनताशीर्षांवरि जग उलथुनिया देउं कसें' या ओळींत केशवसुतांनी काव्याच्या प्रयोजनाविषयींचे आपले विचार अगदी स्पष्टपणें माडले आहेत. समाजात जागृति करणें, क्षोभ निर्माण करणें हींच कार्ये आपण कवितेकडून करून घेणार आहोंत असा केशवसुतांचा अभिनिवेश होता. या अभिनिवेशानेच त्यानी स्फूर्ति, नवा शिपाई, तुतारी इत्यादि कविता लिहिल्या. श्री. माडखोलकर ज्याला 'उद्‌बोधन' म्हणतात तेंच कार्य केशवसुतांना या व यासारख्या कविताच्या द्वारें कराव-याचें होतें. आपल्या कवितेच्या पहिल्याच कडव्यांत गडकऱ्यांनी केशवसुतांची गेल्या शतकाच्या पहिल्या चरणांत होऊन गेलेला प्रसिद्ध रोमॅंटिक कवि शेली याच्याशीं तुलना केली आहे; इतकेंच नव्हे तर, केशवसुतांच्या रूपाने

शेलीनेच पुन्हा महाराष्ट्रात अवतार घेतला व आपलें अर्धवट राहिलेले कार्य येथे पुरें केलें असेंहि म्हटले आहे.

जगतास जागवायाला केशवसुत गाउनि गेले !
इंग्लद भूमि शेलेची माहेर जडाचे बनले,
सन्देश गूढ जे त्याचे तैसेच मानसी जिरले,
तपोवना मानवतेच्या या बघता मानस हसले !
देवाचे हेतु न पुरले,
अर्धच कार्य जे उरले,
ते येथे करुनी गेले,
अवतरुनी फिरुनी शेलें ! केशवसुत गाउनि गेले !

या कडव्यात गडकऱ्यानी केशवसुताना शेलीची उपमा दिली आहे ही गोष्ट डॉ. रा. ग. हर्षे याना आक्षेपार्ह वाटली आहे[२]. ते म्हणतात—

" ...केशवसुतास त्यानी दिलेली शेलीची भूमिका आम्हास बिलकुल मान्य नाहीं. केशवसुताचें जर कोणाशीं विशेष साम्य असेल तर ते शेलीपेक्षाहि वर्ड्स्वर्थशीं अधिक आहे असें आम्हास वाटतें. वर्ड्स्वर्थला ज्याप्रमाणें एका नूतन काव्ययुगाचा...प्रवर्तक समजलें जाते त्याचप्रमाणे केशवसुतासहि तो मान आपण देतो."

यानतर वर्ड्स्वर्थ व केशवसुत याच्यामधील काही साम्ये दाखविल्यावर त्यानीं केशवसुत व शेली याच्यामधील विरोध पुढीलप्रमाणें स्पष्ट केला आहे.

" याच्या उलट शेली हा कवि अत्यत भावनाप्रधान व उत्कट ध्येयवादी आहे...शेलीच्या समाजसुधारणेच्या कल्पना ( वर्ड्स्वर्थ व केशवसुत ) याच्याप्रमाणे एका विशिष्ट देशाच्या विशिष्ट समाजस्थितीस जखडलेल्या नसून अखिल मानवजातीला आपल्या बाहुपाशात कवटाळण्याचा त्याचा अट्टाहास असे. शेली स्वतःच्या ध्येयदृष्टीने जगाकडे बघत असल्यामुळें त्याचें बरेंचसें काव्य व्यक्तिनिष्ठ आहे."

डॉ. हर्षे यांचा शेलीविषयीं व केशवसुतांविषयींहि फार मोठा गैरसमज झालेला स्पष्ट दिसत आहे. त्यांनी शेलीच्या काव्याचा व्यासंग न करतां किंवा केशवसुतांचें अंतरंग समजावून न घेतां वरील विधाने केलीं असें म्हणणें निखालस धाष्टर्याचें आहे असें मला वाटते. पण काही तरी गैर-समजानें त्यांच्या चित्तांत घर केले आहे एवढे मात्र दिसत आहे हें नमूद करून ठेवणें माझें कर्तव्य आहे. या बाबतींतील वस्तुस्थिति पुढीलप्रमाणें आहे. शेली व केशवसुत हे दोघेहि पराकाष्ठेचे व्यक्तिवादी आहेत—त्याचा व्यक्तिवाद साधा नसून अगदी अहंकारी व्यक्तिवाद आहे आगरकरानी ज्या आत्यंतिक व्यक्तिवादाचा पाया महाराष्ट्रांत घातला त्याचा काव्याच्या द्वारे तितकाच प्रभावी प्रचार करण्याचें कार्य केशवसुतानी केलें. प्रत्येक व्यक्तीचे सामाजिक जीवनात असलेले महत्त्व प्रस्थापित करून व्यक्तीच्या ठायीं आत्मविश्वास व आशावाद निर्माण करण्याचे महनीय कार्य केशव-सुतानी केलें. 'पूजितसे मी कवणाला? – तर मी पूजीं अपुल्याला' असे उद्‌गार काढणाऱ्या केशवसुताच्या अहंकारी व्यक्तिवादाची मजल आपल्या-मध्येच अखिल विश्व सामावलेले असून आपण विश्वव्यापक आहोंत असें मानण्यापर्यंत गेलेली होती; आणि याच व्यक्तिवादाने प्रेरित होऊन 'कोण मला वठणीवर आणूं शकतो ते मी पाहे!' अशी दर्पोक्तिहि त्यानी नवा शिपाई या कवितेंत काढली आहे. असलाच अहंकारी व्यक्तिवाद शेलीच्या कवनातहि ठायीं ठायीं प्रकट झालेला आहे. शेली हा पराकाष्ठेच्या बंडखोर विचारासाठीच प्रसिद्ध आहे. नास्तिकवादावर एक पुस्तक लिहि-ण्याचा अपराध केल्याबद्दल त्याला युनिव्हर्सिटीला पारखें व्हावे लागले होतें. सामाजिक बाबतींत शेलीने जे विचार मांडले ते अत्यंत जहाल असेच होते. ईश्वराविषयींच्या परंपरागत समजुती, खोट्या धर्माविषयींचा आदरभाव, आंधळी श्रद्धा या गोष्टींवर शेलीने आपल्या कवनात अत्यंत कडक प्रहार केले आहेत. त्याचप्रमाणें अनेक सामाजिक अन्याय, सामाजिक विषमता, मानसिक व बौद्धिक गुलामगिरी या घातक गोष्टींवरहि त्याने कोरडे उडवले आहेत. थोडक्यात, नवसमाजनिर्मितीचा आशावाद ही गोष्ट केशवसुत व शेली या दोघांतहि भरपूर प्रमाणांत दिसून येते. शेलीने या बाबतींत जी

प्रभावी कामगिरी केली आहे तसल्या प्रकारची कामगिरी वर्ड्स्वर्थने केल्याचें ऐकिवांत नाही. म्हणून नवसमाजनिर्मितीच्या कल्पना ओजस्वीपणें प्रसृत करून अहंकारी व्यक्तिवादाचा आविष्कार करण्याच्या बाबतींत केशवसुताची वर्ड्स्वर्थशीं तुलना होण्यासारखी नसून ती शेलीशींच होण्यासारखी आहे. शेली नुसतेंच मूर्तिभंजन करून थांबला नाही, तर नविन समाजाची प्रत्यक्ष निर्मिति कशी करावी अथवा करता येईल याविषयींहि त्याने आपले विचार स्पष्टपणें प्रकट केले आहेत. हें सारें करीत असतांच शेलीने विशाल व सर्व-व्यापक उदार मानवतेचा पुरस्कार केला आहे; आणि नेमकी हीच गोष्ट केशवसुतांनीहि केली आहे; 'अखिल मानवजातीला आपल्या बाहुपाशात कवटाळण्याचा' शेलीचा अट्टाहास असे अशी तक्रार जेव्हा डॉ. हर्षे करतात तेव्हा केशवसुतानीहि असलाच व्यापक मानवधर्म प्रचालित करण्याचा 'अट्टाहास' केला आहे हे ते विसरतात. केशवसुताच्या नवा शिपाई या कवितेंतील काहीं ओळी पुराव्यादाखल येथे उद्धृत करणें जरूर आहे.

ब्राह्मण नाहीं, हिंदुहि नाहीं, न मी एक पथाचा,
तेच पतित कीं जे आखडिती प्रदेश साकल्याचा !

* * *

कूपातिल मी नच मडूक;
मळ्यास माझ्या कुपण पडणें अगदीं न मला साहे !

* * *

जिकडे जावे तिकडे माझी भावडे आहेत.

वरील विवेचन व त्यांतील केशवसुतांचीं अवतरणें यांचा विचार केला असतां शेली व केशवसुत यांची कांही बाबतींत तुलना होणें अगदी अपरिहार्य आहे हें ताबडतोब दिसून येईल. आणि यामुळे, 'अर्धेंच कार्य जें उरलें, तें येथें करुनी गेले, अवतरुनी फिरुनी शेले ! केशवसुत गाउनि गेले !' असे उद्गार गडकऱ्यांनी काढले असल्यास त्यांत त्यांची कांही चूक नसून शेलीच्या व केशवसुतांच्या कार्याच्या बाबतींत डॉक्टर महाशयांचीच काही-तरी गैरसमजूत झालेली आहे असें म्हणणें भाग आहे.

केशवसुतांचा मर्त्य देह हें नश्वर जग सोडून गेला असला तरी कवनरूपानें अमर झाले आहेत; किंबहुना ते मेले हेंच खोटें असून आजहि ते गात ाहेत असा दृढ विश्वास गडकऱ्यांनी शेवटच्या ओळींत प्रकट केला आहे.

केशवसुत कसले मेले ? केशवसुत गाताचि बसले !

पुढे दसरा या कवितेंत " केशवपुत्रा'चा महशूर ' गोविंदाग्रज ' चेला च्चा ! " असें जें आपलें बिरुद गडकऱ्यांनी जाहीर केलें त्याचें मूळ ९११ मध्ये लिहिलेल्या या कवितेंत आढळेल. ही कविता रचनेच्या, ल्पनाच्या व शैलीच्या दृष्टीने हिणकस आहे हें खरें आहे. गडकऱ्यांच्या वित्वाला अजून खरा फुलोरा आलेला नाही याचें निदर्शन या कवितेंत ाढळेल. तथापि केशवसुतांविषयीं त्यांच्या मनांत जो निःसीम आदर ाठोकांठ भरलेला होता त्याचें प्रत्यंतर आणून देणारी कविता या दृष्टीने ाचें महत्त्व निःसशय थोर आहे.

ज्या अनावर उत्साहाने १९११ च्या आरंभीं गडकऱ्यांनी तुतारी-ाडळाची स्थापना केली होती तो त्याचा उत्साह फारच थोड्या दिवसात ावळला. गडकऱ्यांच्या प्रकृतिधर्माला अनुसरूनच ही गोष्ट झाली. सतत ाठ रविवार वर उल्लेखिलेले तीन केशवसुताभिमानी कवि नियमाने एकत्र ामत असत ही काय सामान्य कर्तबगारी आहे ? कविलोक इतके स्थिराचित्त ासूं शकतात म्हणावयाचें! विशेषत: गडकऱ्याच्या कमालीच्या अस्थिर ानोवृत्तीची ज्याला ओळख झालेली आहे अशा माणसाला मडळाची ही ोन महिन्याची हयात कौतुकास्पदच वाटावयास पाहिजे ! कांही माहीतगार ोकांशीं या बाबतींत बोलत असता एकदा मला असें समजलें कीं तुतारी-ाडळ अल्पावधींतच नामशेष होण्याची बरीचशी जबाबदारी स्वतः ाडकऱ्यांचीच होती. मंडळाच्या स्थापनेनंतर त्याचें काम व्यवस्थितपणें सुरू ोतें न होते तोंच गडकऱ्याचा उत्साह उन्हाळ्यांतलि ओहोळाप्रमाणें क्षीण ाला आणि लवकरच अगदी आटून गेला. हा वेळपर्यंत गडकऱ्यांनी कवि ा दृष्टीने थोडीफार कीर्ति संपादन केलेली होती. यामुळे त्यांच्या अभावीं ाडळ चालणें अशक्य होतें. याचा स्वाभाविक परिणाम असा झाला की, ोन महिन्यांच्या आंतबाहेर मंडळाने ' राम ' म्हटला. यानंतरहि किरकोळ

बैठकी झाल्या असतील कदाचित्. पण प्रत्यक्ष कार्याच्या दृष्टीने मंडळाची इतिश्री १९११ च्या एप्रिलमध्येच झालेली होती.

**तुतारीमंडळाचें** विसर्जन झाल्यानंतर पुढे काय करावयाचे असा प्रश्न गडकऱ्याच्या मनांत निर्माण झाला, आणि एका अभिनव कल्पनेने त्याच्या मनावर मोहिनी घातली. काव्याच्या क्षेत्रांतून नाट्याच्या क्षेत्रात प्रवेश करावा असें त्याच्या मनाने पुरतेपणीं घेतलें आणि मोठ्या करारानें त्यानी हा विचार कृतींतहि उतरविला. किर्लोस्कर मंडळींत त्यांचें पाचसहा वर्षे जे वास्तव्य झालें होतें त्याचा फायदा त्यांना अनेक दृष्टींनी मिळाला होताच. कसलेल्या नाटककाराचा व नटांचा सहवास, आणि अनेक नाट्यप्रयोग काळजीपूर्वक पाहण्याची संधि यामुळे त्यांची नाट्यलेखनाची पूर्वतयारी केव्हाच झालेली होती. कोणतीहि नवीन गोष्ट करताना गडकऱ्यांचा उत्साह अवर्णनीय असे. **प्रेमसंन्यास** हे नाटक त्यानी याच उत्साहाने लिहावयास घेतलें. खूप झपाट्याने त्यानी नाटकाचा बराचसा भाग लिहून काढला आणि महाराष्ट्र नाटक मंडळीच्या बिऱ्हाडीं अण्णासाहेब कारखानिसाच्या व इतर जाणत्या लोकाच्या समोर त्याचें वाचनहि त्यानी केलें. कारखानिसाकडून मिळालेल्या उत्तेजनामुळे गडकऱ्यानी नाटक पुरें केले आणि १९११ च्या शेवटीं शेवटीं या नाटकाचा पहिला प्रयोग महाराष्ट्र नाटक मंडळीने मुंबईच्या रंगभूमीवर करून दाखविला.[३] आगरकरानी सुधारकाच्या द्वारें ज्या मूर्तिभंजक विचारांचा व उदारमतवादाचा पुरस्कार केला होता व ज्याच्या प्रसारासाठी केशवसुतानी **तुतारी, नवा शिपाई** व **स्फूर्ति** इत्यादि कविता लिहून महाराष्ट्रांत नवचैतन्य निर्माण केले त्याच उदारमतवादाचा प्रसार करण्यासाठी व सामाजिक अन्यायांचा व दुष्ट रूढींचा निषेध करण्यासाठी गडकऱ्यांनी प्रेमसंन्यास लिहिले. विधवेचा पुनर्विवाह ही गोष्ट माणुसकीच्या व सामाजिक उन्नतीच्या दृष्टीने अत्यंत आवश्यक आहे हें गडकऱ्यांना या नाटकाच्या द्वारें समाजाला सांगावयाचें आहे. लीला ही विधवा असल्यामुळे तिचा जयंताशीं विवाह होणें ही गोष्ट समाजाला मानवणें शक्यच नव्हतें. यामुळे परस्परांशीं मीलन करून घेणें या प्रणयी युगलाला दुस्तर झालें

आणि अखेर दोघांच्याहि करुण अतात नाटकाचें पर्यवसान झाल. सामाजिक सुधारणाविषयींच्या आगरकरी विचारांनी हे नाटक अक्षरशः भारावलें आहे. सामाजिक सुधारणाच्या आवश्यकतेबद्दल व परंपरेने चालत आलेल्या घातुक रूढींच्या निर्दालनासंबधीं या नाटकांत ठिकठिकाणीं अगदी असंदिग्ध भाषेत चर्चा आलेली आहे. अगदी पहिल्याच प्रवेशांत तात्यासाहेब या उदारमतवादी व समाजसुधारणेला अनुकूल असलेल्या गृहस्थाचा बाबासाहेब या परंपराभिमानी व सुधारणाविरोधी गृहस्थांशीं सुधारणांच्या आवश्यकतेविषयी एक महत्त्वाचा संवाद आहे. आगरकरी विचार नाटककार गडकऱ्याच्या रक्तात भिनल्याचेंच हे लक्षण आहे. अनेक शतकें चालत आलेल्या, परंतु आधुनिक काळीं ज्याची मुळीच आवश्यकता नाही अशा रूढींच्या निर्दालनामुळे परंपराभिमानी समाजाला जो अपरिहार्य धक्का बसतो त्याचे वर्णन सुधारणावादी बाबासाहेबांच्या मुखाने गडकऱ्यानी पुढीलप्रमाणे केलें आहे.

> " कोणताहि निर्बंध एकदम मोडायचा म्हटलें म्हणजे थोडासा अतिरेक हा ठरलेलाच ! कोंडलेला नदीचा प्रवाह एकदम सुटतांच प्रथम जोराच्या वेगानें वहावयाचा ! त्याला आपली तयारी पाहिजे ! "

दुसऱ्या अंकाच्या पांचव्या प्रवेशात लीला आणि जयंत पहाटेच्या वेळीं चोरून परस्पराची भेट घेतात. या असल्या नाजुक व रमणीय प्रसंगीं जयंत लीलेला समाजसुधारणेच्या आवश्यकतेवर चांगलें तेहतीस ओळींचें :एक लांबलचक व्याख्यान ऐकवितो; आणि एवढ्याने त्या पोरीच्या डोक्यांत प्रकाश पडणार नाही अशी शंका आल्यामुळेच की काय, फक्त एका क्षणाचा विसावा घेऊन आपल्या धर्मशास्त्राने दाखविलेल्या वैषम्याच्या घातकपणावर पुन्हा तिला एक व्याख्यान ऐकवितो. हीं व्याख्यानें परिस्थिति, प्रसंग, काळ या दृष्टींनी अगदी अनुचित आहेत, इतकेंच नव्हे तर रसभंग करणारींहि आहेत असा आक्षेप घेण्याचा मोह नाट्यतंत्राच्या चाकोरींत राहणाऱ्या लोकाना होईल हें खरें आहे. पण आगरकरी

उदारमतवादाचा व मूर्तिभंजक विचाराचा नाटकांच्या द्वारें प्रसार करण्याची एक नामी संधि चालून आली असता केशवसुतांचा सच्चा चेला ती संधि वाया जाऊं देईल हें शक्यच नव्हतें. आगरकराच्या जहाल विचारसरणीचा व केशवसुताच्या आवेशपूर्ण कवनाचा या कालखंडांत गडकऱ्याच्या मनावर केवढा विलक्षण परिणाम झालेला होता हें जयंताच्या पुढील उद्‌गारावरून स्पष्ट दिसून येईल. हें सारे मैदानी वक्तृत्व आहे असेंहि काहींना वाटेल, पण गडकऱ्याच्या मनात थैमान घालणाऱ्या सुधारणावादी विचाराचा क्षोभ किती अनावर होता हे त्यावरून कळून येईल. याच मनःक्षोभातून थोड्याच दिवसानी दसरा ही तुतारीचें अनुकरण करणारी कविता व स्मशानांतलें गाणें या कवितेतील काही कडवीं याची निर्मिति झालेली आहे. जयत म्हणतो—

" प्रत्येक घटकेला जिथे निःपक्षपातानें न्याय मिळतो तिथेच समाज या नावाची सार्थकता होते...विधवाच्या माना मुरगळण्यात पुरुषार्थ मानणारा, शिक्षणापासून स्त्रियाना दूर ठेवून केवळ पशुवृत्तीने त्याची पायमल्ली करणारा समाज वंदनीय कसा ठरेल ! अरेरे ! एकाच धर्माच्या छायेखालीं विसावा घेणाऱ्या स्त्रियाच्या आणि पुरुषाच्या आचारबंधनात किती भयंकर विसंगतपणा ! संसारातली जोडी फुटली तर विधवेच्या मस्तकावरचा केशकलाप नाहींसा होतो आणि विधुराच्या मस्तकाला बाशिंग बाधण्यात येते. गुडघ्याएवढ्या पोरीशीं लग्न लावण्यासाठीं उतावळेपणाने गुडघ्याला बाशिंग बाधणाऱ्या विधुराला अगदीं वृद्धपणींसुद्धा नवरामुलगा बनून आपल्या पोरकटपणाची वरात...मिरविण्याचा परवाना मिळतो आणि...बिचाऱ्या बालविधवेला अंधारकोठडींत जुलमानें बाळपणीं सन्यासदीक्षेची शिक्षा भोगावी लागते !...बालवधूचें गतायुष्य वृद्धवराच्या शेषायुष्याइतके असलें तरी त्या विवाहाला परवानगी मिळते....विधवेला स्वताच्या दाराबाहेर पडण्याची चोरी, तर विधुराला परदारागमनापर्यंत आणि विश्वदारागमनापर्यंत मोकळीक !...ते प्राचीन ऋषि, आजच्या या शिव्याशापांच्या

धन्यांना, आपल्या जागीं बसून, आपल्या काळीं लिहिलेल्या, त्या वेळच्या बालसमाजाला योग्य असलेल्या धर्मसूत्रांचा गळफांस, आजच्या वाढत्या समाजाच्या गळ्यांत अडकवितांना पाहून काय म्हणत असतील ? ...धर्मशास्त्र प्राणिमात्राच्या कल्याणासाठीं आहे. आजचा आमचा धर्म पूर्वीच्या ऋषिप्रणीत मृत धर्माचें केवळ पिशाच आहे. आणि या पिशाचाची भीति घालून धर्ममार्तंड म्हणविणारे हे पोटभरू जादुगार बायकापोराच्या डोळ्यात धूळ टाकीत आहेत ! ”

आगरकराच्या सुधारकांतील एखादा प्रक्षोभक निबंध वाचल्याचा भास वाचकांना जयताचे वरील व्याख्यान वाचून झाला तर त्यात कांहीहि नवल नाही !

जयंताच्या वरील व्याख्यानाचे मूळ आगरकराच्या निबंधात जसे सापडेल तसेंच केशवसुताच्या तु ारींतहि सापडेल. तुतारींतील पुढील ओळी या दृष्टीने उल्लेखनीय आहेत.

रूढी जुलूम याचीं भेसुर
सन्ताने राक्षमी तुम्हाला
फाडुनि खाती
जुन्या नभीं या ताजे तारक
जुन्या भूमिवर नवी टवटवी,
जुना समुद्रहि नव रत्ने वी;
जुन्यातून जी निष्पत्ति नवी—
काय नव्हे ती श्रेयस्कारक ?
जुने जाउ द्या मरणालागुनि,
जाळुनि किंवा पुरुनी टाका.

* * *

अटक कशाची बसला घालुनि !
पूर्वज वदले त्या गमले तें,
ऐका खुशाल सादर चित्तें,

परंतु सरका विशंक पुढते—
निरोप त्यांचा ध्यानी घेउनि.
* * *

धर्माचें माजवूनि डम्बर,
नीतीला आणिती अडथळे,
विसरुनिया हे जातात खुळे—
नीतीच पद जेथें न ढळे—
धर्म होतसे तेथेंच स्थिर
हल्ला करण्या तर दंभावर—नर बंडांवर,
शूरानो ! या, त्वरा करा रे !
समतेचा ध्वज उंच धरा रे
नीतीची द्वाही पसरा रे !
* * * .

नियमन मनुजांसाठीं मानव
नसे नियमनासाठी जाणा
* * *

घातक भलत्या प्रतिबंधावर
हल्ला नेण्या त्वरा करा रे !
उन्नतिचा ध्वज उच धरा रे—
* * *

**प्रेमसंन्यासांत** ज्या बडखोर, उदारमतवादी विचाराचें आविष्करण गडकऱ्यांनी केलें आहे आणि ज्याचें मूळ आगरकरांच्या अनेक निबंधांत व केशवसुताच्या काही कवनात आहे असे वर दाखवून दिले आहे ते विचार गडकऱ्यांनी आपल्या काही कवनांत पुन्हा आविष्कृत केले आहेत. **स्मशानांतलें गाणें** हें कवन गडकऱ्यांनी नेमकें केव्हा लिहिले ते समजण्यास काही मार्ग नाही. तथापि १९१२–१९१३ या काळातच केव्हा तरी त्यानी तें लिहिलें असावें असे वाटतें. स्मशानातील एकान्ताची व भयाण शाततेची स्तुति करण्याच्या मिषाने गडकऱ्यानी मानवी व्यवहारातील अनेक विसंगतींवर, सामाजिक वैषम्यांवर, नैर्घृण्यावर, व्यक्तीच्या जीवनांतील अनेकविध दंभावर, आचारातील व विचारांतील विसंगतींवर, आणि अनेक दुष्ट व

घातक सामाजिक रूढींवर अत्यंत कटु शब्दात प्रखर हल्ला चढविला आहे. हें सारें थेट केशवसुती वळणाचे वाटतें, आणि पदोपदीं तुतारीची आठवण होते. या कवितेत गडकऱ्यानी जे विचार प्रकट केले आहेत त्याचे स्पष्ट अथवा पुसट पडसाद त्यांच्या नाटकातहि अनेक ठिकाणीं उमटलेले दिसतात. खालील कडवें पाहा—

अनेक माता, एकचि वनिता,
न्यायमार्ग हा ऐसा असता,
अनेक वनिता, एकचि माता !
व्यर्थ पसारा, मांडिति मारा, नीतीच्या जगतात !

आता या कडव्यातील कल्पनेची तळिरामाच्या पुढील उपहासपूर्ण उद्गारारीं अवश्य तुलना करून पाहावी.

"एकंदरींतच बघा, स्वतःच्या बायकोकडे पहाण्याची नवऱ्याची नजर इतकी फिरली आहेशी दिसते कीं, आता परस्त्रीकडे सुद्धा स्वतःच्या स्त्रीच्या दृष्टीनेच पहाणाराला देखील पुण्यश्लोक म्हणण्याची पाळी येत चालली आहे आणि परस्त्रीच्या ऐवजीं स्वस्त्रीच मातेसमान होत चालली आहे !" (एकच प्याला, अक १, प्र.२ )

समानतेच्या मारा बाता,
वरच्या लत्ता झोलित माथा,
सर्वेच खालीं आडी लाथा !
न ती निवारी, न त्या आवरी, बेशरमी हैवान !

या कडव्याचा अस्फुट पडसाद "वरिष्ठाचे पाय धरावेत, कनिष्ठांना पायाखालीं तुडवावे" या कंकणाच्या ( पुण्यप्रभाव, अक १, प्र २) उद्गारांत आढळेल. सामाजिक आचारातील एक विसंगति गडकऱ्यानी पुढील ओळींत प्रकट केली आहे.

घरच्या देवा स्त्रिया न भजती,
पुराण-कीर्तन धुंडित फिरती,
देवहि त्याचे वेश्याभवतीं

या ओळींचे साम्य सुदामाच्या पुढील उद्गारात आढळेल–

"हे देवदर्शन करणारे लोक पुण्यसपादनाऐवजीं पापाचा मात्र वाढावा करून ठेवितात. उभ्या दिवसात घडले नसेल त्याच्या दसपट पाप अर्ध्या घटकेत पदरीं पाडून घेतात ! देवळाच्या पटागणात बायका देवाभोंवतीं आणि हे पाजी लोक बायकाभोवतीं घिरट्या घालतात." (**पुण्यप्रभाव**, अक २, प्र. १)

याहिपेक्षा डोळ्यात भरणारें साम्य **स्मशानांतले गाणें** या कवितेच्या २९ व्या कडव्यात आणि **प्रेमसंन्यासांतील** जयंताच्या तोडीं आलेल्या एका उद्गारात आढळेल.

केसांनीं जे गळे कापिती,
स्त्रीच्या केसांनीं ते तरती !
प्रायश्चित्ते शुद्धहि होती,
शास्त्रें रडती, कराच सत्कृति, तरिही हलते मान

या ओळीची जयंताच्या पुढील उद्गाराशीं तुलना करावी.

"जिवंतपणीं जिवलग मित्राचे सुद्धा केसाने गळे कापणाऱ्या नीचाला मेल्यावर स्वतःच्या स्त्रीच्या वेणीच्या पिळदार पेडाच्या दोरखडानें स्वर्गाच्या किल्ल्यावर चढून आपल्या पापाची पताका फडकविण्याची धार्मिक सवलत..." ( अंक २ प्र. ५ )

**प्रेमसंन्यासांतील** जयंताच्या वर उल्लेखिलेल्या भाषणाचें आणखी एक प्रतिबिंब पुढील ओळींत आढळेल.

नीतीसाठीं वपन मांडिती,
प्रेताहातीं नवरी देती,
अनाथ विधवा पदीं चिरडती
सैतानावरि, ताण असा करि, सृष्टीचा सुलतान !
शास्त्राचे तोंडात फवारे,
रूढीचे परि गुलाम सारे. .

**स्मशानांतलें गाणें** या कवितेत सामाजिक सुधारणांविषयीं गडकऱ्यांची जी विचारसरणी प्रकट झाली आहे तीच अधिक आवेशाने दसरा या

कवितेत प्रकट झालेली आहे. बाकी **प्रेमसंन्यासांत** व **स्मशानांतलें गाणें** या कवितेत प्रकट झालेल्या विचारात व **दसरा** या कवितेतील विचारात कांहीहि फरक दिणार नाही. किंबहुना, ही कविता म्हणजे एक नीरस पुनरुक्ति वाटेल. केशवसुताच्या **तुतारीमधील** अनेक कल्पना थोडाहि फरक न करता गडकऱ्यानी आपल्या कवितेत माडल्या आहेत. इतकेंच नव्हे तर कवितेची चालहि **तुतारीचीच** आहे. ही कविता १९१३ ऑक्टोबरच्या **मनोरंजनांत** प्रसिद्ध झाली आहे. म्हणजे **प्रेमसंन्यास** लिहिल्यानतर सुमारें दीड वर्षाने त्यानी ती लिहिली असली पाहिजे. केशवसुताच्याच विचाराचा स्पष्ट अनुवाद करणाऱ्या पुढील ओळी पाहा.

चला रूढिवर आता घसरा !  
टाकुनि सीमा मृत धर्माच्या,  
दभाच्या या अधपणाच्या,  
जुनेपणाच्या, अहंपणाच्या. ..  
जुन्या मताचा जाळा कचरा !

नव्या मताचे जे राऊत,  
खरेखुरे मायेचे पूत,  
येऊ द्या धैर्याला ऊत  
जुन्या ऋषींना सलाम ठोकुनि  
करा तयारी छाती ठोकुनि  
आजकालच्या ऋषींमागुनी  
जा तिकडे हा नेइल दसरा !

श्रुतिस्मृतींना आता विसरा !  
अधभक्तिचा पागुळगाडा  
मोडुनि तोडुनि उपडा पाडा !  
जुन्यापुराण्या चिध्या विसरा  
जरिपटका घ्या सुधारणेचा.  
कसले पूर्वज घेउनि बसला ?

होते मोठे सोन्या भरले  
त्याचें आता काय राहिले !  
त्याचें त्याच्या मागुनि गेले

**तुतारीमध्ये** केशवसुतानी जे ओजस्वी विचार प्रकट केले व ज्यांमुळे त्याना असामान्य कीर्ति मिळाली त्याच विचाराची व त्यांच्या रचना-पद्धतीचीहि गडकऱ्यानी या लाबलचक कवितेत विनाकारण नक्कल केली आहे असे स्पष्टपणें म्हणावेसें वाटते. केशवसुताच्या विचाराचा प्रसार करण्या-साठी इतरानी काही लिहू नये असे कोण म्हणेल? एकाच विचारसरणीचें प्रवर्तन अनेक कवीनी करावयास मुळीच हरकत नाही. पण आविष्करणाच्या पद्धतींत आणि मांडणीत फरक दिसावा अशी अपेक्षा आपण धरली तर त्यात काय वावगे आहे? सामाजिक सुधारणाच्या बाबतीत गडकऱ्यानी आपले विचार **प्रेमसंन्यासांत** पूर्वीच मांडले होते. **स्मशानातल्या गाण्यातहि** तेच विचार त्यानी काव्यरूपाने माडले. यानतर, खरे म्हटले तर, **तुतारींतील** बहुतेक विचार पुन्हा जसेच्या तसे कवनात माडण्याचे गडकऱ्याना काहीहि कारण नव्हतें. त्यानी जर 'पॅटर्न' बदलले असते—म्हणजे निराळ्या 'जाती'चा आश्रय करून किंवा सॉनेटसारख्या निराळ्या प्रकाराचा उपयोग करून हे विचार माडले असते—तर परिणामाच्या दृष्टीने व आकर्षकतेच्या दृष्टीने तें अधिक बरें झालें असते. तेच विचार परतु निराळ्या पद्धतीने माडले, पॅटर्न बदलून माडले, म्हणजे आकर्षक होतात याचा उत्कृष्ट नमुना खुद्द गडकऱ्यानीच दाखविलेला आहे. **एक समस्या** ही कविता यासाठी पाहावी. सामाजिक विसंगतींचा, व्यक्तीच्या विचारांतील व आचारातील विसंगतीचा, दांभिकपणाचा आविष्कार उपहासाच्या द्वारें झाल्याबरोबर ते आविष्करण किती हृद्य होते हे या कवितेत पाहावयास सापडेल. सुधारणेच्या नुसत्या लाब लाब बाता झोकणारे परतु प्रत्यक्ष कृतीची वेळ येताच कच खाऊन पळून जाणारे, त्याचप्रमाणे ज्याचा सुधारणाविषयक हव्यास केवळ काही स्वार्थावर आधारलेला असतो व सुधारणेची ज्याना मनातून तळमळ वाटत नसते असे अनेक दांभिक लोक समाजात नेहमीच असतात असल्या दांभिक लोकाचे दंभहरण गडकऱ्याना केशवसुती पद्धतीने करता आलें असते, आणि तसे ते त्यानी पूर्वी **स्मशानातले गाणे** व **दसरा** या कवितांमध्ये करूनहि दाखविले. पण १९१७ च्या अखेरीस लिहिलेल्या या समस्येत गडकऱ्यानी उपहास या साधनाचा मोठ्या कौश-

त्याने उपयोग करून घेतला व आपली कविता परिणामकारक व सफाईदार करून दाखविली. घरातून बाहेर पडल्याबरोबर विधवा स्त्री दिसल्यावर अपशकुन झाला असें एकाला वाटले. चार पावले पुढे गेल्यावर 'एवढा कागद वाचून दाखवा 'अशी विनवणी करीत एक कुणबी समोर आला. पण तें चिटोरें त्याच्या अंगावर भिरकावून देऊन स्वारी पुढे सटकली. आणखी थोडेसें चालून गेल्यावर एक अत्यत कारुण्यपूर्ण दृश्य त्याला दिसतें. पिंपळपाराजवळ असलेल्या दत्ताला एक तरुणी प्रदक्षिणा घालीत होती ती सुंदर होती आणि बिधवा होती. पाहणाराच्या हृदयात कालवाकालव करील असेच तें दृश्य नव्हते काय ? त्या सुंदर विधवेला पाहिल्याबरोबर सदर गृहस्थाच्या चित्ताला पाझर फुटला, दैवाची निर्दयता त्याला पटली, न्यायदेवता जागृत झाली आणि सुधारणेची आवश्यकताहि तत्क्षणीं पटली. हें पाहा गडकऱ्याचें उपहासकौशल्य--

सुदर तरुणी हिंडत होती त्या देवाच्या भवताली,<br>
निरखुनि बघता–हरहर ! होती विधवा ती बाला असली<br>
उचंबळूनी ये करुणारस–नेत्राहि अश्रूंनी भिजले,<br>
निर्दयता दैवाची बघुनी हृदय बिचारें तें थिजले<br>
न्यायदेवता जागृत झाली त्या सौंदर्या बघताच,<br>
विषय दयेचा लावित नाहीं कोणाच्या जीवा आच ?<br>
" धिग् धर्माला–धिग् रूढीला–तेतिस कोटी देवाना-- "<br>
किती बोललों–नको सागणें ! पाठ असे तें सर्वाना !<br>
काम कशाचें ! धाम कशाचे ! एक प्रश्न मग हृदयात,<br>
" सुधारणा होणार तरि कधीं या दुर्दैवी देशात ? "

गडकऱ्यानी ही समस्या पूर्ण करण्याची रसिकाना विनंती केली आहे. डॉ. केतकरानी आपल्या कादबऱ्यात अनेक ठिकाणीं या समस्येचे स्पष्ट उत्तर देऊन टाकलें आहे. समाजातील लब्धप्रतिष्ठिताच्या आणि बोलक्या सुधारकाच्या वैयक्तिक आचारविचारातील विसंगति उकलून दाखविण्याचा प्रसग आला म्हणजे केतकरांना निराळेंच स्फुरण चढते. गोंडवनांतील प्रियंवदा या कादंबरींतील शारदाबाईंनी ढोंगी दाक्षिण्यावर पुढीलप्रमाणे कोरडा ओढला आहे.

"दाक्षिण्य खरेंखुरें फारच थोडया लोकात सापडतें. सुंदर व तरुण स्त्रियांना उठून खुर्ची देणारे व वृद्ध स्त्रियाकडे दुर्लक्ष करणारे लोक आपल्या समाजात पुष्कळ आहेत."

आणि खुद्द गडकऱ्यानीहि एका ठिकाणीं आपल्या सामाजिक आचारातील दांभिकपणावर अशीच स्पष्ट टीका केली आहे. रामलाल गीतेला म्हणतो—

"तुझ्यासारख्या कुरूप विधवेबद्दल सहानुभूति वाटण्याइतकी व्यापक सुधारणा अजून आपल्या समाजात जन्मली नाहीं!...... माझ्या उदाहरणावरून मला वाटावयाला लागलें आहे कीं, आमची सुधारणेंत बरीचशी आत्मवचना आहे! अनाथ बालविधवेची दया येण्याबद्दलही आम्हाला चागल्या चेहेऱ्याचा आधार लागतो. आमची सुधारणा अद्याप डोळ्यांपुरतीच झालेली आहे!" (एकच प्याला, अंक ५, प्र. ३)

मूर्तिभंजनाचे, आचारस्वातंत्र्याचे, व विचारस्वातत्र्याचे विचार स्पष्टपणें प्रकट करणारा केशवसुतासारखा नवीन प्रवृत्तींचा वारसा घेऊन आलेला कवि परंपरेविरुद्ध, जीर्ण सकेताविरुद्ध, बड करून उठणे ही अगदी स्वाभाविक अशीच गोष्ट आहे. ठराविकपणाविरुद्ध आणि रूढींच्या व नियमांच्या जाचाविरुद्ध ओरड करणें हा बहुतेक साऱ्या स्वछंदवादी कवींचा जन्मजात स्वभावच असतो असे म्हणावयास हरकत नाही. रेंदाळकरानी हें केलें आहे, 'बी' कवींनी हे केलें आहे, आणि बालकवींनीहि हें केलें आहे. मग याच प्रभावळींतील गडकरी याला अपवाद कसे ठरावे? परंपरागत जीर्ण विचाराविरुद्ध, निर्जीव नियमांविरुद्ध, व ठराविकपणाविरुद्ध गडकऱ्यांनी अनेक ठिकाणीं कडक उद्गार काढले आहेत. नवीन क्रांतिकारक बंडखोर सामाजिक विचार प्रसृत करूं पाहणाऱ्या व व्यक्तिवादाचा पुरस्कार करणाऱ्या केशवसुती संप्रदायांतील कवीला हें शोभेसेंच नाही काय? पक्ष्यांना उद्देशून कवन लिहिण्याचे काम अनेक कवींनी केलें आहे. पण कवन लिहिण्यास पात्र असलेल्या पक्ष्यांची संख्या फारच थोडी

आहे. कोकिळा, राघू, मैना, मोर, इत्यादि मोहक पक्ष्यांवर कवन लिहिण्याचे काम कोणीहि सहज करील. पण घुबडाला उद्देशून कविता लिहिण्याचे व त्याच्याशीं तादात्म्य पावण्याचे धाडस कोण करील? घुबडावर कविता लिहिणें हीच गोष्ट ठराविकपणाविरुद्ध बंडाची द्योतक नाही काय? ठराविकपणाविरुद्ध तक्रार करण्याच्या लालसेने लिहिलेल्या घुबडास—या कवितेत गडकऱ्यानी ठराविकपणाविरुद्ध आपली तक्रार अगदी स्पष्टपणे नोंदविली आहे. घुबडाचे आवाहन करण्याची ही कल्पना गडकऱ्याना आपले गुरु जे केशवसुत त्यांच्या घुबड या कवितेवरूनच सुचली आहे यात शंका नाही. नियमाना, सकेताना, निरर्थक परंपराना विटलेले गडकरी घुबडास—या कवितेंत 'ठराविकाला लाथ मारुनी नभासही उल्लंघूं' अशी ठराविकपणाविरुद्ध ललकारी देत आहेत. याहिपेक्षा अधिक स्पष्ट उद्‌गार पुढील ओळींत आढळतील.

ठराविकानें मग जे भरले,
ठराविकचिं ते आता निजले,
ठराविकचि रीतीने मेले,
स्मशानातला जलसा अपुला, चला गावया लागू

एका बालकवीस या कवितेतहि गडकऱ्यानी जीर्ण रूढींचा, नियमाचा, संकेतांचा, ठराविकपणाचा स्पष्ट शब्दात निषेध केला आहे.

ठराविकाला, नियमाला ॥ बधाला, जड जगताला ॥
जीव पहा त्रासुनि जाई ॥ नको नकोसे त्या होई ॥

*  *  *

नियमानी झालो ठार ॥ ठराविकाने बेजार ॥

*  *  *

चिखलदाट हा जगताचा ॥ रूढीचा, निर्बंधाचा ॥

हा ठराविकपणा, हे निर्बंध, हे नियम, या रूढि केवळ सामाजिक क्षेत्रापुरत्याच मर्यादित आहेत असें समजण्याचें कारण नाही. वाङ्मयाच्या क्षेत्रांतहि हा स्वच्छंदपणा, अनिर्बंधपणा, स्वैरपणा, स्वच्छंदवादी कवींना अभिप्रेत असतो. 'कविकृष्णाच्या नियमका हे महाराष्ट्रदेशा' या

ओळींत केशवसुतांच्या नियमक कवितेच्या आसक्तीचे वर्णन करीत असता अभावितपणें गडकऱ्यांनी काव्याच्या क्षेत्रातील अनिर्बंधपणाचेंच कौतुक केलें नाही काय ?

कधी कधी अनिर्बंधपणाच्या या आसक्तीचा आशय आध्यात्मिक स्वरूपाचाहि असूं शकेल. अनेकविध सामाजिक अन्यायानी गजबजलेल्या व विसगतींनी भरलेल्या या अपूर्ण मानवी जगतातील संकुचित वातावरणाचा त्याग करून अमर्याद व विशाल वातावरणात प्रवेश करण्याची तळमळ काही वेळा विचारप्रधान माणसाला लागते. उदाहरणार्थ, ' घन तमीं शुक्र बघ राज्य करी ' या कवितेत ताब्यानी ही अनिर्बंधपणाची आसक्ति पुढीलप्रमाणें प्रकट केली आहे.

ये बाहेरी अंडे फोडुनि
शुद्ध मोकळ्या वातावरणीं
का गुदमरशी आतच कुढुनी ?
रे ! मार भरारी जरा वरी.

' बंद तटातट तोड सख्या ' असेहि ताबे आणखी एका कवितेंत म्हणतात. अनेक प्रकारच्या बंधनाच्या व नियमाच्या जाचाविरुद्ध रेंदाळकरानीहि स्पष्ट शब्दात तक्रार केली आहे. माझें राज्य या कवितेंत रेंदाळकरानीं निर्बंधाच्या पलीकडे जाण्याची लालसा बाळगली आहे.

तेथें नाही भीति तेथें नाही बंध बसून स्वच्छंद गाणीं गावी !

* * * *

सोडा बंध सारे घाणेरडे पाश

बंधनाच्या पलीकडे जाऊन स्वच्छंद जीवनाचे सुख प्राप्त करून घेण्याची गडकऱ्यांची तळमळ कवि आणि कैदी या कवितेंत उत्कृष्टपणें प्रकट झाली आहे.

" संसृतीच्या पाशात सापडलेला आत्मा एखादे वेळीं तरी आपल्या परिस्थितीच्या वर जाण्याचा विचार करतोच...अविकारी आत्म्याच्याच कवि आणि कैदी अशा दोन बाजू आहेत. "

अशी प्रास्ताविक टीप जोडून गडकऱ्यांनी या कवितेंत प्रकट झालेला अनिर्बंध जीवनाचा हव्यास आध्यात्मिक स्वरूपाचा आहे अशी मखलाशी करण्याचा प्रयत्न केलेला असला तरी सामाजिक बंधनाच्या व जीर्ण वाङ्मयीन संकेताच्या व नियमाच्या, किंबहुना सर्वच निर्बंधाच्या पलीकडे जाण्याची धडपडहि या कवितेंत पर्यायाने प्रकट झालेली आहे असें मला वाटते. बंधनानी भरलेल्या क्षुद्र संकुचित जीवनाचा धिःकार व त्या जीवनातून विशाल वातावरणात प्रवेश करण्याची तळमळ या गोष्टी पुढील ओळीत व्यक्त झालेल्या आहेत.

मारीं गरुडभरारी गगनीं,
सुख ते शेणकिडा का जाणी !
जाई शेणामधेंच कुजुनी !
सुखाचा वैरी । चल तोड बंधनें सारीं !
असल्या शेणकिड्याच्या जाती,
जिकडे तिकडे बुजबुज करिती,
केवळ मरण्यासाठी जगती,
येत ओकारी ! चल तोड बंधनें सारीं !

* * *

बसुनी तेथे तीन्ही काळी,
पाहुनि मूर्खपणाच्या चाली,
जगता हसू गालिंच्या गालीं,
ब्रह्मानंदीं । रंगुनी स्वैर स्वच्छंदीं !

या कवितेत गडकऱ्याना ठराविकपणाचा धिःकार करून व्यक्ति-जीवनातील स्वातंत्र्यवादाचा पुरस्कार करावयाचा आहे असें स्पष्ट दिसतें. बंधनातून बाहेर पडून व्यक्तित्वाचा विकास करण्याची लालसा ' बी ' कवींच्या पिंगा या कवितेत पुढीलप्रमाणे प्रकट झाली आहे. गडकऱ्यांच्या कवितेंतील तळमळीप्रमाणेच याहि कवितेतील तळमळ आहे.

पिंगा माझा सोन्याचा,
पंजर रत्नाचा त्याचा,
पहा ! उघडिलें दाराला,

पिंगा आकाशीं गेला !
दुर्बलपण पहिले गेले,
क्षुद्रपणातुन मी सुटले,
जर्णि बध सारे तुटले
मी माझी मज सापडलें !

नवीन सामाजिक उदारमतवाद, मूर्तिभंजन, नवसमाजनिर्मितीची तळमळ, बंधनांतून व नियमाच्या तावडींतून सुटून संकुचितपणाच्या बाहेर पडण्याची धडपड, ठराविकपणाविरुद्ध बंड, आणि व्यक्तिजीवनांतील स्वातंत्र्यवाद या गोष्टी केशवसुतानी आपल्या भोवतालच्या परिस्थितींतून आत्मसात् केल्या होत्या. त्या त्याच्या अनेक कवनातून प्रकट झाल्या; आणि या कल्पनांनी भारून गेलेल्या गडकऱ्यानी त्याचे पडसाद आपल्या काव्यात व नाटकात ठिकठिकाणीं उमटविले आणि केशवसुताचा उदारमतवादी व व्यक्तिवादी सप्रदाय पुढे चालू राहण्यास हातभार लावला.

आगरकराच्या व केशवसुताच्या विचारसरणीने गडकऱ्याच्या मनावर अगदी शेवटपर्यंत वर्चस्व गाजविलें हे लक्षात ठेवले पाहिजे. प्रेमसंन्यासात विधवेवर होणाऱ्या अन्यायाविरुद्ध जी तक्रार गडकऱ्यानी जयताच्या तोंडून केली आहे त्याच प्रकारची तक्रार **एकच प्याला** या आपल्या शेवटच्या काळातील नाटकातहि भगीरथाच्या तोंडून त्यानी वदविली आहे. भगीरथ शरदला म्हणतो—

"धर्मामुळं म्हण, रूढीमुळं म्हण, पुरुषांच्या स्वार्थबुद्धीमुळं म्हण, पण तुम्हा विधवाची हिंदुसमाजात मोठी विटंबना चालली आहे. ...बालविधवानीं जितेपणीं नरकयातनात तळमळत पडून आयुष्य कोणत्या सुखात कठीत रहाव म्हणून विचारलं, तर पोक्त बुद्धीचे हे धर्मसिंधु लागलीच गंभीरपणान म्हणतील कीं, आप्तेष्टांचीं मुल खेळवीत बसल्यानं विधवाना जे सात्त्विक समाधान होतं त्यापुढं वैधव्याच्या यातनाची काय प्रौढी आहे ?"

भगीरथाचें हें भाषण वाचल्याबरोबर १९१२ च्या सुरवातीला लिहिलेल्या **प्रेमसंन्यासां**तील जयताच्या भाषणाची आठवण होणे अगदी

अपरिहार्य आहे. केशवसुतांचा प्रभाव गडकऱ्यांच्या मनावर किती प्रकारांनी झालेला होता हें पाहिले म्हणजे केशवसुताचा सच्चा चेला हें त्याचे बिरुद कांही बाबतींत तरी अगदी सार्थ वाटतें !

व्यक्तिवाद, स्वातंत्र्यवाद, सामाजिक क्षेत्रांतील उदारमतवाद व जीर्ण रुढींवर हल्ला या बाबतींतच तेवढे गडकऱ्यानी केशवसुताचें ऋण घेतले होतें असें नसून केशवसुताच्या मनोभूमींत दृढमूल झालेल्या आणखीहि कांही गोष्टींचा वारसा गडकऱ्याच्याकडे आलेला आहे. सारे जग काळोखाने भरलेलें असून 'मृत आशाच्या' चितावरून आपलें पिशाच भटकत आहे असे आर्त उद्‌गार काढणाऱ्या केशवसुतांचे जीवन ज्या औदासीन्याने व्यापून टाकले होते त्याच—किंवा त्याहिपेक्षा अधिक कडवट—औदासीन्याने गडकऱ्याचेहि सारे भावजीवन व्यापले होते. एकाताची आसाक्ति, 'निगूढ' गीतातील मर्म उकलून काढण्याचा हव्यास, अज्ञेयाचा मागोवा घेण्याची तळमळ इत्यादि गोष्टी कमीअधिक प्रमाणात दोघातहि दिसून येतात. सृष्टींत सर्वत्र काव्य व सौंदर्य भरलेले असून तें रसिकतेने टिपून घेणें हें कवीचे कार्य होय हे केशवसुताचे मत गडकऱ्यांनाहि अभिप्रेत आहे.

तथापि केशवसुताच्या मनोवृत्तींत नसलेल्या व इतर स्वच्छदवादी कवींत दिसून येणाऱ्या काही गोष्टी गडकऱ्याच्या ठायीं दिसून येतात. एक प्रकारची अनिर्वचनीय हुरहूर ( इग्रजीत याला 'रोमॅंटिक लॉंगिंग' म्हणतात. ), गतकालातील अनेक सुखद स्मृतींत तल्लीन होऊन जाण्याची लालसा, ऐतिहासिक काळातील गूढरम्य घटनाच्या सौदर्यात रममाण होण्याची प्रवृत्ति या गोष्टींचा प्रभाव गडकऱ्याच्या मनावर विशेष आहे. त्याच्या कल्पनाविलासाची जातहि केशवसुताच्या कल्पनाविलासापेक्षा अगदी निराळी आहे. आणि सर्वात महत्त्वाची गोष्ट म्हणजे आपल्या अनेक प्रेमगीतांमधून गडकऱ्यानी स्त्रीपुरुषामधील प्रणयभावनेच्या विविध छटा प्रकट केल्या आहेत, प्रणयासक्तीने बेभान झालेल्या व्यक्तीच्या मनाची धुंद अवस्था त्यानी वर्णिली आहे, आणि प्रणयनैराश्याच्या अत्यंत दारुण व्यथांचे

त्यांनी उत्कट आविष्करण केलें आहे. या साऱ्या गोष्टीचा लेशहि आपणांस केशवसुताच्या कवनामध्ये दिसून येणार नाही. या महत्त्वाच्या बाबतींत गडकऱ्यांनी आपलें वेगळेंपण अगदी स्पष्टपणें जगाला दाखवून दिलें असून केशवसुतानी पोसलेल्या नवीन संप्रदायाच्या आम्रतरूवर अत्यंत नाजूक व पराकाष्ठेची मोहक अशी प्रणयाची अतिमुक्तलता त्यानी चढविली आहे, आणि त्याची मूळची शोभा शतगुणित केली आहे.

---

# ३. मोरपिसावरचा डोळा

— आणि जीविता, लाभ हाच का तुझ्या सगती राहुनिया ?
असेच जाणे असे सदा का कालौघावर वाहुनिया ? १

नेहमीच अमर्याद आशा करीत राहणे ही गडकऱ्यांच्या भावनाप्रधान मनाची सहज प्रवृत्ति होती. भावनाप्राधान्याला काव्यात्मकतेची जोड मिळालेली असली म्हणजे स्वप्नसृष्टींत रगून जाणें व सत्यसृष्टीकडे पाठ फिरविणे ही गोष्ट अपरिहार्यच ठरते. मनाची अशी वृत्ति एकदा झाली म्हणजे काणेकरानी वर्णिल्याप्रमाणें

गुंफीत कल्पनाजाला गुगणे,
गुरफटुन त्यात जीवाला टाकणे,
रंगीत स्वप्नसृष्टीला, उठविणे,
ही स्वप्नसृष्टि पटतसे जिवाला वेड्या
ही सुवर्णलका दिपवित अवघी हृदया

अशी हृदयाची बेभान अवस्था होते. सत्यसृष्टीचा त्याग करून कल्पना-सृष्टींत किंवा स्वप्नसृष्टींत विहार करण्याची मनाला सवय जडली म्हणजे आशांचा व अपेक्षांचा अमर्यादपणा इतका वाढतो की, त्यामुळे भोवतालचें जग सर्व बाबतींत पराकाष्ठेचें प्रतारणा करणार आहे असें वाटूं लागते.

प्रेमसंन्यासांतील जयत म्हणजे स्वतः गडकरीच होत यांत कांहीच शंका नाही. अर्थात् प्रेमसंन्यास हें गडकऱ्यांचें आत्मचरित्र नाही हें कधीच

विसरतां यावयाचें नाही. जयंताच्या व्यक्तिरेखेंतील अनेक गोष्टी स्वतः गडकऱ्यांच्या आंतरिक जीवनातून उद्‌भूत झाल्या आहेत इतकाच याचा अर्थ आहे. जयंताच्या जीवनांतील प्रत्येक गोष्ट गडकऱ्यांच्या प्रतीतींतून निर्माण झाली आहे असे समजण्याचें कारण नाही. कल्पनेच्या काव्यानंदावर तरंगत राहणे, वस्तुस्थितीकडे पूर्णपणें दुर्लक्ष करून रंगीत स्वप्नसृष्टीमध्ये धुंद होऊन राहणें, उत्कट भावनेच्या ओघाबरोबर अगदी स्वैरपणें वाहत जाणें, या गोष्टी जयंताच्या रक्तात भिनलेल्या आहेत; आणि हीं सारीं वैशिष्ट्यें खास गडकऱ्यांचींच आहेत हे त्याचें भावजीवन काळजीपूर्वक पाहिलें असता सहज दिसून येईल. जयंत ज्याप्रमाणे अद्‌भुत काव्यसृष्टींत गुंगलेला होता त्याप्रमाणे गडकरीहि होते. काव्यात्म, भावनावश स्वभावामुळे त्यानी आपल्या आकांक्षाचें एक उत्कृष्ट कल्पनाचित्र हृत्पटलावर आशेच्या नाजूक कुंचलीने चितारले होते. आपली अद्‌भुत काव्यसृष्टि व्यवहाराच्या वस्तुस्थितींत कधीच उतरण्यासारखी नाही या सत्याची जाणीव त्याना नव्हती असें नाही. तथापि वेड्या, भावनावश जीवाला रंगीत स्वप्नसृष्टीचा मोहच असा कांही अनावर असतो की, त्या मदिर वातावरणातून मनाला खेचून आणणें त्याला जमतच नाही. लीला ज्याला 'स्वप्नातलें स्वप्न' म्हणते त्याप्रकारचें दुष्प्राप्य जीवन वस्तुस्थितींत सफल होण्याची शक्यता जेव्हा नसते तेव्हा, भावनाप्रधान मनुष्य प्रतिभेची देणगी घेऊन जन्माला आला असेल तर, कलेच्या क्षेत्रात आपल्या विफल आशाची व आकांक्षाची तो भरपाई करून घेतो. अर्थात् यामुळे मनाला जरी काही काळ समाधान लाभलें तरी ते समाधान इंद्रधनुष्यांतील मोहक परतु तरल रंगच्छटाप्रमाणें पाहतां पाहता नाहीसें होते आणि मनुष्य अधिक पर्युत्सुक होतो, बेचैन होतो हेंहि विसरतां यावयाचे नाही. या दृष्टीने जयंताचे पुढील उद्‌गार फार अर्थपूर्ण आहेत.

"देवा, अद्‌भुतरम्य काव्यसृष्टि जर व्यवहाराच्या वस्तुस्थितींत कधींच उतरण्यासारखी नसेल तर प्रतिभाशाली कवि निर्माण करून त्याच्या आशापूर्ण भविष्यचित्रांनीं तरुणांना नसता मोह कां पाडतोस!"

गडकऱ्यांची सारी हयात अमर्याद आशा—अगदी वेडया आशा—उराशी कवटाळून त्या सत्यसृष्टींत विफल झाल्यामुळे परिणामीं होणाऱ्या वेदनांचें तीव्र दु:ख अनुभविण्यातच खर्च झाली. अमर्याद इच्छा करणाऱ्या निराश मनाची करुण कहाणी असेंच त्याच्या जीवनाचें वर्णन करावें लागेल.

गडकऱ्याच्या आशेची भरारी गरुडाच्या भरारीलाहि लाजवील अशी होती; आणि उलट त्याच्या भोवतालचें व्यावहारिक जीवन व त्याचें स्वत:चें कौटुंबिक जीवन या दोन्ही गोष्टी त्याच्या आशेने रंगविलेल्या कल्पनाचित्राच्या मानानें अत्यंत सामान्य होत्या. वैयक्तिक जीवन परिपूर्ण करून आणि भोवतालच्या सहानुभूतिशून्य व उद्वेगजनक गोष्टींनी बुजबुजलेल्या व्यावहारिक जगाशी सग्राम करून त्यात विजयी होण्याचे मानसिक सामर्थ्य त्याच्या ठायीं मुळीच नव्हते. दौर्बल्य हे तर भावनावश कवींच्या जीवनाचें सार असतें. गडकऱ्याच्या बाबतीतहि तेच झालें. आपल्या दौर्बल्याची त्याना जाणीव होती आणि ही जाणीव त्यानी प्रकटहि केली आहे. आपली असमर्थता आणि अमर्याद आशा याच्यामधील तीव्र विरोध गडकऱ्याना नेहमी जाणवत असे याचा पुरावा हाय हाय या त्याच्या कवितेच्या अप्रकाशित भागांत आढळतो.

> शक्तिहीनता दिली का अशी, असल्या इच्छा का,
> अनोळखीला उच्छृंखल मन मारित का हाका ?

प्रेमसंन्यासाने गडकऱ्यांना अमाप कीर्ति मिळवून दिली, व त्या काळात बरीच मोठी वाटणारी ' दौलत ' सुद्धा त्याना मिळवून दिली. महाराष्ट्रनाटकमंडळीने गडकऱ्याना प्रेमसंन्यासाबद्दल पांचशे रुपये दिले असें ऐकिवात आहे. भोवतालच्या व्यावहारिक जगांतील अनेक प्रकारच्या कटुतेचा साक्षात् अनुभव घेऊन विषण्ण झालेल्या गडकऱ्याच्या मनाला या मानसन्मानामुळे व पैशामुळे किती तरी हायसे वाटलें असेल. पण अमर्याद इच्छा करणें हा त्याचा स्वभावधर्मच असल्यामुळे आणि स्वभावधर्माला कसलेंहि औषध नसल्यामुळे प्राप्त परिस्थितींत समाधान मानून घेणें त्यांना कधीच जमले नाहीं. जगाच्या दृष्टीने त्याची स्थिति १९१२ मध्ये पुष्कळच सुधारलेली होती. परंतु विपरीत अनुभवांमुळे म्हणा, अथवा प्रकृतिधर्मच तसा

म्हणून म्हणा, त्याच्या चित्ताला ग्रासून राहिलेल्या विषण्णतेने त्यांचा हयातभर कधीच त्याग केला नाही. अगदी मायेने व ममतेने ती त्यांच्याजवळ सदैव राहिली. जें सुख प्राप्त झाले असेल त्यात समाधान न मानतां त्यांचे मन अधिक सुखाच्या मृगजळामागे एकसारखे वेड्याप्रमाणें धावत होतें. प्रेमसंन्यासाने मिळवून दिलेल्या धनदौलतीवर ते किती दिवस समाधानाचा दिमाख मिरवूं शकले असते ? त्याचा स्वभाव नेहमीच लहरी, हट्टी व पराकाष्ठेचा खर्चिक असे. पैशाला त्याचा हात लागताच पाऱ्याच्या गोळीप्रमाणें तो त्या हातातून निसटून जात असे. कुटुंबाचा दैनदिन खर्च चालविण्याची त्याना नेहमी भ्रांत पडत असे. त्याच्याजवळ असलेली अत्यल्प पुंजी हिरवळींत सळसळणाऱ्या चवचाल नागिणीप्रमाणें क्षणार्धात अदृश्य होत असे. आणि खर्चावयास पैसा नसला व खर्च करणे जरुरीचेच झाले म्हणजे सारा स्वाभिमान विसरून ते स्नेह्यासोबत्याकडून हातउसनवारी करीत. गरज ही त्याची शेजेची सोबतीणच होती ! किती लोकाकडून पैसे उसने घेण्याची पाळी त्याच्यावर येत असेल ते ' राम ' जाणे ! उसने घेतलेल्या पैशांची परतफेड करणे त्याना कितपत शक्य झाले असावे ही गोष्टहि वेदान्तातील मायेइतकीच अगम्य आहे. प्रेमसंन्यासाच्या निमित्ताने नाटकमडळीच्या बिऱ्हाडीं त्याचे वरचेवर हेलपाटे सुरू झाले, आणि नाटकमंडळींतील फदी लोकहि त्याच्या मकाणात वरचेवर जाऊ लागले. कसबा गणपतीच्या पलीकडे असलेल्या पिंपळपारासमोरील सिन्नरकराच्या वाड्यातल्या त्याच्या त्या दीनवाण्या मकाणात आल्यागेल्याचे आगतस्वागत मुक्तहस्ताने करण्याचे मुळीच सामर्थ्य नव्हतें. तरी सुद्धा दिलदारपणा वृत्तींत मुरलेला असल्यामुळे गडकरी या बाबतींत आपल्या सामर्थ्याच्या बाहेर खर्च करीत असत हें अनेकाना चागले माहीत आहे. चचल लक्ष्मी पाहता पाहता अदृश्य झाली म्हणजे गडकरी हताश होत, कष्टी होत, आणि मनातल्या मनात कुढूं लागत. पैशाच्या बाबतींतील त्याची ओढगस्त विलक्षण असल्यामुळे स्वास्थ्य व समाधान या गोष्टीना ते कायमचेच पारखे झाले होते. या गोष्टींची त्याना साधारण मानाने जरी प्राप्ति झाली असती तरी त्यांच्या कवित्वाचा फुलोरा अधिक तजेलदार झाला असता आणि त्यांच्या काव्यावर सर्वत्र जी

औदासीन्याची अवकळा पसरलेली दिसते ती कमी झाली असती. आशेने निर्मिलेलें कल्पनाचित्र व वस्तुस्थिति याच्यामधील विलक्षण विरोध अधिक उत्कटतेने प्रतीत होऊं लागल्यामुळे भोवतालचे व्यावहारिक जग पराकाष्ठेचें फसवें आहे, तें अत्यंत हिणकस आहे, अपूर्णतेने ओतप्रोत भरलेलें आहे, असा गडकऱ्याचा दृढ समज झाला. मोरपिसावरचा डोळा या उत्कृष्ट कवितेत केवळ वरवरच्या देखाव्याने भरलेल्या जगाचा अमर्याद फसवेपणा गडकऱ्याना उघड करून दाखवावयाचा आहे. या उसन्या देखाव्याच्या मोहक मायेने अनेक भोळे जीव प्रत्यहीं कष्टी होत असले पाहिजेत. काळ्या शालूवर सुबक बुट्टे खुलून दिसावेत, किंवा निळ्या आकाशात तारकाची शोभा दिसावी, त्याप्रमाणें मोरपिसावरच्या डोळ्याची शोभा दिसते. ते मोहक आहेत यात शकाच नाही, पाहणाराच्या डोळ्याना भुरळ पाडण्याचे सामर्थ्यहि त्याच्या ठायीं आहे. पण ते निर्जीव आहेत, ही सौंदर्याची केवळ भूल आहे, हे डोळे फसवे आहेत, हा विचार मनात आल्याबरोबर चित्ताचा विलक्षण दाह होतो. सारेच जग असे फसवे असेल काय ?

> मोहकता नर आहे खास । खोटी ती त्याजवळि जगास ।
> वाटे सौंदर्याचा वास । असावा त्यात । ग्रह पहिला बवना होन ॥
>
> क्षणमात्राची मोहकता ही । चचलतेने चमकन राही ।
>
> *　　　*　　　*
>
> कितीक असले फसवे डोळे । रगी बेरगी जणु गोळे ।
> जगात पाहुनि फसती भोळे । दे ही जोड । देवा ने डोळे फोड ॥

शेवटच्या ओळीतील वैताग विलक्षण असला तरी जगाच्या फसवेपणामुळे ज्याची दारुण वचना झालेली आहे अशा हळुवार अतःकरणाच्या मनुष्याच्या व्यथाची सारी आर्त उत्कटता तिच्यात प्रकट झालेली आहे.

१९०९ च्या मे महिन्यात अल्लड प्रेमास ही गडकऱ्याची कविता प्रसिद्ध झाली. या वेळीं गडकरी जेमतेम चोवीस वर्षांचे होते. परतु तारुण्याच्या उंबरठ्यावरच जगाचे कटु अनुभव त्याना आले असले पाहिजेत. जगाच्या फसवेपणाचा जो उबग त्यांना हा वेळपर्यंत आला असेल त्यापोटीं स्वैर

भ्रमण करण्यापासून व अमर्याद आशा बाळगण्याच्या वेडेपणापासून त्यांनी आपल्या वेड्या प्रेमास परावृत्त केलें आहे.

> क्षणभर वेड्या प्रेमा थाब !
> अधिर मनासह जासी कोठे ?
> चुकशिल–सकटिं पडशिल वाटे
> जग हें सारे बा रे खोटे !
>
> * * *
>
> जग सगळे हे देखाव्याचे
> गुलाम केवळ रे स्वार्थाचे !
> स्मशान की हें शुद्धत्वाचें ...

भोळ्या जीवांची दारुण वंचना करण्याचे जगाचे सामर्थ्य वरील दोन कवितांपेक्षाहि जीवितास या सुंदर गीतांत अधिक उत्कटतेने प्रकट झालें आहे. जगाचे रंग प्रतिक्षणाला बदलत असल्यामुळे आशानिराशेचे हेलकावे सहन करणे हीच एक गोष्ट माणसाच्या हाती उरते. जीवताचा लाभ हा इतकाच का ? असा प्रश्न अगदी कळवळून गडकऱ्यानी विचारला आहे.

> — आणि, जीविता, लाभ हाच का तुझ्या सगती राहुनिया ?
> अमेच जाणे असे सदा का कालौघावर वाहुनिया ?

गडकऱ्याच्या या ओळी वाचताच टेनिसन्‌च्या पुढील ओळींची आठवण होणे अपरिहार्य आहे.

> Death is the end of life, ah, why
> Should life all labour be ?
> Let us alone. Time driveth onward fast,
> And in a little while our lips are dumb.

जगाच्या फसवेपणामुळे भावनावश मनाची होणारी केविलवाणी अवस्था गडकऱ्यांच्याच शब्दात देणें बरे.

> दिव्यदर्शने हृदयपटावर नवरंगानी रेखावी ।
> आणि आतल्या अश्रूंनीं ती सर्वेंच धुवुनी काढावी ॥
> अवश्य जीवश्वसने निर्दय नि.श्वासांनीं योजावीं ।
> हृदयजलाने भरता नयनें गेली घटिका मोजावी ॥
>
> * * *

पहिला क्षण तो कीं ज्यावरतीं स्वप्रकाश आशा धाडी ।
दुज्या क्षणावरि तीव्र निराशा छाया प्रेतमया पाडी ॥

* * *

रंग बदलुनी खेळत राही अशा क्षणाची ही जोडी ।
स्थलकालाच्या भिन्नत्वाने नित्य नवी दिसतीं कोडीं ॥

* * *

फसव्या पाण्यावरी पोहुनी, दम कोंडुनि मरता मरता ।
'गोविंदाग्रज' म्हणे, जीविता ! लाभ तुझा नच या परता ॥

आशानिराशेच्या या विचित्र व जीवघेण्या खेळाला 'जीवन' हें मनोहर नांव दिलेलें असते यापरता वदतोव्याघात कोणता असेल ? गडकऱ्यांच्या या कवितेचें शेलीच्या Lift not the painted veil या शब्दांनी सुरू होणाऱ्या याच विषयावरच्या एका सुनीताशीं विचारदृष्ट्या फार विलक्षण साम्य मला दिसून आलें.

शेलीच्या पुढील ओळींतहि जीविताच्या स्थिरपणाविषयींचा व चांगुलपणाविषयींचा अविश्वास प्रकट झालेला दिसून येईल.

The flower that smiles to-day
To-morrow dies;
All that we wish to stay
Tempts and then flies.
What is this world's delight ?
Lightning that mocks the night,
Brief even as bright.

असलें हें फसवें मानवी जीवित अनेक दृष्टींनी अपूर्ण व हिणकस आहे याची कवीच्या मनाला मोठीच खंत लागून राहिलेली आहे. जीवन सुखाने व समृद्धीने पूर्ण असावे असें आपल्याला नेहमी वाटत असतें. पण तें तर अनेक व्यथांनी ओतप्रोत भरलेलें आहे. रडगाण्याखेरीज आणि नैराश्याच्या आर्त किंकाळ्यांखेरीज जगांत दुसरें काय आहे ? गडकरी म्हणतात,

'असें–असावे' याच्या सीमा अपूर्णता ही दावितसे ।

या असल्या अपूर्ण जगात—

आम्ही गातों जें गाणें, ते जगताचें रडगाणें ।

हृदयी भरला जो त्रास, तो कविताचरणी प्रास ।

गडकऱ्यांच्या या ओळी वाचताच मला शेलीच्या त्या प्रसिद्ध ओळींची आठवण झाली.

We look before and after,
And pine for what is not :
Our sincerest laughter
With some pain is fraught;
Our sweetest songs are those that tell
of saddest thought.

---

## ४. सुकलें फूल न देत वास....

That moment is gone for ever,
Like lightning that flashed and died,
Like a snow-flake upon the river,
Like a sunbeam upon the tide,
Which the dark shadows hide

—*Shelley*

नानापरिची पुष्पें सुकती सुवास येइना फिरून ।

—सगनभाऊ

अस्थिरता, चंचलता हा मानवी जीविताला मिळालेला अभिशाप आहे. वाऱ्याच्या लहरीबरोबर स्वैरपणें तरंगणाऱ्या फूलपाखराचा लोभसवाणा पंख बोटाच्या चिमटींत पकडण्याचा प्रयत्न करावा, त्याचा स्पर्शहि बोटांना जाणवावा,—आणि ते फूलपाखरू दृष्टीपुढे तरळून क्षणार्धांत अदृश्य व्हावें; किंवा निळ्या आकाशात संध्याकालीन मोहक रंगच्छटांची शिंपण झालेली असावी, आणि रुप्याच्या शलाकेप्रमाणें तळपणारी विद्युल्लता लवून क्षणार्धांत हरपावी, त्याप्रमाणे मानवी जीवितांतील सुखाचे क्षण कालाच्या अथांग प्रवाहांत पाहता पाहता विरून जातात; आणि त्या क्षणांशीं कायमच्या निगडित झालेल्या स्मृतींना पुनः पुनः उजळा देऊन पूर्वी अनुभविलेल्या सुखाच्या लहरींच्या पुनःप्रत्ययाने शरीर आणि मन पुलकित करून सोडणें एवढेंच आपल्या हातीं उरतें.

How Time is slipping underneath our feet

या उमर खय्यामच्या उद्‌गारांत आपल्या सार्‍यांचीच हुरहूर प्रकट झालेली आहे. गतकाळ अनेक दुःखांनी भारावलेला असला तर त्यांतील अनेक व्यथाची आठवण आजच्या दुःखाची तीव्रता वाढविण्याखेरीज दुसरें काही करूं शकत नाही. यामुळे त्या आठवणी विस्मृतीच्या दाट धुक्याआड दडलेल्याच बऱ्या असे ' अतिदुःखाच्या तीव्र अनुभवें ' हळव्या बनलेल्या हृदयाला वाटणे स्वाभाविक आहे. गतकाळाचें चिंतन म्हणजे असह्य यातनाची केवळ उजळणी, आणि आजच्या यातनात भर, अशी जर स्थिति असेल तर त्या स्मृतीचा उपयोग तरी कोणता ? त्यापेक्षा माणसाला स्मृतीच प्राप्त झाली नसती तर ! परंतु गतकाळात अनंत असह्य व्यथांनी कमालीचा मनस्ताप दिलेला असला, आणि वर्तमानकाळात आपल्या जीवनांत सुखाचा पहाटवारा वाहत असला तर त्या व्यथाच्या स्मृति सुसह्य होतात. इतकेंच नव्हे तर त्या स्मृति सुखकारकहि होतात. ऐश्वर्यशाली प्रासादामध्ये सुखाचा आस्वाद घेण्याचे भाग्य प्राप्त झालेल्या सीतेला आणि रामाला गतकाळात दडकारण्यांत अनुभवाव्या लागलेल्या कटु यातनाच्या स्मृतीने संतोषच वाटला असें कालिदासाने जे वर्णन केले आहे त्यात मानवी मनाचें मर्म साठविलेलें आहे. याच्या उलट चालू क्षण दुःखाने भरलेला असून गतकाळाशीं अनेक सुखकारक गोष्टींच्या उन्मादक स्मृति निगडित झालेल्या असतील तर त्या स्मृतींचा पुनःप्रत्यय विद्यमान क्षणीं आपल्या गांजलेल्या मनाला असह्य वेदनेशिवाय दुसरे कांहीहि मिळवून देणार नाही. गतकाळांतील सुखें आपल्यापासून काळाने केव्हाच हिरावून घेतलेलीं असतात आणि पुढे येणारा काळ सुखद असावा अशी आपली कितीहि उत्कट अपेक्षा असली तरी अनुभवाचा, प्रतीतीचा आधार तिला नसतो. पण चालू क्षणाची प्रतीति स्पष्ट येत असल्यामुळे त्याचे यातना देण्याचे सामर्थ्य मात्र जाणवत असतें. हेंच कटु सत्य प्रेमसंन्यासांतील कमलाकराच्या पुढील उद्‌गारांत सामावलेलें आहे.

" डोंगर चढताना आपण एक टप्पा चढून गेल्यावर जर मागें नजर टाकली तर मागच्या वाटेवर नुसत्या झाडांची कोंवळी

हिरवळच दिसते......हीच रमणीयता पुढच्या वाटेवरही पसरलेली दिसते; पण उलटपक्षीं, पायाखालच्या वाटेवरचा मात्र वाईटपणाच जाणवतो......हीच गोष्ट आयुष्याच्या प्रवासाची ! भूतकालाची रमणीयता वाटते ती याचमुळें......"

विद्यमान काळ स्पृहणीय नसला तर गतकाळांतील सुखाची आठवण मनाला शल्यासारखी बोचते, त्या आठवणीने आजचीं दुःखें अधिक भीषण वाटू लागतात. 'घनाधकारात दिवा जसा वनीं' अशी स्थिति बरी; पण सुखपूर्ण आयुष्यानतर दुःखाच्या वणव्यात होरपळण्याचा प्रसण येणें फार वाईट. असे नशिबीं आले तर माणसाला स्मरणशक्तीच परमेश्वराने दिली नसती तर तो त्याच्यावर मोठाच अनुग्रह झाला असता असे हळव्या भावनेला वाटले तर त्यात काही नवल नाही. हाच विचार *Happy Insensibility* या कीट्सच्या कवितेत[1] आविष्कृत झाला आहे.

असह्य यातनावर विस्मृति हें रामबाण औषध आहे असें गडकऱ्यांनी एका कवितेंत म्हटले आहे त्यातील आशय सुद्धा हाच आहे. प्रत्येक गोष्टींची, विशेषतः प्रत्येक वाईट गोष्टीची, स्मृति जर स्थिर राहिली तर माणसाला जगणेंहि अशक्य होईल, असें गडकऱ्याना सुचवावयाचें आहे.

जे जे रोग मनास होति ! हृदया सताप जो जाळतो
जे जे घाव जिवास लागुनि जगा जो नित्य कटाळतो,
त्या त्या विस्मृति हेंच औषध खरे आहे गमे एक ते,
जे लोकीं नमते तरी मग कुणी जीवत ना राहते ![2]

विद्यमान यातनामध्ये गतकाळांतील सुखाच्या क्षणाची आठवण होऊन त्या यातना अधिक दुःसह होण्यापेक्षा विस्मृति झालेली बरी असे कीट्स म्हणतो; आणि गतकाळातील दारुण दुःखाचा ताप नष्ट होण्यासाठी तरी विस्मृतीची आवश्यकता आहे असें गडकरी म्हणतात. एक गोष्ट अगदी खरी आहे की भूतकाळात असह्य व्यथा देणाऱ्या दारुण घटना घडलेल्या असल्या तर त्याची आठवणहि होऊं नये यासाठी आपलें अंतर्मन नेहमी प्रयत्नांची पराकाष्ठा करीत असतें. अंतर्मनाचे हे व्यापार अगम्य असतात

आणि आपल्याला नकळत ते होत असतात. अशा प्रकारें उद्वेगजनक गोष्टींची स्मृति दडपून टाकण्याची आपले अंतर्मन सदैव धडपड करीत असलें तरी त्याचे संस्कार अजिबात नष्ट होऊं शकत नाहींत—ते फार तर पुसट होतात, आणि अशी एखादी गोष्ट पुढे केव्हातरी घडून येते की तिच्यामुळे त्या स्मृति एकदम उफाळून येतात.

उलट, आजचा क्षण दुःखपूर्ण व नैराश्यपूर्ण असला तर गतकाळातील सुखद प्रसंगांच्या आठवणीने मन एका अनिर्वचनीय आनदाने भरुन जातें, व चालू घटकेच्या दुःखाचा त्याला क्षणैक का होईना विसर पडतो हेंहि खरें आहे. ‘ हतभागी हे जीव जगीं या स्मरणें केवळ जगतीं ’ असें गडकऱ्यानी **फणसाचें पान** या कवितेंत जे उद्‌गार काढले आहेत त्याचा हाच अर्थ आहे. यालाच पुनःप्रत्यय असे नाव आहे. फणसाचे पान दिसल्याबरोबर कवीला खूप मागे घडलेले रमणीय वृत्त आठवलें आहे. फणसाचें पान स्मृतीला उजळा देण्यास कारणीभूत झाले आहे. शास्त्राच्या परिभाषेत ते पान ‘ स्टिम्युलस् ’ ठरले आहे. स्टिम्युलस् मिळाल्याबरोबर मनाचे व्यापार सुरू होऊन त्या पानाशीं निगडित असलेली प्रणयकथा एकदम कवीच्या मनांत जशीच्या जशी पुन्हा साकार झाली; आणि त्या दूरच्या काळीं घडलेल्या घटना त्याच्या अंतश्चक्षूसमोर यथातथ्य रीतीने आविष्कृत झाल्या; त्याला तीं दूरचीं, विस्मृतीच्या धुक्यात अर्धवट गुरफटलेलीं रमणीय दृश्ये जणू आतांच, या क्षणीं घडत आहेत असा भास झाला,— नव्हे, अशी त्याच्या मनाची खात्री झाली.

फणसाच्या त्या पानावरती दिसल्या ज्या मज रेषा
कधींकाळच्या उघडुनि दाविति मनिंच्या आतरवेषा
लिहुनि ठेविली पूर्ववयामधिं कथा गोड जी पानीं
पुन्हा वाचिली, आणि जाहला सखेद हर्षहि रमणि !

* * *

सुंदर चित्रा ! मदपूर्णा ती कथा तुझी आठवते
बाले ! रमणि ! प्रणयभराने हृदय किती खळबळते.

या ओळींतील 'सखेद हर्ष' हे शब्द अत्यंत महत्त्वाचे आहेत. गतकाळातील ती रम्य घटना पुन्हा प्रत्यक्षात घडणें आता प्रतिकूल परिस्थितीपायीं शक्य नसल्यामुळे खेद होणें स्वाभाविक आहे, आणि त्या घटनेतील गोडवा थोडा वेळ का होईना, पुन्हा अनुभवावयास सापडला, आणि त्यामुळे मन मोहरून गेले, यासाठी हर्ष होणे हेहि तितकेंच स्वाभाविक आहे. तथापि गतगोष्टींच्या आठवणीने होणारा हर्ष स्पृहणीय असला तरी ते दिवस गेले, अगदी कायमचे निघून गेले, ते पुन्हा कधीहि परत येणार नाहीत, त्याचा रमणीयपणा आता प्रत्यक्षात प्रतीतीला येणार नाही, तो आता एक मधुर भास आहे, ते विरून गेलेले गोड स्वप्न आहे—हा विचार मनात डोकावल्याबरोबर कसलें तरी तापदायक शल्य सलूं लागतें. असली ही विचित्र भावना आहे. तथापि हे स्वप्न आहे, ही माया आहे, हा मतिभ्रम आहे याची जाणीव झाली तरी त्या जाणिवेंतहि अनिर्वचनीय सुख सामावलेले असते. केवळ हे सुख आतां पुन्हा आपल्याला प्रत्यक्षात उपभोगता येणार नाही या विचाराचे काटे गतसुखाच्या स्मृतीच्या गुलाबपुष्पाभोवती नसते तर काय बहार झाली असती! हा विचार मनात येऊन

—Delusion too sweet though vain!
Too sweet to be mine again.

या शेलीच्या ओळींतील आर्तता काळजाचा भेद करून जाते. सुखद स्मृतींच्या सुगंधाने दरवळलेले ते प्रसंग कायमचे निघून गेले, त्याचे आता निर्माल्य झाले, हे विचार मनात येऊन क्षणिक खिन्नता जागृत होत असली तरी धुक्याच्या आवरणात गुरफटून गेलेल्या चादण्याप्रमाणें, किंवा पानाच्या झुबक्यात झाकून गेलेल्या सोनचाफ्याच्या पूर्णविकसित फुलाप्रमाणें त्या स्मृति चित्ताला उल्लसितच करतात, तापलेल्या माळजमिनीवर ऐन उन्हाळ्यात अचानक पावसाची सर कोसळावी तशी आपल्या मनाची त्यांच्यामुळे अवस्था होते; आणि दुरून कोठून तरी संगीताचा अस्फुट आलाप अचानक कानावर आल्यावर मन जसें मोहरून जाते तसेंच गतकाळातील रमणीय दृश्याच्या सुखद स्मृतींनीहि मन मोहरून जातें. पावसाची पहिली सर आली म्हणजे कदंबाचें झाड असंख्य कलिकांनी भारावतें,

त्याप्रमाणें आपलें मन सुखाने भारावते, आणि कांही वेळां तर त्या सुखाचा उन्माद अक्षरशः असह्य होतो. तात्पर्य, गतकाळातील आठवणींची रमणीयता केव्हाहि अकलंकितच असते, धुंद करणारा उन्माद त्याच्यामध्ये असतो. विद्यमान काळ दुःखपूर्ण असेल तर त्यापासून होणाऱ्या यातना सुसह्य करून भविष्यकाळाकडे आशापूर्ण दृष्टीने पाहावयास आपलें मन त्या तयार करतात. आणि चालू क्षण सुखसमृद्धीने युक्त असेल तर त्याची चारुता अधिक कमनीय करून दाखविण्याची किमया त्याच्यात असते. यामुळे ते दिवस निघून गेले व पुन्हा कधीहि परत येण्यासारखे नाहीत यामुळे मनाला हुरहूर लागणे स्वाभाविक असले तरी ही हुरहूर अत्यंत गोड असते, त्याची स्मृति जोंपर्यंत कायम आहे तोंपर्यंत त्याच्या विनाशामुळे होणारी वेदना एका विचित्र सुखसंवेदनेंत गुरफटून राहिलेली असते, हें निर्भेळ दुःख नसून सुखाच्या साखरेंत घोळून निघालेले दुःख असते. सुखाच्या आडव्या धाग्यात दुःखाचे उभे धागे विणून तयार झालेले मानवी भावनांचे हे रुचिर दुकूलवस्त्र आहे. दीपकळी विझून गेली म्हणजे प्रकाशाची तिरीप कायमची नष्ट होते, इंद्रधनुष्य नाहीसें झाल्यावर त्याच्यातील मोहक रंगाच्या छटाहि अदृश्य होतात. पण गतकाळ निघून गेला असला तरी त्याची स्मृति नेहमीच मागे घुटमळत राहते; भरतीचे उधान ओसरून समुद्राचे वाळवट उघडें पडले तरी त्या उधानाच्या खुणा कितीतरी वेळ मागे घोटाळत राहतात; सूर वाऱ्यावर विरून गेला तरी त्याचे पडसाद कानात निनादत राहतात; आणि रसरसलेले फुलाचे गेंद कोणी दृष्टीआड नेले तरी त्याचा मोहक सुवास हवेत नतर कितीतरी वेळ दरवळलेला असतो. आणि हीच कल्पना शेलीच्या पुढील भावनोत्कट गीतांत आविष्कृत झालेली दिसेल.

Music, when soft voices die,
Vibrates in the memory,
Odours, when sweet violets sicken,
Live within the sense they quicken.

Rose-leaves, when the rose is dead,
Are heaped for the beloved's bed;
And so thy thoughts, when thou art gone,
Love itself shall slumber on.

बालपणींच्या रमणीय दिवसाची आठवण करून त्या विरलेल्या स्वप्नांतील रुचिर दृश्यें पुन्हा कल्पनेने अनुभवणे यांत जें सुख आहे त्याचा मोह गडकऱ्यांच्या वाङ्मयात अनेक ठिकाणीं प्रकट झालेला आहे. ' रम्य तें बालपण देइ देवा फिरुनिया ' या **मूकनायकां**तील सरोजिनीच्या उद्गारासारखेच उद्गार **प्रेमसंन्यासां**तील लीलेच्या तोंडीं गडकऱ्यांनी घातले आहेत.

> " लहानपण आणि मोठेपण या दोहींचा अनुभव घेतलेल्या लोकाना पुन्हा मागें जाण्याची परवानगी मिळाली तर एका क्षणांत सारी सृष्टि बालकांनींच गजबजून जाईल. "[६]

बालमनाच्या निरागसपणाचा प्रौढपणातील कलुषित वृत्तीशीं, आणि बाल्यातील निष्पाप व अव्याज आनंदाचा प्रौढपणातील दुःखपूर्ण जीवनाशीं जो तीव्र विरोध अनेक वेळा दिसून येतो त्याचे विश्लेषण लीलेच्या तोंडून करून गडकऱ्यांनी बाल्यातील सुखपूर्ण स्मृतींत रगून जाण्याची लालसा प्रकट केली आहे.

> " तीं मुले पहा; आजच्या सुखदुःखाच्या त्यांच्या कल्पना रात्रीं झोपेंत थकल्याबरोबर विरून जातील, उद्याचे जग निराळें; उद्याच्या आशानिराशा निराळ्या ! वाऱ्याच्या प्रत्येक लहरीसरशीं ......बालमनाच्या सुखदुःखाची हालचाल बदलते ! तेंच आपलें मन पहा ! एकेक विचाराचें ओझें अगदीं जन्मभर वागवावें लागतें !......एकेकदा मनात येतें कीं, बाळपणाचाच सारखा ध्यास करून मनानें—तसेंच शरीराने पण बालरूप व्हावे आणि या मुलांत मिसळून आमच्या पुसलेल्या प्रतिमा कायमच्या कालपटावर पुन्हां लिहून काढाव्या ! "

बाल्य आणि प्रौढत्व याच्यातील हा जाणवणारा विरोध १९१६ सालीं गडकऱ्यांनीं लिहिलेल्या **एका जुन्या श्लोकाची आठवण** या कवितेंतहि प्रकट झाला आहे.

हीच कल्पना अधिक उत्कटतेने 'स्मरणसृष्टि' या कवितेंत आविष्कृत झालेली दिसून येईल. बाल्यांतील हरपलेल्या सुखाची नुसती आठवणहि गडकऱ्याच्या मनात कशी शल्यासारखी सलत होती' आणि त्यांच्या दृष्टीने बाल्य व तारुण्य याच्यातील विरोध कसा असह्य होता याचें प्रत्यंतर पुढील ओळींत मिळेल.

प्रेमनदासह आज बाळपण वाहुनि गेले दूर
जें सुखकारण तेच दु:ख दे, स्मरण लावि हुरहूर !
अश्रु वाहती, दु:खस्मृतिचें मूर्तरूप हे जाण
शोधुनि बघता त्यात जीव ते नलगे ठाव ठिकाण.

* *

दु:खद जीवन आज कंठितो, पुढेहि दिसते तेच,
अमृतसुखाचा बालकाल तो, प्रभु, ने मज मागेंच !

* *

तारुण्याचे सौख्य निराळे, असेल बहु ते गोड,
बाळसुखाच्या स्मृतिचीही तरि अधिक जिवाला ओढ

या ओळी वाचल्याबरोबर ओड ऑन दि इंटिमेशन्स ऑफ् इंमॉर्टलिटि या प्रसिद्ध कवितेंत निरागस बाल्य व कटु अनुभवांनी कलुषित झालेले प्रौढत्व यातील जो विरोध वर्ड्स्वर्थने सूचित केला आहे त्याची आठवण होणें अगदी अपरिहार्य आहे. वर्ड्स्वर्थचे विचार व गडकऱ्याचे विचार यात विलक्षण साम्य आहे. ' पूर्वी पूर्ववयें प्रसन्नमयता जेव्हा मिळे सृष्टिला ' या गडकऱ्यांच्या ओळींत जो आशय आहे तो वर्ड्स्वर्थच्या पुढील ओळींत विस्ताराने प्रकट झाला आहे.

There was a time when meadow, grove and stream,
The earth and every common sight
To me did seem
Apparelled in celestial light,
The glory and the freshness of a dream.
It is not now as it hath been of yore;—
Turn wheresoe'er I may,
By night or day,
The things which I have seen I now can see no more.

बाल्यांतील अव्याज आनंदाने परिपूर्ण असलेली सृष्टि लयाला गेली याचें वर्ड्स्वर्थला फार वाईट वाटत आहे. निसर्गात आजहि सौंदर्य भरलेलें आहे हें खरें असलें तरी विविध ठिकाणीं विखुरलेल्या त्या दिव्य सौंदर्याच्या अवलोकनाने बालपणीं मन जसें स्तिमित होत होतें तसें आज होत नाही ही वर्ड्स्वर्थची तक्रार आहे.

The sun-shine is a glorious birth;
But yet I know, where'er I go,
That there hath passed away a glory from the earth.

भवभूतीच्या उत्तररामचरित या नाटकाच्या पहिल्या अकात भावनोत्कटतेने निथळणारा एक रमणीय प्रवेश आहे. वनवासांतून परत आल्यानंतर रामाचा राज्याभिषेक पार पडलेला आहे; सर्व प्रकारच्या ऐहिक सुखभोगानी आतां त्याचें जीवन समृद्ध झाले आहे; त्याच्या मनाला पूर्वीं कधीहि न मिळालेलें समाधान लाभलें आहे. अशा या समाधानी अवस्थेत तो सीता व लक्ष्मण यांच्यासह आपल्या गतजीवनांतील ठळक घटनांचीं भिंतीवर रगविलेलीं चित्रे बघत असता बालपणांतील एक अत्यंत संस्मरणीय दृश्य त्याला समोर दिसतें. त्याबरोबर पूर्वस्मृतींनी भावनांचा आवेग अनावर होऊन तो म्हणतो—

स्मरामि, हन्त स्मरामि ।
जीवत्सु तातपादेषु नवे दारपरिग्रहे ।
मातृभिश्चिन्त्यमानाना ते हि नो दिवसा गताः ॥

गतकाळांतील रम्य व भुरळ घालणाऱ्या घटनांच्या स्मृतींमुळे पिळवटलेल्या मृदु भावनाचा आर्त हुंकार ‘ते हि नो दिवसा गताः’ या आठ अक्षरात निनादत आहे, हळुवार मानवी हृदयाच्या साऱ्या कोमलतेचा अर्क त्यांत सामावलेला आहे. भवभूतीचा हा छोटासा श्लोक म्हणजे डोळे दिपवणारें व मनाला मुग्ध करून सोडणारें एक रत्न आहे. या श्लोकांतील कल्पनेशीं गडकऱ्यांची लीला पूर्णपणें समरस झाली असल्यास

त्यांत कांही नवल नाही. प्रेमसंन्यासाच्या पहिल्या अंकांतील पांचवा प्रवेश म्हणजे मृदु भावनांचें रम्य उद्यान आहे. लीला म्हणते—

" या उत्तररामचरिताचे सारें असेंच आहे ! मनाला जितकें वाटतें तितकें शब्दांत वठवून दाखविता येत नाहीं. या पहिल्या अंकांत चित्रपट पहात बसलेल्या सीतारामाच्या मंगलमूर्ति नजरे-पुढून हलत नाहींत अगदीं ! त्यांच्या बाळपणाचीं चित्रें त्यांच्या डोळ्यापुढें उर्भीं राहिलीं यांत काय नवल ? पण हें उत्तरराम वाच-तांना आम्हांलासुद्धा तीं चित्रें दिसतात. "

या मोहक चित्रामध्ये तल्लीन होऊन गेलेल्या लीलेने भवभूतीच्या रामाच्या आर्त हुंकाराला साद दिली आहे. लीलेच्या तोंडीं गडकऱ्यानी जें गीत या प्रसंगीं घातलें आहे त्याच्यांत त्याच्या स्वतःच्या साऱ्या मृदु भावनांचा सुगंध साठविलेला आहे.

आठवतो का साग सखे तो काळ विवाहाचा ।
बाळपणाचा, मुग्धपणाचा, निर्मळ भावाचा ॥
ससाराचे चित्र चिमुकले, चिमुकलेच जीव ।
फुललें नव्हतें हृदयाचेंही रानम राजीव ॥
पाहत होते तात तदा त्या लीला बाळाच्या ।
जणु आठवती त्यासहि लीला त्याच सुकालाच्या ॥
जपति परोपरि प्रसन्नहृदया पुण्यमया माता ।
गेले ते दिन सीते, यापरि हा ! बघता बघता ॥
बाळपणींचे प्रसग जणु ते घडति आज फिरुनी ।
चित्रपटा या अश्रुजलाने चल टाकू धुवुनी ॥
तूं सीता ती, राम तोच मी, त्याच आज माता ।
परि जे गेले दिन ते आता येतिल का हाता ?
कशास आशा आता नसती, झाले ते गेलें ।
सुकलें फूल न देत वास जरि अश्रूंनीं भिजले !

अप्रतिम सौंदर्याने नटलेल्या या गीताला सुनीत म्हणतां येईल का ? केशवसुती सुनीत शार्दूलविक्रीडितांत असतें तसें हें नाही हें

खरें. पण शार्दूलविक्रीडित वृत्त हा केवळ एक संकेत आहे. तो डोळ्याआड केला तर चवदा ओळींच्या या गीताला सुनीत ही पदवी द्यावयास मुळीच हरकत नाही असें मला वाटतें. आठ आणि सहा ओळींचे दोन टप्पे यात अगदी स्पष्टपणें दिसून येतात. किंवा हे मान्य झालें नाही तरी शेक्स्पियरच्या सुनीतांतील बारा ओळी व शेवटच्या युग्मकाच्या दोन ओळी असे दोन विभाग या गीतांत दिसतात हें मान्य व्हावयास हरकत नसावी. कोणत्याहि दृष्टीने पाहिलें तरी हें एक नितांतरमणीय व उत्कट भावनांनी परिपूर्ण असे सुनीत आहे असें मला वाटतें. या सुनीतात व्यक्त झालेली भावोत्कटता गडकऱ्याच्या हृदयात मुरलेली आहे. याचा पुरावा प्रेमसंन्यासांतील असंख्य उद्‌गारात आढळेल. या भावनांचा आविष्कार करण्यावाचून त्याना गत्यतर नव्हते. आणि हा आविष्कार वरील उत्कृष्ट सुनीताच्या रूपाने आपल्याला दिसून आला आहे. भवभूतीचा श्लोक केवळ निमित्तमात्र आहे. भवभूतीचा श्लोक उत्कृष्ट नाही असा याचा मुळीच अर्थ नाही. तो श्लोक अलौकिक आहे यांत शकाच नाही. या श्लोकाचा अनुवाद करण्याच्या भानगडींत गडकरी पडले नसते तरी देखील या गीतात प्रकट झालेल्या भावनाचा आविष्कार त्यानी एखाद्या स्वतंत्र गीतात खास केला असता. त्याच्या हृदयात ज्या कोमल भावना उचंबळून आलेल्या होत्या, व केवळ आविष्कृत होण्याचीच वाट ज्या पाहत होत्या त्याच्या आविष्करणाला काही तरी बाह्य निमित्त हवे होतें, आणि ते भवभूतीच्या श्लोकाच्या रूपाने मिळाले इतकाच याचा अर्थ आहे. कलेच्या दृष्टीने गडकऱ्याचे हे सुनीत परिपूर्ण आहे. पहिल्या ओळींत 'आठवतो का साग सखे ...?' असा प्रश्न असून आठव्या ओळींत 'गेले ते दिन' असा कारुण्यपूर्ण आर्त उद्‌गार आला आहे. या ओळींच्या मधल्या सहा ओळींत बालपणच्या जीवनातील अनेक रम्य चित्रें आलेलीं आहेत. हीं रम्य चित्रे ज्या दिवसाशीं निगडित आहेत ते दिवस आता निघून गेलेले असल्यामुळे मनाला आलेली खिन्नता विलक्षण आहे. या करुणाखिन्न विचाराचे काहूर मनात निर्माण झाल्यानंतर ज्या उत्कट भावना मनावर वर्चस्व गाजवतील त्यांच्या उत्कटतेचा कळस शेवटच्या दोन ओळींत झाला

आहे. पहिल्या बारा ओळींत कारंजाच्या चढत्या पाण्याप्रमाणें अधिकाधिक उत्कट होत जाणाऱ्या भावनेची येथे परिसीमा झाली आहे.

> कशास आशा आता नसती, झाले ते गेले,
> सुकले फूल न देत वास जरि अश्रूनीं भिजले!

त्या रमणीय प्रसंगाचें फूल एकदा सुकून गेल्यानंतर आज त्यांच्या स्मृतींमुळे उत्पन्न झालेल्या अश्रूंची कितीहि वृष्टि त्याच्यावर झाली तरी कोमेजून गेलेल्या, निर्माल्य झालेल्या त्याच्या पाकळ्यात पुन्हा रसरसलेलें जीवन निर्माण कसें होणार? तें अशक्य आहे. फूल जोपर्यंत फांदीवर वाऱ्याबरोबर डुलत असतें तोपर्यंतच त्याचे खरे सौंदर्य, तोंपर्यंतच त्याचा खरा सुवास. झाडावरून तोडल्यावर अल्पावधींतच कोमेजून जाणे हेंच त्याच्या नशिबीं असतें. अशा कोमेजलेल्या फुलाला आसवाच्या दवाने खरी टवटवी कशी येणार?

> When I have pluck'd the rose,
> I cannot give it vital growth again,
> It needs must wither

ह्या शेक्स्पियरच्या ऑथेल्लोच्या उद्गारात केवढे दुःखद सत्य भरलेलें आहे! गडकऱ्यांच्या कवितेंतील शेवटची ओळ वाचून शेलीच्या पुढील ओळींची आठवण होणेंहि स्वाभाविक आहे.

> When the lamp is shattered
> The light in the dust lies dead,
> When the cloud is scattered
> The rainbow's glory is shed.

> सुकले फूल न देत वास, जरि अश्रूनी भिजले!

कितीहि प्रयत्न केला तरी गडकऱ्यांची ही भावनोत्कट ओळ मनाचा ठाव घेतल्याशिवाय राहत नाहीं. एकदा निघून गेलेला क्षण पुन्हा परत येणें शक्य नाही हा विचारच अत्यंत तापदायक आहे. 'कशास आतां आशा नसती?'—बायरन् सुद्धा म्हणतो :

And all that Memory loves the most
Was once our only Hope to be,
And all that Hope adored and lost
Hath melted into Memory
Alas ! it is delusion all .

राम तोच आहे, सीता तीच आहे, माता त्याच आहेत—पण काळाने त्यांच्या मनोवृत्तींत केवढा विलक्षण बदल घडवून आणला आहे ! बालपणीं-च्या त्या काळापासून आजच्या क्षणापर्यंत केवढा प्रदीर्घ प्रवास हा ! बाकी सर्व गोष्टी स्थिर असल्या तरी काळ कोठे स्थिर आहे ?

तूं सीता ती, राम तोच मी, त्याच आज माता,
परि जे गेले दिन ते आता येतिल का हाता ?

आणि खरें म्हणजे सीता आणि राम याच्यातहि या इतक्या दीर्घ काळा-मध्ये फार मोठा बदल घडून आला नाही काय ! शरीरें तींच असतील —पण त्याचीं मनें ? त्या दूरच्या बालपणात त्याचीं जीं मनें असतील तीं अनत यातनाशीं झुंज करून श्रात झाल्यानतर तशींच राहणे कधी तरी शक्य आहे काय ? तथापि आपण तेच पूर्वीचे आहोंत असा गोड समज करून घेऊन ‘ परि जे गेले दिन ते आता येतिल का हाता ? ’ असा विलाप करणाऱ्या रामाची भावना ही आपली स्वत:चीच भावना आहे असें प्रत्येकाला वाटणार नाही काय ? आणि हा विचार चित्तात प्रबळ झाल्या-बरोबर

सुकले फूल न देत वास जरि अश्रूंनी भिजलें !

या कटु जाणिवेने जीव कासावीस झाल्यासारखा होतो !

एकदा सुकलेल्या मोहक फुलावर अश्रूची कितीहि शिंपण केली तरी त्याला पुन्हा टवटवी येणार नाही आणि त्याचा सुवास मिळणार नाही, ‘ जें झालें तें गेलें ’, हाच विचार गडकऱ्यानी तीन तरी या आणखी एका सुंदर गीतांत पुन्हा एकदा माडला आहे. १९१७ च्या एप्रिलमध्ये हें गीत त्यांनी लिहिलें. म्हणजे प्रेमसंन्यासांतील ‘ आठवतो का सांग सखे ’ इत्यादि गीत लिहिल्यानंतर पांच वर्षांनी त्यानी हें गीत लिहिलें.

तथापि ' सुकलें फूल न देत वास.... ' या भावनेचें शल्य त्याच्या मनांतून कधीच नष्ट झाले नाही. याचा पुरावा म्हणून तीन तरी या रमणीय गीतांतील पुढील ओळी पाहाव्या—

> हार घेउनी घार पळाली। पुन्हा आणणे कुणी तरी,
> लवून गेली बहार बिजली। पुन्हा पाहणे कुणीं तरी
> लाट जळातरिं पळात जिरली। पुन्हा चढावेणे कुणीं तरी .
> सूर बिराला वाऱ्यावरती। पुन्हा छेडणे कुणी तरी ..

या गडकऱ्याच्या ओळी वाचताक्षणींच या प्रकरणाच्या सुरवातीला उदधृत केलेल्या शेलेंच्या ओळींची स्मृति माझ्या मनात उचंबळून आली आणि शेलीच्या मनाशीं समरस होऊन मी म्हणालों—

> That moment is gone for ever,
> Like lightning that flashed and died.... .

# ५. मधुर सुगंधी स्वप्नें

How sweet it were, hearing the downward stream
With half-shut eyes ever to seem
Falling asleep in a half-dream !
To dream and dream

*Tennyson*

स्मृतिचित्रात तल्लीन होण्याच्या वृत्तींतूनच गतकाळात, दूरच्या गतकाळांत, घडलेल्या घटनाविषयीं एक प्रकारची विचित्र आसक्ति निर्माण होत असते. ऐतिहासिक काळांत घडलेल्या घटनांभोवती एक प्रकारचें रुचिर, गूढरम्य आवरण केवळ त्या घटनांच्या दूरपणामुळेच निर्माण होत असते; धुक्याआड दडलेल्या पौर्णिमेच्या चंद्राप्रमाणे, गर्द पर्णराजींत झाकून गेलेल्या फुलाच्या घोसाप्रमाणें त्याचें सौंदर्य मोहक असतें. गतकाळातील रमणीय घटनांच्या स्मृतींमध्ये, त्यांच्या कल्पनाचित्रामध्ये रमण्याची लालसा बहुतेक साऱ्या स्वच्छंदवादी (रोमॅंटिक) कवींच्या ठायीं दिसून येते. अकराव्या शतकांत फ्रान्समध्ये होऊन गेलेल्या व शृंगारिक कवनें लिहिणाऱ्या शाहीरानी आपल्या कवनांतून गतकाळांतील पराक्रमी वीरांच्या साहसाचें व त्याच्या प्रणयलीलांचें मोठें गहिरें वर्णन केलें, आणि तेव्हापासून गतकाळांतील घटनांतील गूढरम्यतेचें उन्मादक वर्णन करणें हा युरोपातील निरनिराळ्या देशांतील कवींचा एक आवडता छंद होऊन बसला.[1] याच प्रकारची वृत्ति अठराव्या शतकाच्या अखेरीस होऊन गेलेल्या आपल्याकडील लावणीकार कवींमध्येहि दिसून येते. या लावणीकार शाहीरानी आपल्या आसपास वावरणाऱ्या वीरांच्या पराक्रमाचे पवाडे जसे गाइले तसेंच त्यांच्या शृंगाराचेंहि मोठें उन्मादक वर्णन

आपल्या कवनांत केलें. युरोपांतील स्वच्छंदवादी कवींमध्ये ज्याप्रमाणें गत-काळातील गूढरम्य घटनांविषयीं विचित्र आकर्षण दिसून येतें तसेंच तें आपल्याकडील स्वच्छदवादी कवींमध्येहि दिसून येतें. विनायक, बालकवि व तांबे यांच्या काही कवनातून या आसक्तीचा उत्कृष्ट आविष्कार झाला आहे. स्मृतिचित्रांमध्ये दंग होऊन राहणें ही गडकऱ्याच्या मनाची वृत्तीच असल्यामुळे त्यानाहि गतकाळातील—ऐतिहासिक काळातील—घटनातील गूढरम्यतेने वेडावून सोडलें असल्यास त्यात काहीच नवल नाहीं. गूढरम्यतेच्या या आसक्तीच्या पोटींच गडकऱ्यानी कृष्णाकांठीं कुंडल ही कविता लिहिली. ही कविता दुर्दैवाने अपूर्ण राहिली असली तरी उपलब्ध असलेल्या ओळींवरून तिच्यातील गूढरम्यतेची उत्कृष्ट कल्पना येऊ शकेल. ‘ तेहि नो दिवसा गताः’ या चरणात प्रकट झालेल्या अतिरिक्त हुरहुरीने या कवितेंतील सारे वातावरण भारून टाकलें आहे. ‘सा रम्या नगरी’ या भर्तृहरीच्या प्रसिद्ध श्लोकात प्रतीत होणारी हुरहूर ‘कृष्णाकाठीं कुडल आता पहिलें उरलें नाहीं’ या पहिल्याच साकीच्या ओळींत थरारलेली दिसून येईल. हे ‘जुन्या जिवाचें गाणें ’ कवीच्या मनात ‘नव्या भराने ’ उचंबळून आले आहे, ते मन त्या रम्य स्मृतिचित्रानी हेलावलें आहे. या स्मृतिचित्रातील रंग आतां थोडेसे मंद झाले असले तरी त्याच्या मोहकपणात अजून यत्किंचितहि उणेपणा आलेला नाही. विसाव्या शतकात शरीराने वावरणाऱ्या गडकऱ्याचें मन एकदम तीनशे वर्षापूर्वी घडलेल्या घटनाच्या मदिर सौदर्यात तल्लीन झालें; त्या घटना आत्ता—या क्षणीं—आपल्या डोळ्यांसमोर घडत आहेत असा भास त्यांना झाला; आणि त्या रम्य चित्रातील उन्मादक छटानी स्तिमित झालेल्या, उचंबळून आलेल्या त्याच्या मनातून हळवे बोल कवनरूपाने बाहेर पडले—‘शाहीराच्या रसवंतीला भावभेटिचें लेणें ’ प्राप्त झालें.

त्याच लकाकीमध्यें तळपत्या त्या एका राईत
कृष्णाकाठीं कुडल शिकवी मायलेकरा प्रीत.
त्या राईतिल सगळ्या वेली एकच गाणें गाती,
त्या गाण्यातिल प्रेमकहाणी वेड लाविते म्हणती
प्रीतीचे तें गाणें होतें, सहज लागल्या नादीं
कोणी येता जाता त्यासी तेंच सांगती आधीं.

ही प्रेमकहाणी ज्या मोहक वातावरणात प्रथम घडून आली त्यातील गूढरम्यता पुढील ओळींत उत्कृष्टपणें प्रकट झाली आहे.

> झुळझुळत्या वाऱ्यावर त्याची पाने हलतानाही
> गुणगुणनी तें गाणें; त्याना छंदचि दुसरा नाही.
> वाऱ्याची धुगधुगी हलवि, तरी वेली ते कुजबुजती
> सोसाट्याचा सूर लागला तरी तेच ओरडती

हें प्रेमाचे मोहक गाणें त्या राईत कळ्याफुलांच्या वेलपत्तीने पानापानावर लिहिलेलें आजहि सहृदयाला, भावना असलेल्या रसिकाला, दिसून येईल; आणि तिच्यातील गहिऱ्या छटा पाहिल्याबरोबर

> कृष्णाकाठी कुंडल आता पहिले उरले नाही !

असेच आर्त उद्गार न कळत त्याच्या तोंडून बाहेर पडतील.

सह्याद्रीच्या गर्द अरण्यातील वातावरणाचे जे वर्णन गडकऱ्यानी या कवितेत केले आहे त्यात गूढरम्यता जशी दिसून येईल तशीच ओसाड आणि भयाण जागेतील भीषणताहि प्रतीत होईल. या वर्णनात स्वच्छंदवादी कवींना अत्यंत प्रिय असलेल्या अनेक वैशिष्ट्याचा साक्षात्कार होईल. वॉल्टर पेटरने addition of strangeness to beauty असे ज्याचे वर्णन केलें आहे तें गूढरम्य[२] वातावरण बहुतेक साऱ्या स्वच्छंदवादी कवीना फार प्रिय असतें. पेटरच्या मतें तर हेच स्वच्छंदवादाचे सर्वात महत्त्वाचें वैशिष्ट्य आहे. किर्र झाडीने आच्छादलेली दरी, दाट पानांच्या सावलीने झाकून गेलेली राई, त्या राईतील अरुंद व नागमोडी पाऊलवाट, दरींतून अवखळपणें वाहत जाणारी एखादी नदी अथवा एखादा ओढा, रात्रीं त्या राईतील झाडाच्या पानांतील झरोक्यातून डोकावणारा चंद्रप्रकाश इत्यादि गोष्टींत सामावलेल्या अनिर्वचनीय गूढरम्यतेंत काही कवींचें चित्त अगदी तल्लीन होऊन जात असतें. तिएक नावाच्या एका जर्मन कवीला रानातील निर्जन जागा, मध्यरात्रींच्या काळोखांतील एकात उद्ध्वस्त मठ व जीर्ण दुर्ग इत्यादि गोष्टींचें भारी वेड होते असें सांगतात. या ठिकाणीं त्याच्या प्रतिभेला खरा बहर येत असे असेंहि नमूद आहे. गडकऱ्याच्या प्रस्तुत कवितेंतील पुढील वर्णन पेटर ज्याला ' गूढरम्य ' म्हणतो त्याच सदरात पडेल.

काळा दरिया काळोखाचा बरती भरुनी राही
काळ्या राईमधे खालती काळी कृष्णामाई
काळोखाचे रान माजले चदाराणी नाही
तिच्याच मागे पळे तिचा तो चदेरी दरियाही
जिकडे तिकडे काळी रान हमरंगाने खुलनी,
निळ्या चादव्यालागीं नुसती झालरमोती झुलती
राईमधली हिरवळ आता काळ्या राती कुठली ?
माथ्यावरची तशी कोवळी रगसभाही उठली !
निजली दुनिया, निजला वारा, नव्हतें हालत पान
मिटुनि फुलाचे डोळे निजल्या वनदेवींच्या बाळा,
उभा झोंपती झाडे, त्याचा उचलजागता चाळा
त्यातुनि चिमणे झरे चालना झुळझुळ हळु करिनात .

असल्या गर्द राया जेथे विपुल आहेत अशा सह्याद्रीच्या सांनिध्यात दोन प्रणयी जीवांची प्रेमकहाणी घडून आली. या प्रेमकहाणींत सौंदर्य अगदी ओतप्रोत भरलें आहे. तिने त्याला आपलें मन बहाल केल्यावर तें रमणीय दृश्य पाहून वेलींचीं पानें व फुले लाजेने व संकोचाने अगदी चूर होऊन गेलीं. आपलें वीराचे जीवन अनेक साहसानी अगदी गजबजलेलें आहे; आणि उलट तिचे जीवन सुखाच्या समृद्धीने भरलेले असल्यामुळे तिने आपल्याबरोबर येऊ नये असे स्वाभाविकच त्याला वाटतें, आणि तो तिला म्हणतो—

तुझ्या कपाळीं सुबक बसावी बघ मोत्याची जाळी,
करवदांची काटेजाळी, परी आमुच्या भाळीं.
रायगडावर उघड्या पडल्या नव्या हिऱ्याच्या खाणी
नटेल त्यानी रायबागच्या रायाजीची राणी.
टकमक टोकावरी राहणे चढण उभी ती फार,
पडेल खालीं बघता असली नाजुक नवती नार.

परंतु प्रीतीचा प्रभाव असल्या घोर संकटाच्या कल्पनेवरहि सौंदर्याचा साज चढविण्यास समर्थ होता. प्रीतीला असल्या संकटाची काय मातब्बरी ? ती त्याला लगेच म्हणते—

प्रीतीच्या पंखानीं येइल टाकुनि मागे गगना
रायबागच्या राघूमागें ही मान्याची मैना !

आणि त्या दोघांची मनमिळणी झाली, त्यांनी एकमेकांला प्रीतीचीं गोड वचनें दिलीं; आणि कर्तव्याची पूर्ति करण्यासाठी तो तिचा निरोप घेऊन स्वारीवर निघाला. आणि आपल्या प्रेयसीचा तो गोड गोड निरोप घेत होता तेव्हा—

फुलाफुलातुनि रंगत होतीं मधुर सुगधी स्वप्ने !

पण हीं रुचिर स्वप्ने लवकरच विरलीं, आशाचा चक्काचूर झाला, कळीचें फूल होण्यापूर्वीच ती देठापासून गळून पडली आणि मातीला मिळाली. लढाईत त्याच्या जिव्हारीं घाव बसला आणि आपल्या प्रेयसीला तो कायमचा सोडून गेला. या वार्तेने तिला इतका अनावर शोक झाला कीं, त्याच्या आघाताने तिचाहि प्राण कुडी सोडून आपल्या प्रियकराला भेटावयास गेला; आणि—

ज्योत ज्योतिला मिळुनी गेली ..[13]

गतकाळातील वातावरणामध्ये पानापानातून, फुलाफुलातून रंगलेल्या सोनेरी स्वप्नात तल्लीन होण्याच्या या वृत्तीमुळेच गडकरी मराठ्याच्या इतिहासाचीं पाने उत्कंठेने चाळू लागले असतील. आणि या पानात सामावलेल्या ऐतिहासिक घटनेचा नाममात्र आधार घेऊन त्यानी प्रतिभेच्या, कल्पनाशक्तीच्या मदतीने आणखी एक रुचिर सोनेरी स्वप्न चितारले. राजसंन्यास या नाटकात हे स्वप्न वाणीचा आश्रय करून साकार झालें आहे. नुसत्या काळाच्या दूरपणामुळेहि ऐतिहासिक घटना मुळातच रुचिर व मोहक भासतात. त्या घटनाभोवती अत्यत आकर्षक अशीं जाळीदार अवगुठनें आधीच तयार झालेलीं असतात. अशा अवगुठनाना कल्पनाविलासाची नाजूक झालर लावली म्हणजे मुळातलीं रंगीत स्वप्नें जरतारी सौंदर्य धारण करून नटून सजून दृष्टीपुढें उभीं राहतात आणि त्याच्या मादिर व मुलायम दिमाखाने डोळ्यावर झापड पडूं लागल्याचा भास होतो. राजसंन्यासाच्या पहिल्याच प्रवेशात दर्यात होडी उलटल्यामुळे बुडूं लागलेल्या तुळशाला वाचवून संभाजी तिला पाण्याबाहेर घेऊन येतो. हा साराच प्रसंग स्वप्नसृष्टींत घडल्याप्रमाणें भासतो. त्याचें सौंदर्यच इतकें गहिरें व उन्मादक आहे. स्वप्नसृष्टींतील गूढरम्यतेचा हा एक नमुना पाहा —

" साजणी, उचंबळती लाट डोक्यावरून निघून गेल्यावर, घाबरल्या हातांनीं तोंडावरचे केश मागें सारताना चुकार केसांचा एकादा गोफ तसाच गालावर खेळत आहे; लाटेच्या माराला भिऊन झिरझिरीत पदर आपल्या उराशीं लपत आहे ! उघडत्या पापणीवरच्या तुषारामुळें डोळ्याची धांदलीने उघडझाक होते आहे; आपल्या मस्तकीं बसल्यानंतर पुन्हा पाताळपाणी पहावे लागणार म्हणून एकेक पाण्याचा थेंब आपल्या केशपाशावरून सावकाश दिलगिरीनें सुटत आहे ! गर्दीनें उघडत्या झाकत्या डोळ्यावरून पळणाऱ्या एखाद्या थेंबांतून मावळता सूर्यनारायण आपल्या तिरप्या तीरानीं सोनेरी नेम साधून तुमच्या डोळ्याना दिपवीत आहे !......"

संभाजीच्या ' रंगलेल्या मनाला ' समोरच दिसणारें हें लोभसवाणे दृश्य आपल्याला स्वप्नसृष्टींतील भासले तर त्यात काही नवल नाही. ' पराक्रमासारखी प्रीत करा ' या सगनभाऊच्या वचनाचें प्रात्यक्षिक दाखविणाऱ्या संभाजीचें तुळशीशीं झालेलें हें मीलन गडकऱ्यानी एखाद्या सोनेरी स्वप्राप्रमाणें मोहक करून सोडलें आहे.

स्वप्नसृष्टींतील सौंदर्याची रुचिरता पुण्यप्रभावाच्या दुसऱ्या अंकाच्या दुसऱ्या प्रवेशात अगदी ओसंडून वाहत आहे. वॉल्टर पेटरने जिचें इतकें कौतुक केलें आहे ती गूढरम्यता ( strange beauty ) या प्रवेशातील ओळीओळींतून प्रतीत होईल. ही स्वप्नसृष्टि कमालीची मोहक असून तिचा आकर्षकपणा मदिरेच्या धुंदीप्रमाणे उन्मादक आहे. ' ओड टु अ नायटिंगेल ' ही कविता लिहिताना कीट्स ज्याप्रमाणें रंगीबेरंगी, जरतारी स्वप्नसृष्टींत वावरत होता त्याप्रमाणे पुण्यप्रभावांतील हा प्रवेश लिहीत असता गडकरीहि असेच स्वप्नसाम्राज्यातील मदिर वातावरणात वावरत असले पाहिजेत.

O for a draught of vintage !

असें कीट्स म्हणतो; आणि गडकऱ्यांचा भूपालहि ' ऐहिक मोहकतेला भुलून मनाला जगाशीं चिकटवणारी जाणीव ' विसरणें शक्य व्हावें

म्हणून ' द्राक्षासवाचा घोट ' घेण्यासाठी उत्सुक झाला आहे. सत्वसृष्टीचा विसर पडावा व मदिर स्वप्नांच्या मुलायम दुकूलवस्त्रात गुरफटून जावें अशी गडकऱ्यांच्या भूपालाची लालसा आहे, त्याला ' जाणीव ' विसरावयाची आहे, जगाची जाणीव विसरावयाची आहे. ' निशे ' खेरीज ही जाणीव नष्ट होणें शक्य नसल्यामुळे द्राक्षासवाचा घोट आवश्यकच आहे. जगाची ही जाणीव कशासाठी विसरावयाची ? स्वप्नसृष्टींत धुंद होऊन राहता यावे यासाठी ! कीट्स म्हणतो—

That I might drink, and leave the world unseen
And with thee fade away into the forest dim ·
Fade far away, dissolve, and quite forget . .

पुण्यप्रभावांतील वर उल्लेखिलेला प्रवेश लिहीत असतांना गडकऱ्यांचीहि थेट कीट्ससारखीच वृत्ति झालेली आहे; आणि कीट्सला जशीं उन्मादक स्वप्नचित्रें दिसत आहेत तशींच गडकऱ्यांनाहि तीं दिसत आहेत. भूपाल व वसुधरा या दोन्ही व्यक्ति गडकऱ्यांच्या मनाची धुंद अवस्था आविष्कृत करण्याचीं केवळ साधनें होत. प्रतिभेच्या तरल पखावर हलुवारपणे बसून कीट्स स्वप्नाच्या रमणीय उद्यानात प्रविष्ट झाला आहे. आणि तेथे त्याला कसलें रुचिर दृश्य दिसलें ?

tender is the night,
And haply the Queen—Moon is on her throne
Cluster'd around by all her starry Fays,
But here there is no light,
Save what from heaven is with breezes blown
Through verdurous glooms and winding mossy ways.

आता या गूढरम्य, रुचिर स्वप्नदृश्यांतील मोहक, तरल रंगच्छटांच्या सौंदर्याची वसुंधरेच्या पुढील गीतांतील मोहक कल्पनाचित्राशीं तुलना करावी.

हालत वातें मृदु शांति ही
भासे हासे की चंद्रालोकें तनुलकांति !
दशदिशा पुष्पपरागे दरवळुनि
हंसत जणु असती !

या सौदर्याच्या बरसातीने गडकऱ्यांच्या तरल प्रतिभेचें जणुं समाधान झालें नाही असे दिसतें. त्याच्या प्रतिभेला व कल्पनाशक्तीला कसला तरी धुंद व गोड उन्माद चढलेला दिसतो. हा पाहा मदिर स्वप्नसृष्टींतील गूढरम्यतेचा मोहक प्रकर्ष !

" ...हा शांत वायु, आपल्या बागेतले हे शात पुष्प-सौंदर्य, चतुर्थीच्या पूर्णकल्प चद्राची ही किंचित् शात चद्रिका...चद्राच्या चादण्याच्या नाजूक झोतानेच मघाची ताराची बरसात कितीतरी कमी झाली आहे .."

तारकालोपाचा भूपालाने उल्लेख केल्याबरोबर वसुधरेचें मन एका अत्यत रमणीय कल्पनाचित्राच्या उन्मादात डुबूं लागले स्वप्नसौदर्यातील मृदु हळवेपणा पुढील गीतात ओतप्रोत भरलेला आहे.

नाचत ना गगनात । नाथा । ताराची बरसात ॥
आणित होती । माणिक मोतीं । वरतुनि राजस रात ॥
नाव उलटली । माव हरपली । चदेरी दरियात ...

आणि या गीतानतर गडकऱ्यांच्या प्रतिभेला वसतऋतूंतील जाईजुईचा बहर आलेला दिसेल. गडकऱ्याच्या मनश्चक्षूपुढे तरळलेले कल्पनाचित्र वसुंधरेने बोलके केले आहे इतकेंच.

"चतुर्थीच्या किंचित् अपुऱ्या चद्राचें हे चांदणें चहूकडे पसरून, भरयौवनाचा पहिला प्रहर उलटल्यामुळें अंमळ मंदावलेल्या प्रेमाच्या प्रशांत प्रभेप्रमाणे शोभत आहे ! पूर्णविकच पुष्पांची सुगंधवृष्टि त्यांत एकजीवाने मिसळल्यामुळें अपत्यवत्सल हृदयाच्या प्रौढप्रेमात समाधानवृत्तीची भर पडल्याची साक्ष पटत आहे; चादण्याच्या भरात झाडाझुडाखालीं दडून बसलेल्या या फिकट सावल्यासुद्धा,

सुखकालच्या सभाषणातल्या गतदुःखाच्या आठवणींप्रमाणें आनंदच देत आहेत; शातस्वरूप वृक्षलतावरून सृष्टीच्या वायुमय जीवन-लहरी अगदीं नाजूक जोराने वाहून नुसत्या कोंवळ्या अंकुरांनाच नाचवीत असल्यामुळें, निजलेल्या बाळाला झोंप लागली कीं नाहीं हे पाहण्यासाठीं आईनें पावलाची चाहूल न होऊं देता त्याच्या जवळ जावें, ममतेच्या मोहानें खिळलेल्या नजरेनें त्याला निरखीत रहावें, उष्ण निश्वासाच्या स्पर्शानें त्याची झोंपमोड होऊं नये म्हणून जीवन-क्रियाही जपून करावी, आणि त्या मदनिश्वासाच्या न कळण्याजोग्या लहरींनीं, त्या चिमुकल्याच्या तोंडावर रुळणारा एकाद्दुसरा केंसच भुरभुरत रहावा अशा मनोहर प्रसगाचें चित्र डोळ्यासमोर सारखें तरळत आहे ! ”

पुण्यप्रभावाच्या या प्रवेशात स्मृतिचित्रात धुंद होऊन राहण्याची वृत्ति, आणि अकारण खिन्नता व तिच्या पोटीं निर्माण झालेली हुरहूर याची प्रतीति सर्वत्र येईल. स्मृतिचित्रात धुद होऊन राहण्याची वृत्ति व स्वप्न-सृष्टींत रगून जाण्याची आसक्ति याची जात एकच ! त्या त्या रमणीय प्रसंगाची ‘ स्मृतिचित्रे ’ पहाण्यात तल्लीन झालेल्या भूपालाच्या मनाला ‘ चंद्रिकेच्या रसात तारामागून तारा विरघळताना पाहून ’ खेद वाटतो, आणि ‘ चादण्याच्या फिकट तेजानें ’ त्याच्या मनात ‘ करुणखिन्न कल्पनाचें काहूर जमायला लागते. ’ भूपालाची ही वृत्ति गडकऱ्याच्या वृत्तीशीं अगदी सदृश आहे. किंबहुना, स्वतः गडकरीच भूपालाला निमित्तमात्र करून आपल्या साऱ्या भावना बोलून दाखवीत आहेत असें म्हणावयास हरकत नाही. भूपालाच्या वृत्तींत भिनलेले ‘ पर्युत्सुकत्व ’ वसुधरेच्या मनातसुद्धा ओतप्रोत भरलेलें आहे. ‘ संध्यारागातील सूर्याची शेवटची प्रभा ’ तिला नेहमी ‘ करुणमिश्र ’ वाटते या गोष्टींतील मर्म हेच होय. ‘रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शद्वान् पर्युत्सुको भवति यत् सुखितोऽपि जन्तुः ’ या कालिदासाच्या प्रसिद्ध उक्तींत प्रतीत होणारें पर्युत्सुकत्व गडकऱ्याच्याच मनोवृत्तींत मुरलेलें असल्यामुळे ते वसुंधरा व भूपाल यांच्या तोंडून प्रकट झालें आहे इतकेंच. स्वप्नसृष्टीचें

रामणीयक मनाला केवढीहि भुरळ पाडीत असलें तरी तें विरून जाणार आहे याची ओझरती जाणिव झाली तरी मन बेचैन होऊन जाणें अपरिहार्यच नाही का ? आणि यामुळेच अत्यत रमणीय दृश्याशीं कारुण्याची सागड घालण्याची प्रवृत्ति वर वर्णिलेल्या 'पर्युत्सुकते' ने भारलेल्या अनेक भावनावश, हळुवार मनात दिसून येते. आणि याच प्रवृत्तीच्या पोटीं '*Tears, idle tears...*' हें टेनिसन्चे प्रसिद्ध पर्युत्सुकत्वगीत निर्माण झालेलें आहे. या पर्युत्सुकतेचा अतिरेक झाला म्हणजे कधी कधी मरणाचे विचारहि गडकऱ्याच्या मनात डोकावूं लागत. पण भूपालाने जें मरणाचे कल्पनाचित्र रगविले आहे त्यातहि एक प्रकारचें अनिर्वचनीय सौंदर्य आहे हें कबूल केले पाहिजे. पर्युत्सुकत्वाचा, धडधडत्या हुरहुरीचा, आतुर उत्कंठेचा अतिरेक झाला म्हणजे कीट्सलाहि मरणाविषयीं अशीच विचित्र ओढ वाटत असे.

. and, for many a time
I have been half in love with easeful Death
Call'd him soft names in many a muse'd rhyme,
To take into the air my quiet breath,
Now more than ever seems it rich to die
To cease upon the midnight with no pain ..

भूपालाला मरणाचे जें कल्पनाचित्र दिसत आहे त्यात खिन्नतेच्या किंवा विषादाच्या छटा असल्या तरी त्यांतहि एक प्रकारचा विलक्षण मोहकपणा आहे हें लक्षात ठेवलें पाहिजे· किंबहुना, वरच्याच उताऱ्यातील मरणाच्या उल्लेखाचा संदर्भ क्षणभर डोळ्याआड केला तर भूपालाची ही स्वप्नसृष्टि अत्यंत मदिर, पराकाष्ठेची आकर्षक व गहिरी आहे हें कोणीहि कबूल करील. हें पाहा भूपालाचें कमनीय कल्पनाचित्र —

"पहा तें चित्र ! संध्याकाल नुक्ताच अतीत झाला आहे; एखाद्या खाडीच्या काळ्याभोर पाणभुईत, चतुर्दशीच्या चंद्राच्या किरणांचा वावभर रुंदीचा पट्टा तरंगत आहे:...चंद्राच्या जरा कलत्या बाजूस एकच काळसर ढगाचा तुकडा हलत्या नजरेसमोर

झुलत आहे. आशेपेक्षाही मनोहर चादणें मोडत्या लाटावर नाचत आहे. आम्ही दोघे एकाच लहानशा होडीत जवळ जवळ बसलों आहों; मानवी प्रयत्नावाचून, नुसत्या वाऱ्याच्या स्वच्छंद हेलकाव्यानें आमची होडी त्या चंद्रमार्गावरून जात आहे; दुतर्फा लहान टेंकड्याच्या ओळींवर पसरलेल्या हिरव्या रानवटी, आतल्या काळोखाने आणि भोंवतालच्या चादण्यानें अस्पष्ट दिसताहेत... त्या निशेच्या गोड धुदींत, हृदय उसळत्या रक्ताच्या खळखळाटात बुद्धीला बुडवीत असल्यामुळे, तिची बडबड, होडीच्या दोहों बाजूस मोडत्या लाटावर चाललेल्या जलतरगाच्या मर्मरध्वनीप्रमाणें मधुर वाटत आहे...अशा स्थितींत सागरसगमाच्या सीमारेषेजवळ आपली नौका डळमळत आहे ! ..''

गूढरम्य वातावरणांतील उन्मादक धुदीचा इतका सुरेख, इतका मुलायम आविष्कार मराठींत अन्यत्र क्वचितच झाला असेल. स्वप्नातील मनोरम दृश्याची गहिरी शोभा येथे अगदी निथळलेली दिसत आहे. टेनिसनच्या लोटस–ईटर्स या प्रसिद्ध कवितेतील रुचिर स्वप्नसृष्टीच्या मदिरपणाची पदोपदीं आठवण व्हावी इतके गडकऱ्याच्या भूपालाचे हें कल्पनाचित्र सुबक उतरलें आहे. त्यातील रगाच्या तरल छटा तर कमालीच्या गोंडस व लोभसवाण्या आहेत. या स्वप्नमय दृश्यातील सर्वत्र दरवळलेल्या मोहक सुगंधाने वाचकाला बेचैन करून सोडलें तर त्यात काय नवल!

प्रेमसंन्यासांतील जयत व लीला हीं दोघेंहि अत्यत भावनावश व काव्यात्म वृत्तीचीं आहेत. जयताचे मन तर नेहमीच 'कल्पनेच्या काव्यानदात' तरगत आहे. यामुळे स्वप्नसृष्टींतील रम्य कल्पनाचित्रें त्याच्या डोळ्यासमोर तरळत राहिलीं तर त्यांत काही नवल नाही. लीलेला मानवी आयुष्य हेंच एक लांबलचक स्वप्न वाटत आहे. लीलेचा हा विचार लक्षांत घेतला असता

Our birth is but a sleep and a forgetting

या वर्ड्स्वर्थच्या प्रसिद्ध उक्तीची[५] आठवण झाल्याविना राहणार नाही. गतगोष्टींच्या स्मृतींचा आवेग अनावर झाल्यामुळे लीलेला एक सुंदर सोनेरी स्वप्न दिसूं लागलें आहे.

"शुभ्र मोगऱ्याच्या कळ्याची एकच लाबलचक माळ गळ्यात घालून, याच नदीच्या काठीं त्या पायरीवर उभे राहून जयंत व मी किती तरी वेळ आमचें पाण्यात पडलेले प्रतिबिंब पाहत होतों......"

गतकाळातील रमणीय घटनाच्या आठवणी केव्हा तरी पडलेल्या आणि लगेच विरून गेलेल्या मनोज्ञ स्वप्नाप्रमाणेच नसतात काय? या स्वप्नाच्या स्मृतीचा कसला तरी गूढ, विलोभनीय, मोहक व दुष्प्राप्य सुगंध सतत दरवळलेला असतो. असल्या स्वप्नांत रमणे हा लीलेचा स्वभावच आहे. खरें म्हणजे हा खुद्द गडकऱ्याचाच स्वभाव आहे, आणि बहुतेक साऱ्या रोमॅंटिक कवींचीहि हीच मनोवृत्ति असते. मेटरलिंकच्या मोना व्हॅना या कमालीच्या रोमॅंटिक नाटकात रगीत स्वप्नाप्रमाणें मोहक भासणाऱ्या स्मृतिचित्राची अक्षरशः पखरण झालेली आहे. लहानपणीं आईच्या मांडीवर बसून आकाशातील चादण्याची वाटणी करण्याचा खेळ खेळणाऱ्या लीलेला आणि जयंताला हे सारे कालच घडल्याप्रमाणें वाटत आहे. लीलेच्या मृत्यूनतर भावनाच्या क्षोभाने हेलावलेला जयत आपल्या अपुऱ्या इच्छा स्वप्नसृष्टींत तरी सफल होतील काय या उत्कठेने तळमळत आहे. सत्यसृष्टींत जे दुष्प्राप्य ठरले तें रमणीय स्वप्नसृष्टींत त्याने प्राप्त करून घेतलें आहे.

"...या पापी जगाचा संग सोडून आपण केवळ प्रेमाचे देह धारण करून एखाद्या कळीच्या हृदयात लपून बसू. प्रेममय काव्यबंधाने तिचें तोंड कायमचें बद करून टाकू आणि अनत काळपर्यंत त्या कालिकेच्या गर्भातल्या परागरेणूच्या सृष्टींत, या रेणूवरून त्या रेणूवर सारखा प्रेमाचा लपडाव खेळत बसूं! लीले, त्या कलिकेच्या सुगंधी ब्रह्मांडांत घटकेंत एका रेणूच्या आडपडद्यानें सुखमय विरहाचें सुख

भोगूं. त्या स्थितींत या बाहेरच्या जगांत खेळणारा वारासुद्धां आंत येताना कालिकेच्या कोमलपणांत गाळून शुद्ध करून घेतां येईल... मी पण विष घेतों आणि दोघे बरोबरच मरून प्रणयाची निराळी सृष्टि निर्माण करूं. ही भूमि नको, तें आकाश नको, तारांचा रस पिळून त्यानें मेघमंडळातल्या गारांचा वाडा बांधूं आणि चिरकाल त्यांतच राहूं... !"

ज्या कल्पनाशक्तीने गतकाळांतील घटनांमध्ये रगलेलीं 'मधुर सुगंधी स्वप्नें' गडकऱ्यांनी पाहिलीं, व जिच्या साह्याय्याने मनोज्ञ स्मृतिचित्रांत ते तल्लीन होत असत, त्याच कल्पनाशक्तीने त्यांच्या अमूर्त आशांना व इच्छांना स्वप्नसृष्टीच्या मदिर व धुद वातावरणांत मूर्त व साकार करून सोडलें. हीं स्वप्नें असलीं तरी तीं मधुर आहेत, व त्याचा सर्वत्र दरवळलेला सुवास असंख्य यातनानी व निराशांनी ओतप्रोत भरलेल्या अपूर्ण मानवी जीवनाला उल्ल-सित करण्यास व त्यास चैतन्य द्यावयास समर्थ आहे.

# ६. तरल कल्पनांचा तुरा

Then let winge'd Fancy wander.
—*Keats*

गडकऱ्यांच्या नाटकाचा काळजीपूर्वक अभ्यास केला तर त्याच्या बहुतेक महत्त्वाच्या व्यक्तींना बुद्धिमत्तेची बहुमोल जोड मिळालेली आहे असें दिसून येईल. बुद्धिमत्तेची जी तीव्र लालसा स्वत: गडकऱ्याना होती, व आपल्या बुद्धिमत्तेचा जो अभिमान त्याना होता त्याच्या पोटींच गोष्ट घडून आलेली आहे यात शका नाही. पुण्यप्रभावातील ईश्वर ' उत्साहानें लहानपणापासून कमावीत' आणलेल्या आपल्या बुद्धिमत्तेचा गौरव करीत आहे. वसुंधरेची विद्याप्राप्ति ' पुरुषाना सुद्धा अलङ्कृत करणारी ' असून तिची 'प्रगल्भ बुद्धि' पडितानाहि लाजविणारी आहे असा वसुंधरेच्या बुद्धिमत्तेचाहि ईश्वराने गौरव केला आहे. (अंक १, प्र. १) तिच्या ज्ञानगाभीर्याचा भूपालानेहि उल्लेख केला आहे. ( अक २, प्र. २ ) " तुझ्या चातुर्याची, बुद्धिमत्तेची...कशी स्तुति करावी हेच कळत नाहीं. तुझी अलौकिक बुद्धिमत्ता पाहून मी आज चकित झालों आहे " असे वृदावन कालिंदीला म्हणत आहे. ( अंक १, प्र. २ ) भूपाल तर बोलून चालून विचारप्रवण व तत्त्वज्ञ आहे. बुद्धिवाद हे त्याचें एक वैशिष्टय आहे. बुद्धिमत्ता हेच भावबंधनांतील घनश्यामाचें महत्त्वाचें वैशिष्टय आहे. " बुद्धिमत्तेच्या विजयातच सुख मानायची पहिल्यापासून संवय लागल्यामुळें विचाराप्रमाणेंच माझे विकार, इच्छा भावना याचा उद्‌भवहि माझ्या बुद्धिप्रधान मस्तकात होत

असतो " (अंक ४, प्र. ३) असें घनश्याम लतिकेला आवर्जून सांगत आहे. **एकच प्याला** या नाटकांतील सुधाकराच्या अलौकिक बुद्धिमत्तेची रामलालने मनसोक्त तारीफ केली आहे. रामलाल सिंधूला म्हणतो-"सुधाकर बुद्धिवान् आहे. फार काय सागाव—खरोखरीच अलौकिक बुद्धिवान् आहे.... त्याच्या अफाट बुद्धिमत्तेला पुरून उरण्याजोग्या कामगिरीमध्यें त्याला गुतवून ठेव." (अंक १, प्र.१) स्वत: सुधाकरालाहि आपल्या बुद्धिमत्तेचा तीव्र अभिमान आहे. त्याच्या ' तरुण बुद्धिमत्ते 'चा रामलालने जसा उल्लेख केला आहे तसाच त्याच्या आत्मविश्वासाच्या उग्रतेचाहि उल्लेख केला आहे. आपल्या बुद्धिमत्तेविषयींच्या या अभिमानाचे आविष्करण स्वत: सुधाकरानेहि केलें आहे. " बुद्धिमत्तेच्या तीव्र अभिमानामुळ बहुताशीं बरोबरीच्या माणसाच्यासुद्धा हातात हात मिळविण्याची ज्याने कधीं कदर केली नाहीं ..." ( अक ४, प्र. ३ ). गडकऱ्याच्या मामुली पात्रानाहि बुद्धिमत्तेची भरपूर देणगी मिळालेली आहे हे त्याच्या अनावर कोटीबाजपणावरून सहज दिसून येईल. "तोंडावर तर सरस्वती बसली आहे तुमच्या ! " असे गीता ताळिरामाच्या कोटीबाजपणाचे औपरोधिक कौतुक करीत आहे. ( अक १, प्र. २ )

आपल्या नाटकातील इतक्या व्यक्तींना गडकऱ्यानी बुद्धिमत्तेची खैरात केली आहे हे त्याच्या स्वतःच्या बुद्धिमत्तेचें व तिच्याविषयीं त्याना वाटणाऱ्या आत्मविश्वासाचेच द्योतक आहे असे मला वाटतें.

गडकऱ्याच्या या बुद्धिमत्तेचा आविष्कार दोन प्रकारानी झालेला आहे. त्याच्या नाटकातील असख्य कोट्यामध्ये दिसून येणारें बुद्धीचे तेज खरोखरच डोळे दिपविणारें आहे. तीव्र बुद्धिमत्तेची स्वैर पखरण करणाऱ्या इतक्या मार्मिक कोट्या मराठींतील दुसऱ्या कोणत्याहि नाटककाराने केल्या असतील असें वाटत नाही. गडकऱ्याच्या बुद्धिमत्तेचा आविष्कार जसा या मार्मिक कोट्यामध्ये झालेला दिसून येतो तसाच तो त्यांच्या कल्पकतेंत—उन्मत्त कल्पनाविलासांत—दिसून येतो. गडकऱ्यांना अलौकिक कल्पनाशक्तीचे लेणे लाभले असल्यामुळे त्याच्या बुद्धीचा

परमोच्च प्रकर्ष या कल्पकतेंतच खरा प्रतीत होतो. गडकऱ्यांच्या कोटिबाजपणाला काव्यात अवसर नाही. त्या कोट्या त्यांच्या नाटकात इतस्ततः विखुरलेल्या आहेत. कल्पकतेचें मात्र असे नाही. ती त्यांच्या अनेक कवनातून जशी प्रकट झाली आहे तशीच नाटकातूनहि तिची अक्षरशः अगदी धुंद पखरण झालेली आहे. या कल्पकतेचा आविष्कारहि मुख्यतः दोन प्रकारानी झालेला आहे. आकर्षक कल्पनाचित्रें ( imagery ) हें गडकऱ्यांच्या कल्पकतेचे प्रमुख अंग होय. उपमा, उत्प्रेक्षा, रूपकें व दृष्टांत हें त्या कल्पकतेचे दुसरे महत्त्वाचें अंग होय. ( ज्या शब्दानुप्रासाच्या स्वैर खैरातीमुळे गडकरी अनेकाना प्रिय आहेत, त्या शब्दानुप्रासामध्ये कसल्याहि कल्पकतेचा प्रत्यय येत नसून तो केवळ दुय्यम दर्जाच्या बुद्धीचा हिणकस चवचालपणा आहे असें बेलाशक समजावें ! )

अत्यंत मोहक कल्पनाचित्रे (images) रंगविण्याच्या बाबतींत गडकऱ्यांचा हात आधुनिक मराठी वाङ्मयात कोणी धरूं शकेल अशी शकाहि मला कधी आली नाही. या बाबतींत गडकरी बादशहा आहेत. किंबहुना कल्पनाचित्रे हा काय प्रकार असतो ते प्रथम गडकऱ्यानीच आधुनिक काळीं दाखवून दिले, व त्याच्यानंतर कोणाहि कवीला किंवा नाटककाराला त्याचे सिंहासन हिरावून घेता आले नाही. सिंहासन हिरावून घेणें बाजूलाच राहिलें, त्याच्या आसपास फिरकण्याचीहि क्वचितच एखाद्याची प्राज्ञा झाली असेल. ‘ मधुर सुगंधी स्वप्ने ’ या प्रकरणात गडकऱ्यांच्या काही मोहक कल्पनाचित्राचा परिचय करून दिलेलाच आहे. प्रेमसंन्यास, पुण्यप्रभाव, राजसंन्यास, या तीन नाटकात, विशेषतः पहिल्या दोन नाटकात, या कल्पनाचित्राचा अक्षरशः सडा पडलेला आहे. एकच प्याला या नाटकातहि चवथ्या अंकाच्या चवथ्या प्रवेशात अनेक प्रभावी कल्पनाचित्राची मालिका आहे. “ या एकच प्याल्यात काय आहे म्हणून विचारतोस ? ” इत्यादि वाक्याने सुरू होणारें सुधाकराचे भाषण यासाठी पाहावे. या उताऱ्यातील प्रत्येक कल्पनाचित्रात जीविताला वैतागलेल्या व मृत्यूला आमंत्रण करणाऱ्या सुधाकराच्या मनातील विलक्षण कडवटपणाचा अर्क उतरलेला असला तरी तीं सारींच कल्पनाचित्रे अत्यंत प्रभावी व

आकर्षक झालीं आहेत हें कोणीहि कबूल करील. गडकऱ्यांच्या प्रतिभेला या ठिकाणीं अक्षरशः उन्माद चढलेला आहे असेच एखाद्याला वाटेल.

"आता या रिकाम्या प्याल्यात काय दिसते तुला? काहीं नाहीं? नीट पहा, म्हणजे श्रीकृष्णाच्या तोंडात विश्वरूपदर्शनप्रसगीं यशोदेला जे चमत्कार दिसले नसतील ते या रिकाम्या प्याल्यात तुझ्या दृष्टीला दिसतील. काबाडकष्ट उपसून आलेला थकवा घालविण्याच्या आशेने दारू पिणाऱ्या मजुराच्या या पहा झोपड्या! निरुद्योगाचा वेळ घालविण्यासाठीं म्हणून दारू पिणाऱ्या श्रीमताच्या या हवेल्या! केवळ प्रतिष्ठितपणाच लक्षण म्हणून चोचल्यान दारू प्यायला शिकलेल्या पढतमूर्खांचा हा ताडा!, अकलेच्या मार्गान न साधणारी गोष्ट मजलशींत एखाद्याजवळ साधून घेण्यासाठी धूर्ततेने त्याच्या बरोबर म्हणून थोडीशी प्यायला लागून पिता पिता शेवटीं स्वतःही बुडालेल्या व्यवहारपडिताची ही पागा!.....दारूबाज नवऱ्याच्या बायकाचीं हीं पहा पाढरीं फटफटीत कपाळं! दारूबाजाच्या पोरक्या पोराच्या या उपासमारीच्या किंकाळ्या! कर्त्यासवरत्या मुलांच्या अकालीं मरणान तळमळणाऱ्या वृद्ध मातापितराच विव्हळण...... स्त्रीजातीला नटविण्यासाठीं समुद्राच्या उदरातून जितकीं मोतीं बाहेर निघालीं नसतील त्याच्या दसपट आसवाचीं मोतीं स्त्रीजातीन या एकच प्याल्यात टाकली आहेत...हा पहा जगावर अमल चालविणारा बादशहा शिकदर, दारूच्या अमलाखालीं केवळ मारेकरी बनून आपल्या जिवलग मित्राचा खून करीत आहे! तो पहा, मेलेल्याला सजीव करणारा दैत्यगुरु शुक्राचार्य आपल्या त्या सजीवनीसह या एकच प्याल्यात स्वतःच मरून चूर झाला आहे! जगाच्या उद्धारासाठीं अवतरलेल्या श्रीकृष्ण परमात्म्याचें हे पहा छप्पन्न कोटी यादववीर दारूच्या एकच प्याल्यात बुडून अधःपात भोगीत आहेत!......"

हा उतारा बराच लांब झाला असला तरी कल्पनाचित्रें निर्माण करण्याचें गडकऱ्याचें कौशल्य किती वरच्या दर्जाचे होते हें समजावून घेणें त्यायोगें

सुलभ होईल. या उताऱ्याच्या जोडीला मागच्या प्रकरणांत गडकऱ्यांच्या इतर नाटकांतील जे उतारे उद्धृत केले आहेत ते याच दृष्टीने वाचावेत. म्हणजे गडकऱ्याच्या कल्पकतेच्या विलासाचें स्वरूप बरेचसे कळून येईल.

गडकऱ्याच्या कल्पकतेचें आणखी एक महत्त्वाचे अंग म्हणजे उपमा, रूपकें, उत्प्रेक्षा, दृष्टात इत्यादि अर्थालकार. नाटकात या प्रकारच्या अलकाराची धुद पखरण झाली असल्यामुळे त्याची नाटके पराकाष्ठेची काव्यमय झालेलीं आहेत हे उघड आहे. हे अलकार त्यांनी निरनिराळ्या मोहक कल्पनाचित्रांत मोठ्या कौशल्याने गुफून टाकले आहेत. यामुळे सुवर्णाच्या कोंदणात जडविलेल्या पैलूदार रत्नाप्रमाणे, अथवा गेंदेबाज फुलाच्या हारांत गुफलेल्या पालवीप्रमाणे त्याची शोभा दिसते. या कौशल्याचीं उदाहरणें किती म्हणून द्यावीं? **पुण्यप्रभावाच्या** पहिल्याच प्रवेशातील ईश्वराचीं पुढील वाक्ये केवळ नमुना म्हणून समजावी.

"विश्ववैभवाची वैजयती लक्ष्मीवल्लभासारख्या लोकैकपुरुषाच्या कठीं पडली तर तिच्याकडे आशेने पाहणाऱ्या भणगाने आपल्या भिकारी भाग्यदेवतेला बोल लावावा, यात वैजयतीचा काय दोष? आकाशातून उतरलेल्या हिमवर्ताने फुलत्या फुलाच्या हृदयात ठाव घेतल्याबद्दल, जमिनीशीं जग्नडलेल्या दगडाने दुर्दैवाला दोष देत बसावे!"

झालेली प्रेमनिराशा मनातून काढून टाकून प्राप्त परिस्थितींत समाधानाने राहण्याचा पोक्त व व्यवहारी सल्ला वसुधरेने दिला असता ईश्वर म्हणतो-

"खऱ्या सुखाच्या निराशेनतर हे कशाचे सुख आणि समाधान! गजान्तलक्ष्मीच्या राजवैभवात मिरवणूक काढण्यासाठीं आणलेल्या हत्तीच्या मढ्यावर हस्तीदती सामानाचे दुकान काढण्याचा प्रसग आला तर त्यात कोण समाधान मानील? पिकास आलेल्या क्षेत्रभागावर तरगणाऱ्या मेघापासून कृषीवलाने जीवनाची आशा करावी आणि शेवटीं वृष्टि केल्यावाचून मेघ निघून गेल्यावर, निदान त्याच्यापासून क्षणभर छाया मिळाली म्हणून समाधान मानावे तशातलाच हा प्रकार नाहीं का?"

**पुण्यप्रभावाच्या** पहिल्या अंकाच्या दुसऱ्या प्रवेशांतील वृंदावनाच्या भाषणातील दृष्टांतांची व उपमांची ही नाजूक पखरण पाहा—

"प्रखर सूर्याच्या प्रकाशात कोमेजणारी नाजूक कुमुदिनी चंद्राच्या कोवळ्या किरणांनी तरी खुलते, आठ महिने गप्प बसलेल्या कोकिळेला वसंतऋतूंत तरी कंठ फुटतो, पण इथे तर कधीं कळी उमलायची नाहीं आणि कधीं तोंडातून शब्द निघायचा नाही... .. हा प्रसंग आवरता घेतला पाहिजे! कोमल चंद्रिकेने कठिण चंद्रकांत पाझरतो. झुळझुळत्या झऱ्याच्या नाजूक झरणीने काळ्याकभिन्न कड्यालाहि कंगोरा पडतो! त्याप्रमाणे हिच्या अश्रूंच्या झिरपणीने माझ्या हृदयाचेही पाणी होऊन जाईल!"

मॅथ्यू आर्नोल्डच्या ‘सोराब ॲंड रुस्तम’ या प्रसिद्ध कवितेत ‘एपिक सिमिली’ अथवा ‘होमेरिक सिमिली’ या नावाने प्रसिद्ध असलेल्या उपमेच्चीं काही सुंदर उदाहरणे आहेत. याना वाटले तर sustained imagery असेहि नाव द्यावे. शेक्सपियरच्या नाटकात याची अनेक उदाहरणे आहेत. **पुण्यप्रभावांत** या प्रकारच्या ‘इमेजरी’ चे एक सुंदर उदाहरण दुसऱ्या अंकाच्या दुसऱ्या प्रवेशात आढळेल.

"शांतस्वरूप वृक्षलतांवरून सृष्टीच्या वायुमय जीवनलहरी अगदीं नाजुक जोराने वाहून नुसत्या कोवळ्या अंकुरानाच नाचवीत असल्यामुळे निजसऱ्या बाळाला झोप लागली कीं नाहीं हे पाहण्यासाठीं आईने पावलाची चाहूल न होऊ देता त्याच्याजवळ जावे, ममतेच्या मोहाने खिळलेल्या नजरेने त्याला निरखीत रहावे, उष्ण निश्वासाच्या स्पर्शाने त्याची झोपमोड होऊ नये म्हणून जीवनक्रियाही जपून करावी, आणि त्या मंद निश्वासाच्या न कळण्याजोग्या लहरींनीं त्या चिमुकल्याच्या तोंडावर रुळणारा एकाददुसरा केसच भुरभुरत रहावा अशा मनोहर प्रसंगाचे चित्र डोळ्यांसमोर सारखे तरळत आहे."

उत्कृष्ट कल्पनाचित्राची व त्यांत गुंफलेल्या जरतारी अलंकाराची गडकऱ्याच्या नाटकात जशी मोहक पखरण सर्वत्र दिसून येते तशी त्याच्या

कवनात दिसून येत नाही हें अगदी खरें आहे. कधीं? **स्मृतिगीत फूल ना फुलाची पाकळी, तीन तरी. देवाघरची दौलत हरपताना पाहून** इत्यादि काही उत्कृष्ट गीतात मोहक कल्पनाचित्रें आहेत हें खरें आहे. पण गडकऱ्याच्या एकदर कविताच्या मानाने मोहक कल्पनाचित्रें रगविणाऱ्या अशा गीताची सख्या अगदीच बेताची आहे हें सहज दिसून येईल. स्पष्टच बोलावयाचे तर, गडकऱ्याच्या कल्पनाविलासाचा सारा भर त्याच्या नाटकात दिसून येतो. सुदर कल्पनाचित्रे व रुचिर अर्थालकार याची लोभसवाणी गुंफण नाटकामध्ये जशी दिसते तशी ती त्याच्या कवनात दिसत नाही. वास्तविक काव्य हेच कल्पनाचित्रे रगविण्यासाठी सर्वोत्कृष्ट क्षेत्र होय परंतु या बाबतींत गडकरी व शेक्स्पियर यांच्यामध्ये मोठें विचित्र साम्य दिसून येईल 'इमेजरी' (फिगरेटिव्ह इमेजरी व लिटरल इमेजरी' या दोन्ही प्रकारची इमेजरी) आणि मेटॅफर—सस्टेन्ड मेटॅफर व मेटॅफरचे इतर अनेक प्रकार—याची स्वैर पखरण शेक्स्पियरच्या नाटकात झाली आहे, पण त्याच्या कवनात मात्र या गोष्टी अगदीच नाममात्र आहेत, किंवा जवळ जवळ नाहीत असे म्हटले तरी चालेल. त्याच्या एकशे चौपन सुनीतात कल्पनाचित्र क्वचितच आढळेल (उदा. ७३ वे सुनीत), आणि मेटॅफरचीहि तीच गत आहे. हे असें का झाले? आपल्या स्वत च्या 'हृदयाच्या अतर्हृदयात' खोल दडलेल्या व सारे भावजीवन भारून टाकणाऱ्या हळव्या भावनाचा आविष्कार करणे हाच शेक्स्पियरच्या सुनीताचा एकमेव हेतु आहे. यामुळे सुनीतात भावनाविष्काराची आत्यतिक उत्कटता ठायीं ठायीं दिसून येते. आपल्या नाटकात खास स्वतःच्या, अगदी वैयक्तिक, अशा ज्या भावनाचा उत्कट, प्रामाणिक व रसरसलेला अविष्कार करणे शेक्स्पिअरला नाट्याच्या अनेकविध बधनामुळे शक्य झाले नाही त्या साऱ्या भावनाचा उचबळून आलेला उद्रेक त्याच्या सुनीतातून ओसडून वाहत आहे. भावनोद्रेकाच्या उत्कट आविष्काराच्या लालसेने मन भारून गेले असताना कल्पनाचित्रें व तत्सम गोष्टी याना वाव कसा मिळणार? नाटकांमध्ये मधूनमधून शेक्स्पिअरची मनोवृत्ति कळत अथवा नकळत प्रकट होत असते हें खरें असले तरी हें सारें

त्रुटित स्वरूपाचें आहे. सुनीताची मात्र तशी गोष्ट नाही. सुनीतें हीं त्याच्या वैयक्तिक अनुभवातूनच स्फुरलेलीं आहेत, जगाला माहीत नसणाऱ्या त्याच्या स्वतःच्या भावनाचें प्रतिबिंब त्याच्यामध्ये स्पष्टपणें पडलें आहे, याविषयीं शंका असण्याचें काही कारण नाही. नेमका असाच प्रकार गडकऱ्याच्या बाबतींतहि झाला आहे असे म्हणता येईल. नाटकामध्ये मधूनमधून गडकऱ्याच्या मनोवृत्तींतील कांही महत्त्वाची वैशिष्ट्यें प्रकट होत असतात हें अगदी खरें आहे. तथापि खास स्वतःच्या उत्कट भावनाचा मनसोक्त आविष्कार त्याना नाटकाच्या द्वारे करता येणें शक्यच नव्हते. नाटकात एखाद्या पात्राला पुढे करून प्रसगोपात्त हे करणे जमतें. काव्याचे मात्र तसे नाही. आत्मनिष्ठ, आत्माविष्कारी भावगीतात उत्कट वैयक्तिक भावनाचा उद्रेक जसाच्या तसा आविष्कृत करण्याची सोय असते—किंबहुना आत्माविष्कारी भावगीताचा हाच प्रधान उद्देश असतो. गडकऱ्याच्या एकदर कविताचा साकल्याने विचार केला असता, वैयक्तिक प्रेमभावनाचा आविष्कार करणारी गीते सख्येने व भावनोत्कटतेच्या दृष्टीने ताबडतोब डोळ्यात भरण्यासारखीं आहेत हे सहज दिसून येईल. १९१४ च्या उत्तरार्धापासून १९१७ पर्यंत त्यानी जीं गीत लिहिलीं त्याच्यापैकी बहुतेक सारीं गीते वैयक्तिक प्रणयानुभूतींचा–निष्प्रेम जीवनाच्या व्यथाचा, प्रेमोद्भवाच्या आनदाचा, प्रणयविकासाचा व दारुण प्रेमनैराश्याचा—आविष्कार करणारींच आहेत. याशिवाय या काळात, इग्रजींत ज्याना songs म्हणतात अशीं काही उत्कृष्ट गीते त्यानी लिहिलीं. या प्रकारच्या गीतात स्पष्टपणे आत्माविष्कार नसला तरी त्याच्यातील कल्पनाचित्रें त्याच्या वैयक्तिक अनुभूतींशीं संबद्ध आहेत हे सहज दाखविता येईल. ( उदा. कधीं ? तीन तरी जीवितास, इत्यादि कविता पाहाव्या. ) नाटकाच्या क्षेत्रात भरपूर यश मिळेपर्यंत गडकऱ्यानी काव्याच्या क्षेत्रात काही क्रीडिते केलीं. परतु नाट्यक्षेत्रात स्पृहणीय यश पदरात पडल्यानतरहि गडकरी कविता लिहीत असत तें केवळ वैयक्तिक भावनाचा रसरसलेला, उत्कट आविष्कार करावयास सापडावा या एकाच हेतूने, हे त्याच्या कविताच्या कालानुक्रमावरून सहज सिद्ध करून देता येईल. असे असल्यामुळे, वर उल्लेखिलेल्या काही गीताचा

( songs ) अपवाद वगळला तर सप्टेंबर १९१४ ते १९१७ या तीन साडेतीन वर्षांच्या काळात गडकऱ्यानी लिहिलेल्या भावनोत्कट आत्मनिष्ठ कवितामध्ये नाटकातल्या कल्पनाचित्राप्रमाणे मोहक कल्पनाचित्रे व सुबक अर्थालकार या गोष्टी दिसून आल्या तर ते स्वाभाविकच नाही काय? आणि गडकऱ्याच्या महत्त्वाच्या कवितामध्ये उत्कट आत्माविष्कार करणाऱ्या कविताची सख्या कितीतरी मोठी आहे. नाटकामध्ये गडकऱ्यांच्या कल्पनाविलासाचा जो स्वैर व मोहक उन्माद दिसून येतो तो त्यांच्या कवितामध्ये कां दिसून येत नाही याची ही अशी मीमासा आहे.

तथापि, गडकऱ्याच्या कवितात कल्पनाविलास—कल्पनाचित्रे व अर्थालकाराचा उपयोग या गोष्टी—अजिबात नाही असा गैरसमज मात्र कोणीहि करून घेऊ नये. उत्कट भावनाविष्काराचा उद्रेक ज्याच्यामध्ये ओतप्रोत भरलेला आहे अशा प्रेमगीताच्या बाबतींतच हे बहुशीं खरे आहे ही गोष्ट नीट ध्यानात वागविली म्हणजे समजुतीचा घोटाळा होणार नाही. प्रेमगीताच्या ऐन अमदानींत गडकऱ्यानी लिहिलेल्या काही गीतात सरस कल्पनाचित्रे आढळून येतात हे वर दाखविलेच आहे. मग गडकऱ्याचा खरा कल्पनाविलास ज्याच्यामध्ये पुरेपूर प्रकट झालेला आहे अशा कविता कोणत्या? **राजहंस माझा निजला, प्रेमपाठ, चिमकुलीच कविता, अरुण, अरुण ( दुसरा )** या त्या महत्त्वाच्या कविता होत. **अरुण ( दुसरा )** हा एकच अपवाद वगळला तर उरलेल्या चारहि कविताचा प्रसिद्धिकाल उपलब्ध आहे. **राजहंस माझा निजला**— जुलै १९१२; **प्रेमपाठ**—सप्टेंबर १९१२, **चिमुकलीच कविता**—सप्टेंबर १९१३, **अरुण**—सप्टेंबर १९१४. **मनोरजनांत** या कविता प्रथम प्रसिद्ध झाल्या तो महिना व ते साल वर दिले आहे. प्रसिद्धिकालाच्या पूर्वी थोडे दिवस तरी या कविताचे लेखन झाले असलें पाहिजे हे उघड आहे. यावरून मे १९१२ पासून ऑगस्ट १९१४ या सुमारे सवादोन वर्षांच्या काळातील या कविता आहेत. गडकऱ्याचीं प्रेमगीते १९१४ च्या ऑगस्टपासून प्रसिद्ध व्हावयास सुरवात झाली ( ती कोण? —ऑगस्ट १९१४ ). १९१५ च्या सुरवातीपासून पुढे आयुष्याच्या

अखेरपर्यंत गडकऱ्यानी ज्या अनेक कविता लिहिल्या त्यामध्यें केवळ स्वैर व उन्मत्त कल्पनाविलासाला वाहिलेली एकहि कविता नाही ही गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. याचा अर्थ अगदी स्पष्ट आहे. प्रेमभावनेचा आविष्कार कवितातून करावयास सुरवात केल्यानंतर गडकऱ्यानी स्वैर कल्पनाविलासाला आपल्या कवितात थारा दिला नाही. कविता त्यानी केवळ उत्कट आत्माविष्कारासाठी राखून ठेवल्या आणि कल्पनाविलास नाटकामधून दाखविला. वर उल्लेखिलेल्या, स्वैर कल्पनाविलासासाठीच केवळ प्रसिद्ध असलेल्या चार कविता गडकऱ्यानी ज्या काळात लिहिल्या त्या काळात **प्रेमसंन्यासातील** स्वैर कल्पनाविलासाची व कृत्रिम अलकारप्रचुर शैलीची मोहनी त्याच्या मनावर फार असली पाहिजे हे उघड आहे. **पुण्यप्रभाव** हें नाटक लिहावयास सुरवात होण्यापूर्वीच्या या साऱ्या कविता आहेत. या साऱ्या गोष्टी नीट ध्यानात वागवून सदर कवितामधील कल्पनाविलासाचें स्वरूप पाहिले पाहिजे.

गडकऱ्यानी **प्रेमसंन्यास** नाटक लिहिलें तेव्हा त्याची पचविशी जेमतेम पुरी झालेली होती. शब्दातील नादाचा ( sound ) विलक्षण मोह या वेळीं त्याच्या मनाला होता. शब्दाच्या नादमाधुर्याने ते धुंद होऊन जात असत. ही एक प्रकारची बेहोषीच म्हणावयास पाहिजे. या बेहोषीच्या जोडीला आणखी एक विचित्र बेहोषी या काळात त्याच्या ठिकाणीं स्पष्ट दिसून येते. रूपकाच्या अनावर आसक्तीने ही बेहोषी निर्माण झालेली होती. या आसक्तीच्या पायीं नाटकातील गद्यभाग पराकाष्ठेचा कृत्रिम व भडक रंगानी ओतप्रोत भरलेला असला तरी त्याची यत्किंचित् फिकिर करण्याचें त्याच्या मनातहि येत नसे. प्रसंग व व्यक्तींची मनःस्थिति इत्यादि गोष्टींची सर्वस्वी उपेक्षा करून त्यानी **प्रेमसंन्यासांत** अनेक ठिकाणीं रूपकाची स्वैरपणें खैरात केली आहे; व त्यायोगें शैली पराकाष्ठेची कृत्रिम झाली तरी त्याचे त्याना काहीहि वाटले नाही. हा तारुण्यातील उसळत्या रक्ताचा व उसळत्या प्रतिभेचाच प्रभाव होय यांत शंका नाही. कालांतराने शब्दांतील नादामुळे व रूपकाच्या अतिरिक्त हव्यासामुळे उत्पन्न झालेली बेहोषी हळुहळु कमी होत गेली हें पुढील नाटकावरून व कवितांवरून सहज दिसून

येईल. तथापि **प्रेमसंन्यास** लिहिण्याच्या वेळीं, म्हणजे १९१२ च्या सुरवातीला, या धुंदीचा गडकऱ्यांच्या मनावर जबरदस्त पगडा होता. **प्रेमसंन्यासाच्या** दुसऱ्या अंकातील पांचवा प्रवेश वाचला म्हणजे या गोष्टीचा पडताळा मिळेल. विशेषत: लीलेने आपला हात जयताच्या हातांत दिल्यानतर त्याने केलेलें ' दूर हो, लीले, दूर हो, मन पापी आहे तसेंच ते अनावरही आहे ' या वाक्याने सुरू होणारें भाषण अवश्य वाचावें. वास्तविक, प्रसंग असा विलक्षण आहे की, जयत व लीला यांचा भावनोद्रेक अनावर व्हावयास पाहिजे; आणि तसा तो झालेला असावा असें वाटतें. पण आपल्या भावनांच्या उद्रेकाचा आविष्कार मात्र जयंत पल्लेदार परपरित रूपकांनी करीत आहे हे लक्षांत ठेवण्यासारखे आहे. यामुळे जे भाषण अत्यत भावनोत्कट व्हावे अशी आपली अपेक्षा असेल ते भावनोत्कट न होतां अत्यंत कृत्रिम व भावनाशून्य झालें आहे. काव्यमय भाषणाबद्दल काहीच तक्रार असण्याचे कारण नाही. शेक्स्पियरच्या नाटकातील अनेक भावनोत्कट प्रसंग कमालीच्या काव्यमयतेने नटलेले आहेत. मेटरलिंकच्या **मोना व्हॅना** या नाटकांतहि अनेक भावनोत्कट प्रसग पराकाष्ठेचे काव्यमय आहेत. पण **मोना** व्हॅनामधील दुसऱ्या अंकाचा बहुतेक सारा भाग पराकाष्ठेच्या काव्यात्मतेने ओतप्रोत भरलेला असला तरी त्यात दुर्बोधता अथवा क्लिष्टता लेशभरहि नाही, सारें कसे मोहक, मुलायम आहे ! हिरवळीवर पडलेल्या गुलाबाच्या पाकळ्यावरून चालत जात आहोंत असा भास व्हावा इतकें **मोना** व्हॅनाच्या दुसऱ्या अंकांतील काव्य गोंडस व सुबक आहे. शेक्स्पियरसुद्धा अनेक ठिकाणीं रूपकांचा उपयोग करूनहि मोहक काव्यात्मता निर्माण करू शकतो. परतु **प्रेमसंन्यासापुरतेंच** बोलावयाचें झालें तर, क्लिष्टता किंवा दुर्बोधता उत्पन्न होऊं न देता गद्यामध्ये सरस मोहक काव्य कसें लिहितां येईल हें गडकऱ्याना आरंभीं जमले नाही असेंच म्हणावें लागते. मधून मधून प्रासादिक, सुबोध काव्य दिसलें ( उदा. अंक. १, प्र. ५ मधील सुरवातीचेंच लीलेचें स्वगत भाषण पाहावें. ) तरी एकंदरींत शब्दांचें अवडंबर, रूपकांच्या मालिकेचा अनावर सोस, नादमाधुर्याचा विलक्षण हव्यास, लांबलचक वाक्यें लिहिण्याची हौस इत्यादि गोष्टींमुळें बहुतेक सारे

भावनोत्कट प्रसंग कृत्रिम व परिणामशून्य झाले आहेत. वर ज्याचा उल्लेख केला आहे त्या दुसऱ्या अंकांतील पाचव्या प्रवेशातील जयताच्या भाषणांतील रूपकाची ही बेडौल व नीरस माळ पाहा—

"अविचाराच्या अमावास्येमुळें खळबळणाऱ्या हृदयसमुद्रांतल्या प्रेमजलाच्या लाटाचा हा धडधडाट तुला ऐकू येत नाहीं का? या उष्ण निश्वासानें–दग्ध होत चाललेल्या विवेकाच्या या धुराने तुझी कोमल काया करपून जाणार नाहीं का? चोरट्या पापस्पर्शाने रध्रारध्रातून आत शिरूं पाहणाऱ्या अस्थानी आनदाला बाहेरच्या बाहेर थाबवून माझ्या शरीराच्या किल्याच्या रक्षणासाठीं प्रतिरध्रा–जवळ पुलकांच्या बुरुजावर उठून उभी राहिलेली ही रोमाचसेना तुला मागें लोटीत नाहीं का?........."

हें काव्य आहे असें म्हणण्याची माझी मुळीच तयारी नाही. हें काव्याचे बेगडी सोंग आहे, हे मोहक, नाजूकसाजूक लास्य नसून डमरूच्या साथींत चाललेलें ताडव आहे!

या असल्या कृत्रिम, बेगडी, बेडौल शैलीचा ज्या काळात गडकऱ्यांच्या मनावर विलक्षण पगडा होता त्याच काळात (१९१२ जून) **राजहंस माझा निजला** ही गाजलेली कविता त्यानी लिहिली हें लक्षांत ठेवलें म्हणजे सदर कवितेंतील शैलीच्या स्वरूपाची बरीचशी कल्पना येईल. ही कविता वास्तविक सत्यसृष्टींतील एका घटनेवर आधारलेली आहे. गडकऱ्याना हा प्रसग प्रत्यक्ष पाहावयास सापडलेला होता असे मला निश्चित समजलें आहे. यामुळे एकुलत्या अपत्याच्या निधनाने होणारा विधवा आईचा शोक कसा असतो हे त्यांच्या चागल्या परिचयाचें होतें. हा शोक त्याना मृदु, काव्यमय शैलीचा आश्रय करून उत्कटपणें व परिणामकारक रीतीने खास वर्णितां आला असता. पण **प्रेमसंन्यासां**तील रूपकाची अतिरिक्त लालसा मार्गांत आडवी आली; व हा दारुण प्रसंग म्हणजे रूपकांची मालिका बनविण्याच्या आपल्या कौशल्याला आव्हानच आहे असेंच जणुं गडकऱ्यांच्या मनाने घेतलें असावें, व यामुळे वर उद्धृत केलेल्या प्रेम-

संन्यासांतील उताऱ्यातील परपररित रूपकांचीच येथे पुनरावृत्ति झाली आहे. एक उदाहरण पाहा.

या माझ्या मानससरमीं, सारखे प्रेमजल वाही !
त्या तरंगलहरींवरती । राजहंस पोहत राही !
सारखा पोहुनी दमला, मग मला भुकेला बाही !
नयनाच्या शिपामधुनी
अश्रूंचे मौक्तिकसुमणी,
मी दिले तया काढोनी,
मोत्याचा चारा असला, राजहंस खाउनि निजला !
ते वैकुंठेश्वर गेले, पदि त्याच्या अर्पायाला,
हा अखंड या अश्रूंनी, वैजयंति मोहनमाळा,
मी धरित असे केव्हांवी, धरुनिया उराशीं बाळा !
कौस्तुभ हा माळेमधला !
हृदयाचे कोंदण याला !

एका ' राजहंस ' या शब्दामुळे मानस सरोवर आलें, ( ' मानस ' या शब्दाचे दोन अर्थ स्पष्ट आहेत.)[२], प्रेमरूपी जल आले, त्या जलावरील तरंग आले, त्या तरंगावर पोहणाऱ्या राजहंसाला चारा म्हणून नयनरूपी शिंपल्यामध्ये वास्तव्य करणारे अश्रूरूपी मोतीहि आले ! काय हा उपद्व्याप ! या कवितेंतहि काही गोड कडवीं आहेत ( उदा. ४, ५, ६, ७ ); परंतु वर उद्धृत केलेलीं अत्यंत कृत्रिम कडवीच खरीं लोकप्रिय आहेत–आज सुद्धा लोकप्रिय आहेत असे मला अनेकवार दिसून आले आहे.

या कवितेनंतर चारच महिन्यानी प्रेमपाठ ही कविता प्रसिद्ध झाली. या कवितेंतहि रूपकांची पखरण आहेच. राजहंस माझा निजला या कवितेत शोकमग्न विधवा आईच्या उत्कट भावनाचें चित्रण कवीला करावयाचें होतें. या ठिकाणीं असा काहीच प्रकार नसून केवळ निसर्गातील रम्य दृश्यांचें वर्णन करावयाचें असल्यामुळें या रूपकाचा ताप होत नाही हें कबूल केलें पाहिजे. या कवितेतील चैतन्योक्तीच्या उपयोगामुळे 'बालकवीं'च्या काही प्रसिद्ध निसर्गगीतांतील कल्पनाविलासाची ( उदा. 'फुलराणी' ) आठवण झाल्यावाचून राहणार नाही.

आकाशाच्या लग्नमंडपी लता करवल्या या
वृक्षबालका लाजुनि पल्लव सावरिता दमल्या !
कळ्या कोंवळ्या, हलती कानी डूल मजेदार,
उषा–वधूवरि सुमाक्षताहीं करिती भडिमार.
नवरदेव नाचरा निघाला, ती पाठोपाठ—
लाजुनि झाली उषा दूर, कुणि द्या पदरा गाठ.

इंग्रजींत sustained imagery या नावाने प्रसिद्ध असलेला प्रकार पुढील ओळींत दिसून येईल.

दिशेदिशेच्या दिक्पालानो ! सावधान सगळे !
संध्यापट–पीतांबर काढा, तारावल जमले !
प्रेममंगलाष्टके सारखी जगीं गाजवा हो !
मेघाचा चौघडा गगनिंचा जगीं वाजवा हो !
नक्षत्राच्या करा अक्षता शुभमंगल बोला !
सप्तपदीची चाल चालवा सप्तभुवनि सकला
दुग्धचंद्रिका जिकडे तिकडे नवरदेव ओती
पुष्परेणु–शर्कराकणाची पृथ्वी करि भरती !

'सस्टेन्ड इमेजरी'चे आणखी एक उदाहरण—

हृदयपटावरि निज लज्जेचा लाल रंग उधळा,
प्रेमपल्लवीं लिहुनी कुंकुमपत्रे द्या सकला
प्रीतिदेविचें आज निघाले लग्न निसर्गाशीं,
वऱ्हाड जमले, मुहूर्त भरला, धीर न कोणाशीं
वनदेवींच्या मुलिंनो ! या ग, या लौकर म्हणुनी,
पराग उधळित, सुवास पसरित, कोमल हातानीं !
हिमवतीच्या जलीं मिसळुनी मरंदमय तेला,
स्नान सुमंगल घाला कोणी प्रीतिदेवतेला !
शशिकिरणाचे तंतु भिजवुनी संध्यारंगानीं
अष्टपुत्रि द्या नव नवरीला कुणीतरी विणुनी.
हिमगिरिशिखरीं स्फटिकशिलातरिं रविकिरणें शिरती,
प्रतिकिरणें पाझरती भरभर अतिकोमल असती.
मुग्ध अधरिंच्या गुलाबि रंगीं रंगवुनी त्यांना
त्या सूत्रांची काचोळी कुणि नवरीला द्याना......

अनेक फुलांचे, त्यांच्या वैशिष्ट्यांसह उल्लेख हा या कवितेचा एक विशेष होय. सूर्यविकासी व चंद्रविकासी कमळें, जास्वंदी, गुल्बशी, तेरडा, निशिगंध, कोरांटी, धत्तूर, कण्हेर, शेवंती, जाई, मोगरा, गुलाब, आम्रमांजिरी, तुळशीची मंजुळा, पारिजातक, बकुल इत्यादींचीं वैशिष्ट्यें कवीने उत्कृष्टपणें वर्णिलीं आहेत.

चिमुकलीच कविता सप्टेंबर १९१३ मध्ये प्रसिद्ध झाली. दहा वर्षांच्या एका गोंडस मुलीच्या निष्पाप सौंदर्यावर केलेल्या कल्पना या कवितेंत आढळतील. या कवितेंत कांही सुंदर उत्प्रेक्षा आहेत; आणि हेंच या कवितेचें सर्वांत महत्त्वाचें वैशिष्ट्य होय.

धवलवर्ण हा देहावरती फुलल्या पुष्पाचा,
लाल छटा वर, जणू पसरला रसचि गुलाबाचा !
त्याच फुलाच्या वळुनि पाकळ्या पोकळशीच घडी,
झालि तीच वाऱ्यावर हलत्या ओठाची जोडी !
सडा पसरला आत कोंवळ्या बारिक मोत्यांचा
ओठाआडचि अर्धा पडला खेळ पहा त्याचा !

* * *

केंस कोंवळे, सरळचि काळे, कुरळेही कांहीं,
तुळतुळीत मोकळे, मनासम नच बंधन त्यांहीं !
गालिं लोळती काहीं, कांहीं कानावर पळती,
पवनीं खेळति कांहीं किंवा मानेवर ढळती,
पाशरूप पुष्कळसे परि ते पाठीवर रुळती,
चकचकीत जणु लहरि जलाच्या पवनें झुळझुळती !

प्रेमपाठ ही कविता गडकऱ्यांनीं 'बालकवीं'च्या शैलीचें अनुकरण करून लिहिलेली आहे यांत मुळीच शंका नाही. या कवितेवर 'बालकवीं'च्या फुलराणी या कवितेची दाट छाया आहे. 'वनदेवीच्या मुलिंनो, या ग या लौकर म्हणुनी' या गडकऱ्यांच्या ओळींतल या ग हे शब्द तर अस्सल 'बालकवीं'च्या वळणाचे आहेत. गडकऱ्यांची ही ओळ वाचतांच 'सुवासिनींनों, वनदेवींनों, डोला ग डोला' या 'बालकवीं'च्या अरुण या कवितेंतील ओळीची आठवण झाल्यावाचून राहणार नाही. 'बालकवीं'ची अरुण

ही कविता जुलै १९११ च्या **मनोरंजनांत** प्रसिद्ध झाली; **फुलराणी** याच सालीं सप्टेंबरमध्ये प्रसिद्ध झाली. **संध्यारजनी** ही त्यांची कविता १९११ च्या ऑगस्टमध्ये, व **निर्झरास** ही कविता १९१३ च्या मे मध्ये प्रसिद्ध झाली. 'बालकवीं'च्या या कवितांतील विशिष्ट पद्धतीचा, शैलीचा, संवेदनांच्या आविष्काराचा, व त्यांतील चैतन्योक्तीचा तत्कालीन कवींपैकी अनेकांवर फार मोठा परिणाम झाला व कांही कवींना त्यांचें थोडा वेळ अनुकरण करण्याचा मोह आवरला नाही हें अगदी खरें आहे. गडकऱ्यांनाहि असा मोह कांही दिवस झालेला होता हें त्यांच्या **प्रेमपाठ, चिमुकलीच कविता** व **अरुण** या कवितांवरून दिसून येईल. आपण **अरुण** ही कविता 'बालकवीं'च्या **अरुण** या कवितेचें अनुकरण करून लिहिलेली आहे याची स्पष्ट कबुली स्वतः गडकऱ्यांनीच दिलेली आहे. **अरुण** ( दुसरा ) या कवितेच्या प्रास्ताविक टीपेंत गडकरी म्हणतात— " यापूर्वीची या विषयावरील पहिली कविता रा. ठोमरे यांच्या वळणाची आहे. " 'बालकवीं'च्या **अरुण** या कवितेचें अनुकरण करून एक कविता गडकऱ्यांचे 'तुतारी मंडळां'तील सहकारी श्री. 'भालचंद्र' ( टिपणीस ) यांनीहि लिहिली होती. सदर कविता १९१२ जूनच्या **मनोरंजनांत** प्रसिद्ध झाली असून **बिछान्यावरचा अरुण**[३] असा तिचा मथळा आहे. गडकऱ्यांच्या अरुणावरील दोन्ही कवितांमध्ये श्री. 'भालचद्र' यांचीच पद्धति अवलंबिलेली आहे.

खरें म्हणजे 'बालकवीं'नी ज्या विषयावर एक कविता लिहिली त्याच विषयावर गडकऱ्यांनी तीन वर्षांच्या आंतच दुसरी कविता लिहावयास नको होती. बरे, लिहिलीच तर 'बालकवीं'चें केवळ बालिश अनुकरण न करता स्वतःचें एखादें खास वैशिष्टय, स्वतःची खास पद्धति व शैली यांचा आविष्कार त्यांनी केला असता तर ते ठीक झालें असतें. 'स्कायलार्क' या एकाच विषयावर इंग्रजींत वर्ड्स्वर्थचें एक सुनीत आहे, व शेलीची एक दीर्घ कविता आहे. पण विषय दोन्ही कवितांत एकच असला तरी वृत्त, कल्पनाविलास, पद्धति या सर्व दृष्टींनी यांपैकी प्रत्येक कवितेंत कवीच्या व्यक्तित्वाचा उत्कृष्ट ठसा पडलेला आहे. पण **अरुण** या कवितेच्या बाब-

तींत असें कांहीच झालेलें नाही. वृत्त व कल्पनाविलास या दोन्ही बाबतींत गडकऱ्यांनी ' बालकवीं 'चें केवळ अंधानुकरण केलें आहे; डोळ्यांत भरेल अशी एकहि नवीन कल्पना त्यांनी मांडली नाही, स्वतःच्या कल्पकतेचें महत्त्वाचें कोणतेंच वैशिष्टय त्यानी दाखविले नाही. किंबहुना, कांही कल्पना तर अगदीच सामान्य आहेत; आणि काहींत कसलीहि काव्यात्मता नसून निवळ विक्षिप्तपणा मात्र आहे. 'बालकवी'नी आपल्या विशिष्ट पद्धतीने सर्व काव्यमय कल्पनाचा भरपूर उपयोग करून घेतल्यानतर दुसऱ्या कवी-साठी काय उरणार? मग एक तर 'बालकवीं'च्याच कल्पनाची नीरस पुनरुक्ति होणार किंवा,

दिनरजनीच्या फटीतून या फार दूर ओड
दिसते की हे कालगर्भिच्या स्वर्गाचे तोंड !
हा रजनीच्या उदरीं दिसतो गर्भचि दिवसाचा,
की, काळाचा बाळ नवा हा नव्याच नवसाचा......

असल्या विचित्र कल्पनाचा तरी प्रादुर्भाव होणार ! नाही म्हणावयास या कवितेच्या शेवटीं शेवटीं खुद्द गडकऱ्यांचें असे एक खास वैशिष्टय प्रकट झालें आहे.

अरुण–रसाने याच रगवा मनिंचीं परि चित्रे . ..
या रगाने रंगवितों मी माझ्या हृदयाला,
पडद्यापडद्यावरी काढिले चित्राचित्राला !
एका पडद्यावरि परि रंगे प्रेमचित्र एक,
हृदयाच्या हृदयातिल माझ्या तोच शिलालेख !
त्या चित्राचा, त्या पडद्याचा, मम गाना धीर !
त्या चित्रातिल देवीचा मी विकला शाहीर......
तिच्या गालिंचा अरुण सारखा, लज्जे वाहूं दे !
' गोविंदाग्रज ' कविच्या ' अरुणा ' त्यातच राहू दे !

' बालकवीं 'च्या कवितेच्या पद्धतीवर अरुण याच नांवाची आणखी एक कविता लिहिण्याची गडकऱ्यांना केव्हा तरी लहर आली. या कवितेचा लेखनकाल मला उपलब्ध झाला नाही. अरुण ( दुसरा ) या कवितेंत

भीषण व भयानक कल्पनांचा अक्षरशः सडा पडलेला आहे. या भीषण कल्पना निर्माण करणाऱ्या गडकऱ्यांच्या मनांतील अगदी आंतल्या कप्प्यांत खोल दडून बसलेल्या विचारांचें विश्लेषण पुढे एका ठिकाणीं ('वाटे स्मशान शांतिस्थान' या आठव्या प्रकरणांत) पुष्कळच विस्ताराने केलें असल्यामुळे येथे या कवितेचा नुसता उल्लेख करून ठेवीत आहें.

---

# ७. अमर्याद इच्छा करणारें निराश मन

"...The vague and extravagant dreams which seem beyond human life. ." —*Monna Vanna*

" अमर्याद इच्छा करणाऱ्या निराश मनाला मर्यादित सुखप्राप्तीपेक्षा सर्वस्वाच्या सत्यानाशानेच अधिक समाधान वाटतें " !—पुण्यप्रभाव, अं. १, प्र. १

पुण्यप्रभावांतील ईश्वराच्या या उद्‌गारात स्वतः गडकऱ्याच्या मनाचें प्रातिबिंब अगदी स्पष्ट उमटलें आहे. वस्तुस्थितीकडे पूर्ण डोळेझाक करून अमर्याद वेड्या आशा उराशीं कवटाळून बसणे हा गडकऱ्यांचा मनोधर्म होता. जयंताप्रमाणेच गडकऱ्यांचें मनहि लहानपणापासून 'कल्पनेच्या काव्यानंदावर' तरंगत होतें. अमुक एका विशिष्ट बाबतींतच ही अमर्याद आशा प्रबळ होती असे नसून जीवितातील सर्वच स्पृहणीय गोष्टींची अभिलाषा तिने बाळगली होती. ज्याची अभिलाषा आपल्या मनाने धरलेली आहे तें सत्यसृष्टींत आपल्या आटोक्यांत येण्याची थोडी तरी शक्यता आहे कीं नाही याचा थोडा सुद्धा विचार करणे गडकऱ्याची मनोवृत्ति प्राप्त झालेल्या लोकांना जमत नाही. आपली आशा वेडी आहे हें अशा लोकांना कळत नाही, असें नाही. निराशेचे दारुण आघात सहन करण्याचें सामर्थ्य आपल्या मनांत नाही हेंहि त्यांना माहीत असतें. तथापि त्या आशेची गुंगीच अशी कांही विलक्षण असते की तिच्या बादशाही कैफांतून बाहेर पडावें अशी इच्छाच त्यांना होत नाही. भोवतालचें जग पराकाष्ठेचें फसवें

आहे, अपूर्ण आहे, जिकडे तिकडे मोरपिसावरचे डोळेच दिसत आहेत इत्यादि गोष्टींचा साक्षात्कार झाल्यावर तर वेडी आशा त्यांचा सतत पाठपुरावा करते, आणि या आशेच्या कुंचल्याने मदिर स्वप्नदृश्यें रंगविण्यांत त्यांच्या खचलेल्या मनाला एक विचित्र समाधान लाभू लागतें. भावनाप्रधान, संवेदनशील मनाची ही दुर्दैवी कहाणी आहे. —सतत अभिलाषा आणि तिचें साफल्य करून घेण्यासारखी परिस्थिति नसल्यामुळे निराशा— हा या कहाणीचा अर्थ आहे.

रचणे काळखिावरती
मग वाऱ्याच्या इमारती !

कलगीचें गाणें या कवितेंतील या दोन ओळींत गडकऱ्यांच्या भावजीवनाच्या दुर्दैवी कहाणीचें स्वरूप सामावलेलें दिसून येईल.

प्राप्त परिस्थितींत कधीहि संतोष न मानता कसल्या तरी असमाधानांत नेहमी गुरफटून राहणे हा बहुतेक साऱ्या रोमॅंटिक कवींचा कधीहि नष्ट न होणारा मनोधर्म असतो. गडकरी याला अपवाद कसे असणार ? जें आपलें आहे तें नकोसें होणें, आणि जे आपले नाही, किंवा होऊं शकणार नाही तें सतत हवेसें वाटणे असा स्वभाव ज्या माणसाचा असतो त्याच्या चित्ताला नेहमीच कसली तरी अनिर्वचनीय, गूढ हुरहूर लागून राहिलेली असते. व्यवहार आणि स्वप्नसृष्टि याच्यामधील हा दारुण कलह आहे. आणि या कलहात कटु व्यवहार नेहमीच कल्पनासृष्टीवर मात करीत असतो. शेवटीं स्वप्नसृष्टि विरून गेल्यानंतर व्यवहाराच्या भीषणतेशीं समोरासमोर सामना देण्याचा प्रसंग येतो. आणि दुर्बळ, भावनावश, व कल्पनेच्या काव्यानंदांत तल्लीन झालेल्या हळव्या मनाचा त्यात पराभव होतो. भावनाच्या या आंदोलनाचे उत्कृष्ट वर्णन हुरहूर या गडकऱ्याच्या सुनीतात आढळेल.

काळोखामधुनी पल्याड न दिसे या रात्रिचा शेवट,
आणी मोहकता तिला तरि कसा दुष्प्राप्य तारागण ?
अज्ञेयातुनि आरपार न दिसे दिक्काल याचा तट,
चित्ताच्या नयनीं दुरून खुपती का दिव्य आशाकण ?
मी श्वासास धनी, अखंड फिरतो वारा भरारा जरी,

आर्थी बारिक बाडगें तरि तया हीं कुंपणें घातली !
या वाऱ्यावर बांधणार कधि मी उंची मनोरे परी ?
केव्हा नागरणार ताल, उघडी ही माळरानांतली ?
जे दृष्टीस दिसे न, तेंच पटुनी वाटेल चित्ता कधी ?
बुद्धीला जिरवीन भावजलिं कां ?—आशा न मातें दुजी !
तेजाला हुडकीन का लपलिया या अंधकारामधीं ?
केव्हा मस्तक लोपुनी हृदयिं या होईल उंची खुजी ?
माझें होईल सर्व हें कधि, मला जे आजला पारखें
माझें चित्रच नाचवीन नयनी माझ्या कधीं सारखें ?

या एका सुनीतात गडकऱ्यांच्या मनोवृत्तीचें मर्म ज्यायोगें उकलूं शकेल अशा कितीतरी खुणेच्या गोष्टी आहेत. सारें जग काळोखानें भरलेलें आहे, अनेक गोष्टी अज्ञेय आहेत, आशा मात्र डोळ्यात सदैव तरंगत असते, मूळचें सामर्थ्य अगदी अल्प आणि तशात त्याला अनेक मर्यादा पडलेल्या आहेत, —अशा या स्थितींत वाऱ्यावर ' उंची मनोरे ' बांधण्याची लालसा कधी पुरी होणार ? जें दृष्टीला दिसू शकत नाही, ज्याची प्रत्यक्षात प्रतीति येत नाही ते मनाला कधी पटणार व रुचणार ? भावना बुद्धीवर मात करूं शकतील का ? काळोखात दडलेलें तेज हुडकून काढतां येईल का ? जे जें आज दुष्प्राप्य आहे—आकाशांतील रमणीय तारकांप्रमाणें दुष्प्राप्य आहे — ते ते सारें कधी लाभणार ? — अमर्याद इच्छा करून थकलेल्या निराश जिवाच्या हुरहुरीचे व तळमळीचे यापेक्षा अधिक परिणामकारक वर्णन कोण करूं शकणार ? त्याला गडकरीच पाहिजेत ! गडकऱ्याच्या मनांत वर वर्णिलेल्या भावनेने कायमचे घर करून ठेवले होते अनेक गीतांमधून पुन्हा पुन्हा त्याची ही वेदना स्पष्टपणे आविष्कृत झालेली आहे. जे आपल्याजवळ नाही तें मिळवण्याची त्याची धडपड **हाय हाय** या शीर्षकाच्या कवितेतील अप्रकाशित ओळींत पुढीलप्रमाणे प्रकट झाली आहे. **हुरहूर** या कवितेंत पर्यायाने सांगितलेल्या गोष्टी येथे खूपच स्पष्ट झालेल्या दिसतील.

इथें टाकुनी मला नजरही चहूकडे फिरते,
दिसतें तितकें मला मिळेना, नको तेंच मिळतें !
निःश्वासाचें जीवन सारें, आशेची दृष्टि,

हाय हाय, ही येत कपाळीं मनातली सृष्टि !

*  •  *  *

की वाऱ्याच्या दोरासंगें वरतीं उडवाया,
जीव मनाचा पतंग उडवी फिरुनि ओढाया !
तोड तोड त्या दोऱ्या देवा, मन तरि जाऊ दे,
जीव मरू दे, देह जळू दे, काही होऊ दे !
एका अंशाची तरि आशा पूर्ण करायास,
उरल्या सुरल्या माझ्या देवा, करि सत्यानाश !

या ओळी वाचल्याबरोबर प्रस्तुत प्रकरणाच्या सुरवातीला पुण्यप्रभावांतील जे वाक्य उद्धृत केले आहे त्याची आठवण होणे अपरिहार्य आहे.

"अमर्याद इच्छा करणाऱ्या निराश मनाला मर्यादित सुखप्राप्ती- पेक्षा सर्वस्वाच्या सत्यानाशानेंच अधिक समाधान वाटतें !"

ही उद्वेगाची भावना प्रबळ होण्याचे कारण एकच आहे. वस्तु-स्थिति किंवा सत्यसृष्टि ज्यायोगे स्पृहणीय वाटावी असे आपल्या जीवनात कांहीहि कवीला दिसत नाही हे ते कारण होय. ज्याचे जीवन स्पृहणीय गोष्टींच्या समृद्धीने परिपूर्ण असते, ज्याला इच्छा-पूर्तीचे समाधान लाभलेले असते, साफल्याने ज्याच्या जीवनावर वरदहस्त ठेवलेला असतो असा मनुष्य याप्रकारचे वैतागाचे व उद्वेगाचे उद्गार काढणें शक्य नाही. मनुष्य पराकाष्ठेचा सुखी असतांनाहि, काहीहि दृश्य कारण नसता त्याच्या मनाला विचित्र हुरहूर लागते, तो पर्युत्सुक होतो हें खरे आहे. तथापि पर्युत्सुकत्वाची ही भावना स्थिर नसते, ती क्षणिक असते. शिवाय सुखी जीवाला वाटणारी ही उत्कंठा व गडकऱ्यांना वाटणारा जीवनाविषयींचा उद्वेग या दोहोंत महदतर आहे. आपल्या भोवताली दिस-णारें खरें जग कायमचे नष्ट होऊन स्वप्नसृष्टीने त्याची जागा घेतली तर फार बरे होईल असें गडकरी म्हणत आहेत.

मिटल्या डोळ्या दिसे तेच दे, दिसणारे घेई.

जें आपलें आहे त्यांत समाधान न मानणे व जे अलभ्य आहे तें मिळविण्याची धडपड करीत राहणें या वृत्तीमुळे अंतीं जी दारुण निराशा

होते ती टाळण्याचा एकच उपाय, म्हणजे स्वप्नसृष्टींत विहार करण्याची सवय जडवून न घेतां जें आपल्या आटोक्यांत आहे, जें आपलें आहे, त्यांत समाधान मानून राहणें. हा उपाय मोठा सोपा वाटेल यांत शंका नाही. पण असमाधानी वृत्तींत तन्मय होऊन त्यांत सुख मानण्याची प्रवृत्ति बळावली म्हणजे हा सोपा वाटण्यासारखा उपायहि निरुपयोगी ठरतो. शिवाय रोग एकदा बळावल्यावर औषधाचा उपयोग तरी कोणता ? ही गोष्ट गडकऱ्यांच्या मनालाहि जाणवत आहे याचा पुरावा प्रेमसंन्यासांत आहे. शेवटच्या अंकाचा पडदा पडण्यापूर्वीं जयंत म्हणतो—

"जें आहे तें आपलें आणि नाहीं तें नको हेंच तत्त्व त्यांच्या मनात लहानपणींच बिंबवून द्या."

पण या जाणिवेने काहीहि साधण्यासारखे नाही हें लक्षात ठेवावयास पाहिजे. एखादी गोष्ट अशक्य आहे हें चांगलें माहीत असतांहि तिच्यामागे वेड्यासारखें धावत सुटणें हा मनाचा एकदा धर्म बनल्यानंतर त्याला आवर घालण्याचा जों जो अधिक प्रयत्न करावा तो तों मनाच्या साऱ्या सामर्थ्याचा ह्रास होऊं लागतो, आणि वेडाची लहर कमी होण्याऐवजीं वाढतच जाते. दुष्प्राप्य गोष्ट प्राप्त करून घेण्याचें सामर्थ्य नसतांना तिची अनिवार लालसा बळावत जाणे यासारखे दुर्दैव दुसरें नाही !

अशक्य असते, अतर्क्य असते, अनत जें असते,
त्याच्या त्याच्या पलीकडेही ती आशा जाते !

* * *

शक्ति मला जी धाडिशि दुरुनी ती विरुनी जाते,
माझ्या जवळीं येता येता इच्छामय होते !
ती इच्छा मग मनीं सारखी लावी हुरहूर,
त्या शक्तीचा जळत्या हृदयीं कीं होइ धूर !

आपली असहायता, असमर्थता, दौर्बल्य आणि आशांचा व इच्छांचा अमर्यादपणा यांतील विलक्षण, दुस्तर विरोध पुढील आर्त प्रश्नात स्पष्ट झाला आहे.

शक्तिहीनता दिली का अशी, असल्या इच्छा का ?

ज्या दौर्बल्याचा आविष्कार गडकऱ्यांच्या या प्रश्नांत झालेला आहे तेंच दौर्बल्य शेलीच्या ठिकाणींहि प्रकर्षाला पोचलेलें होतें. आपल्या अमर्याद इच्छा व अतृप्त आशापूर्ति यांच्यामधील आत्यंतिक विरोधाची तीव्र जाणीव होऊन शेलीने आपलें हृदय एपिसायूकिडियॉन या कवितेंत मोकळें केलें आहे.

—Woe is me :
The winge'd words on which my soul would pierce
Into the height of Love's rare Universe,
Are chains of lead around its flight of fire...
I pant, I sink, I tremble, I expire!

असें हें दुबळें, भावनाप्रधान, हळुवार कविमन डोळ्यांत सारे प्राण एकवटून आशेने निर्मिलेली रमणीय स्वप्नसृष्टि खरी कधी होणार याची वाट पाहत असते. पुढे निराशा व्हावयाची असेल तर होवो बापडी ! पण या क्षणाला तरी वेड्या आशेची धुंदी काही निराळीच असते हें खरें असेल तर त्या आशेने होणारी कालवाकालव का अनुभवूं नये ? ही कालवाकालव असली तरी ती एक सुखद भावना आहे हेंहि तितकेंच खरें. " इच्छा प्रयत्नानीं धडपडत असते, आशा डोळ्यात एकवटून पहात असते " या पुण्यप्रभावांतील कालिंदीच्या उद्गारातहि हाच आशय भरलेला आहे. आशेची ही भित्री धडपड बंद पडली आणि ईप्सिताचा लाभ झाला तर होणारे सुख तितकेसे स्पृहणीय नाही, त्यापेक्षा आशेची अधीर उत्कंठाच शतपटींनी अधिक कमनीय होती असेहि एखाद्याला वाटण्याचा संभव आहे. गडकऱ्यांच्या चित्तात खोल कोठेतरी ही भावना दडलेली असावी असे वाटेत.[१] ज्याची इच्छा सतत करीत राहावे, तें प्रत्यक्षात प्राप्त झाल्यावर आशेच्या धडधडत्या उत्कंठेपासून जे सुख प्राप्त होतें तें विरून जाण्याचीच भीति नाही काय ? **इच्छा, उपभोग व विषय** या कवितेंत गडकऱ्याच्या मनातील विचाराचें हे काहूर दिसून येतें.

अखंड गायन ऐकायाते पंजरात धरिला पक्षी !
उडती लकेर झरता, जीवा ! नादचित्र केवळ लक्षी ॥

* * *

निर्झरमार्गी श्रीजलवन्ती झुळझुळ गाणें गात झुके।
धरण बाधितां थाबतसे जल परंतु गाणें होत मुकें ॥

इच्छा आणि वस्तुलाभ याच्यामध्ये वस्तुलाभाच्या समाधानापेक्षा इच्छेची धुंदीच पतकरण्याची लालसा बाळगणारे मन अशक्य, अतर्क्य गोष्टींच्या मागे रानोमाळ धावण्यांतच गर्क झाले तर त्यांत आश्चर्य नाही. येथे विचाराला थारा नसून परिणामाची कसलीहि चिंता नाही. लॉर्ड बायरन्चा मॅन्फ्रेड म्हणतो—

But I have found our thoughts take wildest flight
Even at the moment when they should array
Themselves in pensive order.

हें सॉर खरे असले तरी आपल्या गोड आशा साकार केव्हा होतील त्याना मूर्त स्वरूप कधी प्राप्त होईल, त्या सत्यसृष्टींत केव्हा अवतीर्ण होतील या उत्कंठेने गडकऱ्याचे मन नेहमीच भारून टाकलेले आहे हें विसरतां यावयाचे नाही. कधीं? या नावाचे गडकऱ्याचें एक अत्यंत मोहक व उन्मादक गीत आहे. आशेची भित्री धडधड अतिशय लोभसवाण्या रीतीने त्यात अविष्कृत झालेली आहे. नेहमी डोळ्यापुढून गोड गोड दृश्ये तरळून जातात, पण त्याचा भास काचनमृगाप्रमाणे फसवाच ठरतो. हे मदिर आभास कधी मूर्त होणार? अत्यत सुदर स्वप्नाची भुरळ मनावर पडते—पण हीं स्वप्ने मायेच्या विरळ सृष्टींतून सत्यसृष्टीत डोकावणार नाहीत का? इत्यादि अनेक प्रश्नानी गडकऱ्याचे मन बेचैन झाले आहे. आणि त्याच्या अधीर उत्कंठेने गीनाचे स्वरूप धारण केले आहे.

चित्रपटावरि रम्याकृतिच्या सीमारेषा परोपरी,
रंग कधी वठतील परी ?
कानाला आनद देति हे झुळझुळ गाउनि गोड झरे,
अर्थ कधी कळणार बरें ?
अधुक अंधुक गोड भावना डोकावति कविमनाकडे,
शब्द कधी होतील खडे ?
सतेज वचने देई तारा, परी लकाके नभामधीं,
खालीं येइल परी कधीं ? .....

प्रतिरात्रीं हीं स्वप्नें दाविति इच्छाचित्रे जीवाची,
सृष्टि कधीं होइल त्याची ?
अंधनयनिं ही बघते आशा विश्वचि हे रम्याकार,
जगी कधी ते दिसणार ?

आणि यापुढे प्रणयसाफल्याच्या उन्मादक आशेतील धुदपणा प्रकट झाला आहे; आणि त्यायोगें सर्वच गीताला काही विलक्षण शोभा प्राप्त झाली आहे.

—आणि वल्लभे ! दिलीस वचनें, गोड अहा तीं किती तरी !
खरी कधी होणार परी ?

भावनावश मनाच्या वेडया आशेचें, अलभ्य गोष्टींचा लाभ करून घेण्याच्या हव्यासाचें, भ्रमिष्ट अभिलाषेचें उत्कृष्ट चित्र गडकऱ्यानी **वेडा** या कवितेत रंगविलें आहे. ही कविता १९१२ च्या ऑगस्टच्या **मनोरंजनांत** प्रसिद्ध झाली आहे. म्हणजे **प्रेमसंन्यासानंतर** एका वर्षाच्या आंतच ती गडकऱ्यांनी लिहिलेली आहे. “ कुणाला कशाचें वेड लागेल आणि त्याचा शेवट कशात होईल, हें कोणीं सागावे ? ” अशी स्वतः गडकऱ्यानी या कवितेवर टीप दिली आहे. कोणी एक वेडा भ्रमिष्टपणाच्या अनावर लहरींत भरलेलें गाव सोडून बाहेर पळाला आणि एका माळावर जाऊन उभा राहिला. आकाशात सध्यासमयींच्या आरक्त छटाची बरसात होत होती. पण त्या वेडयाला तिचें काय होय ? त्याला वेड कशाने लागलें तें देवाला सुद्धा सांगता येणार नाही. पण त्या वेडयाच्याहि मनात कसल्या तरी भावना या असल्याच पाहिजेत.

होतें का मग भावशून्य नुसते ओसाड त्याचे मन ?
छे ! मैदान उजाडते, तरि तिथे हा वायु आहेच ना ?
वारें काहि तरी तसें घुमवितें ओसाड वेड्या मना !

तो वेडा त्या माळावर उभा होता आणि भकास डोळ्यांनी कुठे तरी पाहत होता. काय त्याचें नशीब होतें कोणास ठाऊक ! पश्चिम क्षितिजावर एका तारकेचें आगमन झालें. ती दिसल्याबरोबर तो वेडा भेसुरपणें हसला आणि गुणगुणूं लागला. ती तारा पाहिल्याबरोबर त्याला कसली ओळख पटली

तें त्यालाच माहीत! त्याच्या भकास चेहऱ्यावर अस्फुट भाव दिसूं लागले, तिच्याकडे तो टक लावून अगदी एकाग्रतेने पाहूं लागला—ही आत्यंतिक एकाग्रता प्रीति किंवा तसलेंच एखादें वेड यांखेरीज सर्वथा अशक्य आहे.

. . एकाग्रता ती खरी
आशा, प्रीति तसेंच वेड असले, यांनाच ती साधते!

आणि ती तारका एक क्षणभर जरी ढगाआड झाली तरी लगेच त्या वेड्याच्या चेहऱ्यावर मलूलपणा येई. वेड्यालाहि नैराश्य, विषणता इत्यादि विकार असतात तर! आणि आश्चर्य असें की त्या तारकेची प्राप्ति करून घेण्याचा ध्यास त्याला लागला. कैक वर्षे तो जमीन तुडवीत होता. त्या तारकेवर डोळे स्थिर करून भटकणें इतकेंच त्याचें ध्येय झालें. पण त्याला ती तारका कशी लाभणार? अखेर केव्हा तरी तो वेडा कायमचा अदृश्य झाला—पण ती तारा मात्र अजून दिसत आहे. हा वेडा गेला तरी कुठे? कोणाला हा कधी आढळला का? त्या वेड्याचें वेड आपल्याला लाभलें तर किती बरें होईल असेंहि कवीला वाटतें.

वेडा सांपडता, कथा मज—पुढे झालें तयाचे कसें?
त्याचे वेड तरी कुणास मिळता द्या तें मला आणुनी,
माझ्या जी मनि चांदणी चमकते, जाईन तीमागुनी!

तो वेडा त्या चांदणीच्या मागे रानोमाळ भटकत होता. त्या वेडामुळेच त्याच्या मनाची एकाग्रता झालेली होती; तारका ही अत्यंत दुर्लभ गोष्ट आहे या सत्याची जाणीव होणेंच अशक्य असल्यामुळे तिच्या शोधासाठी भटकण्यांत त्याला कांही चमत्कारिक वाटलें नाही. आपल्याहि मनांत एक चांदणी प्रकाशत असून तिच्याशीं तन्मयता पावण्यासाठी त्या वेड्याच्या एकाग्रतेची आपल्याला जरूर आहे असें गडकरी म्हणत आहेत. याचा आशय अगदी स्पष्ट आहे. दुष्प्राप्य गोष्टीची वेडी आशा बाळगणें, तिच्या प्राप्तीसाठी सदैव तळमळणें इत्यादि ज्या गोष्टी गडकऱ्यांच्या मनोवृत्तींत अगदी मुरलेल्या होत्या त्यांचें आविष्करण वेडा या प्रतीकाच्या रूपाने त्यांनी केलें आहे. आपल्या मनांत थैमान घालणाऱ्या अमर्याद आशांचें

काढून त्यांनी रूपकाच्या (allegory) द्वारें व्यक्त केलें आहे यांत कांहीच संदेह नाही. अनेक ठिकाणीं गडकऱ्यांनी अमर्याद आशेचा व वेडया अभिलाषेचा खेळ अगदी स्पष्ट शब्दांत वर्णिला आहे. पण वाच्यार्थाचा उपयोग कवि नेहमीच करील असें नाही. कांही वेळां आपल्या मनातील आशय रूपकाची मदत घेऊन त्याला अधिक परिणामकारक रीतीने व्यक्त करतां येतो. आणि खरें म्हणजे भावनावश कवींचें सारें आयुष्य एखाद्या रूपकासारखेंच नसतें काय? गडकऱ्यांच्या व्यक्तित्वाला अनेक पैलू होते, तें पराकाष्ठेचें गुंतागुंतीचें होतें. अशा स्थितींत आपल्या मनांतील भावनांचा उद्रेक एखाद्या रूपकाच्या साहाय्याने आविष्कृत करण्याचा मोह त्यांना झाला तर त्यात कांही नवल नाही. असलेंच एक रूपक **प्रेम आणि मरण** या कवितेत गडकऱ्यानी वापरलें आहे. प्रस्तुत **वेडा** या कवितेंतील तारका मिळवण्याची भलतीच आशा बाळगणारा वेडा म्हणजे आपल्या सामर्थ्याच्या पलीकडे असलेली दुर्लभ गोष्ट प्राप्त व्हावी या भलत्याच इच्छेने तळमळणारे गडकरीच होत. गडकऱ्यांचें सारें भावजीवन याच अमर्याद इच्छेने व्यापलेलें होतें; आणि विफल आकाक्षांमुळे उत्पन्न होणारें आत्यंतिक नैराश्य हा त्या जीवनाचा अभिशाप होता. या दृष्टीने पाहिलें म्हणजे वेडयाचें रूपक वापरण्याचें गडकऱ्यांच्या कां मनात आलें याचा उलगडा होईल.

असलेंच रूपक याच भावनांच्या आविष्करणासाठी गडकऱ्यांनी आणखी एकदा वापरलें आहे, — आणि अधिक परिणामकारक रीतीने वापरलें आहे. **ओसाड आडांतील एकच फूल** ही ती रूपकात्मक कविता होय. या कवितेंतील रूपक सर्व दृष्टींनी परिपूर्ण असून गडकऱ्यांच्या भावनांचें यथार्थपणें विश्लेषण करणारें तें एक उत्कृष्ट भाष्य आहे असें मला वाटतें. ही कविता १९१४ नोव्हेंबरच्या **मनोरंजनांत** प्रसिद्ध झाली आहे. म्हणजे **वेडा** या कवितेनंतर सुमारें दोन वर्षांनी गडकऱ्यांना आपल्या अमर्याद इच्छांचें चित्रण करण्यासाठी पुन्हा रूपकाचा आश्रय घ्यावा असें वाटलें.

एक जुनाट, पडका, ओसाड आड कुठे तरी होता. लोक म्हणत, त्यांत भुताटकी आहे. कोणीहि त्या आडाकडे ढुंकून सुद्धा पाहत नसे. असल्या या

ओसाड,भकास, क्षुद्र आडांत एक फूल केव्हातरी उमललें. त्या आडाच्या तोंडावर वेलींच्या पानांची गर्दी झालेली होती; आणि खाली खोल खोल असलेल्या पाण्यावर त्यांची सावली पडलेली होती.

आडाच्या असल्या भकास उदरीं होते तसे फूल तें,
प्रेमाचा मृत अश्रु जेवि गिळिला जीवन्मृताच्या मनी

बाहेरचा वारा त्या फुलाला कधीच लागला नाही; त्या क्षुद्र, काळोखाने भरलेल्या जगात कुचबणें हेच त्याचें नशीब त्याचे तोंड नेहमी पाण्याकडे वळलेलें असे. एकदा चुकून एक सूर्यकिरण त्या आडात घुसला आणि जें होऊं नये तें झालें—त्या फुलाला आपले प्रतिबिंब पाण्यात दिसलें.

पाण्यातलें तें चित्र अत्यंत मनोहर होतें. त्याची भुरळ त्या फुलाला पडली. डोळ्यांत आशा एकवटून एकाग्रतेने तें त्या चित्राकडे—आपल्याच प्रतिबिंबाकडे—एकसारखे पाहूं लागले. तेंच त्याचे जीवितसर्वस्व बनले, तीच एक आशा त्याच्या मनात आंदोळूं लागली.

त्या चित्राप्रति भावबद्धनयने आशादृशा पाहणें—
हा नित्यक्रम भाबड्या सरळ त्या माझ्या फुलाचा असे,
त्याला सर्वहि वाटणे, विरुनिया त्याच्यामधे राहणे,
आशा एकच एवढी मनिं सदा वेड्या फुलाच्या वसे

त्या फुलाचा वास मनोहर होता यांत शंकाच नाही. पण हा जो नवीनच भाव त्याच्या ठायीं जागृत झाला होता त्याचा सुगंध कांही विशेषच होता. त्याची वृत्ति प्रेमाने वेडीपिशी झाली. त्या पाण्यांतल्या फुलाकडे पाहून तें हसूं लागले, आणि त्याच्या हास्याला तत्क्षणीं प्रत्युत्तर मिळूं लागलें—आणि त्याचें मन प्रेमसाफल्याच्या कल्पनेंत रंगूं लागलें. तें तरी काय करणार बिचारें ?

'माझा भाव तयाप्रती कळतसे' मानीत हें बापडे.
जोडीचा महिमा असा चहुकडे, धिक् सर्व जोडीविणे !
लाभे जोड तरी कुणास न रुचे शून्यांतलेंही जिणे ?

प्रीतीची पाहिली लहर मनांत तरळून गेल्याबरोबर त्याची कशी बेभान अवस्था होते आणि त्या प्रीतीचें साफल्य करून घेण्यासाठी त्याची कशी

तीव्र धडपड सुरू होते याचे हृद्य वर्णन यापुढील ओळींत आढळेल. वस्तुतः तें फूल त्या आडांत एकटेंच होतें. दुसरें फूलच तेथे नव्हतें. अशा स्थितींत त्याच्या भावनांना प्रत्युत्तर मिळण्याचा प्रश्नच नव्हता. आपल्या प्रतिबिंबावर तें फूल प्रेम करीत होते. नॅर्सिसस् तळ्याच्या पाण्यांत पडलेल्या आपल्या प्रतिबिंबाशीं तन्मय झाला आणि त्यावर अमर्याद प्रेमाची वृष्टि करूं लागला. या कथेंत घडलेल्या वृत्तांताप्रमाणेच हें सारें झालें आहे. आपल्या मनातील साऱ्या प्रेमभावना पाण्यातील फुलाच्या ठायींहि आहेत अशी गोड कल्पना त्या फुलाने करून घेतली होती. वस्तुस्थितींत जिच्याकडून प्रेम लाभेल अशी व्यक्ति समोर नसली आणि प्रेम करण्याची लालसा अनावर झाली म्हणजे आपल्या कल्पनेने मनुष्य अशी एखादी व्यक्ति निर्माण करतो व त्या स्वप्नसृष्टींतील व्यक्तीभोवती त्याच्या साऱ्या भावना घोटाळत राहतात. हें प्रत्यक्षातील प्रेमसाफल्य नाही याची जाणीव मधून मधून चित्ताला टोचणी देत असली तरी तिच्या व्यथेकडे बळेच दुर्लक्ष करून आपल्या त्या काल्पनिक प्रेमसाफल्याच्या तंद्रींत मनुष्य गुग होऊन राहतो. किंवा असेहि होतें की, जिच्यावर तो आपल्या प्रेमाची वृष्टि करीत असतो त्या स्त्रीला या प्रेमाची काहीच कल्पना नसली तर तिने प्रतिशब्द देण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. ‘ प्रतिशब्द जिवाला अजुनि न दिधला कोणीं ’ अशी आर्त किंकाळी फोडणाऱ्या या जीवापुढे एकच मार्ग उरतो. आणि तो म्हणजे, आपल्या चित्तात प्रिय व्यक्तीविषयीं ज्या कोमल भावना जागृत झाल्या आहेत त्याच प्रकारच्या भावना त्या व्यक्तीच्या चित्तातहि जागृत झाल्या असल्या पाहिजेत अशी गोड कल्पना करून घेणें, आणि त्या कल्पनेच्या उन्मादक स्वप्नसृष्टींतच धुंद होऊन सत्यसृष्टींत न मिळालेलें समाधान मिळविणे. आणि हाच मार्ग त्या फुलाने पतकरलेला आहे. याला मानसशास्त्राच्या परिभाषेंत ‘ प्रॉजेक्शन् ’ म्हणतात. प्रॉजेक्शन् म्हणजे आपल्या मनांतिल भावनाचा दुसऱ्यावर अध्यारोप करणें, आपल्या कल्पनासृष्टींतील चित्रें सत्यसृष्टींत अवतीर्ण झालीं आहेत असा आभास निर्माण करून घेणें व त्यांत समाधान मानणें. या प्रॉजेक्शन्‌चें स्वरूप

गडकऱ्यांच्या पुढील ओळींत उत्कृष्टपणे दिसेल.

खालीं तोंड करून चंचल जलीं पाहून वेड्यापरी
भावाचे अपुल्याच रंग वठवी त्या प्रेमचित्रापरी;
वेडी यापरि बांधुनी उगिच ते जीवास आशागुणा

* * *

भावाचे अपुल्याच रंग बघणे वाटेल तेथें मना

* * *

जो तो या जगतावरी पसरतो छाया मनाची सदा

ओसाड आडातील तें फूल आपल्या मनाच्या भावना आपल्याच प्रतिबिंबित रूपात चित्रित झालेल्या पाहत होते, आणि समाधान पावत होतें. प्रत्येक माणसाचे असेच असते असें गडकऱ्यांना सुचवावयाचे आहे. त्या फुलाची आशा अमर्याद असेल, अवास्तव असेल, वेडी असेल—पण त्या वेडया आशेतहि काही तरी रहस्य लपलेले असू शकेल. हे रहस्य जर जाणून घ्यावयाचे असेल तर पाहणाराचे मनहि फुलाप्रमाणेच अगदी कोमल झाले पाहिजे. रूक्ष, चिकित्सक, तार्किक मनाला तें रहस्य कधीच उमजावयाचे नाही. कोमल भावनानाच फुलाच्या संवेदनांची जाणीव होईल. यासाठी पाहणाराचे डोळेहि फुलाचेच असले पाहिजेत.

त्या आशेत रहस्य काय लपले जाणावयाला जरा—
वाऱ्याने करपून जातिल अशीं व्हावीं फुलाचीं मनें,[२]
चित्रे चंचल जीं अदृश्य उघड्या डोळ्यास भावाविणे
पाहायास तयास नीट तुमचे डोळे फुलाचे करा !

आपल्या भावनांचा पसारा मांडून त्यांतच गुरफटून राहणाऱ्या त्या फुलाची आशा अधिकच भ्रमिष्ट झाली. त्याच्या भावनांचा उद्रेक अनावर झाला. आपल्या विकारांवर ताबा ठेवणें त्याला अवघड वाटूं लागलें. काय होईल तें होवो, पाण्यांतल्या त्या रमणीय फुलाचें चुंबन घ्यावें असें त्याच्या मनाने घेतलें, आणि त्याने आपलें मुख खाली वाकविलें. आयुष्यांतील आनंदाच्या परमोच्च प्रकर्षाचा हाच तो क्षण ! पण पाण्याचा त्याच्या मुखाला

स्पर्श होतांक्षणींच तें पाण्यांतील गोड प्रतिबिंब विरून गेलें आणि त्याच्या झुरणाऱ्या आशेवर एका क्षणांत पाणी पडलें !

पुढची कहाणी सांगावयासच पाहिजे का? प्रेमाच्या विफलतेचा तो आघात असह्य होता. तें फूल कोमेजलें तें कायमचेंच! पुन्हा कधीहि तें हसलें नाही कीं डुललें नाही.

त्या धक्कयासरसेच फूल मग जें कोमेजले एकदा,
नाहीं तें हसले पुन्हा! विकसले नाहीं पुन्हा ते कदा!
आशेनें दुसऱ्या दिनीं फिरुनि तो आला रवीचा कर,
गेला खिन्न मने, परी न चमके त्या प्रेतमात्रावर

पुढे गडकऱ्यानी **प्रेम आणि मरण** या नावाची जी कविता लिहिली तिच्यांतील भावनाची ही प्राथमिक अवस्था आहे. त्या फुलाचें निर्माल्य झालें, तें मेलें. तथापि त्याची किंमत कमी ठरत नाही, इतकेच नव्हे तर आपलें चित्त त्याला भुलले आहे असेंहि गडकरी म्हणतात.

ते मेले म्हणुनी उणे न उरते, मच्चित्त त्याला भुले!
मेलेल्या हृदया मदीय असलीं वाहीन मेलीं फुलें!

ओसाड आडांतील या फुलाच्या कहाणीचें केवळ निमित्त करून गडकऱ्यांनी आपल्याच भावनांच्या आंदोलनाची कहाणी सांगितलेली नाही काय? आपल्या 'हृदयाच्या अंतर्हृदयांत' हेलावणाऱ्या भावनांचें आविष्करण करण्यासाठी त्यांनी जे फुलाचें रूपक वापरले आहे तें इतकें विरळ आणि जाळिदार आहे की, त्यांच्याच भाषेत बोलावयाचें झालें तर, त्या आवरणापलीकडचा 'रंग छटान् छटा निरखून बघून घ्यावा.' या प्रकारचें रूपक करण्याचा मोह गडकऱ्यांना पुन्हा पुन्हा होतो. गडकऱ्यांचें स्वतःचें भावजीवन एखाद्या रूपकाप्रमाणें आहे, किंबहुना तें एक रूपकच आहे हें याचें कारण होय. त्यांचें व्यक्तित्व साधें, सरळ, एकजिनसी नसून तें पराकाष्ठेचें गुंतागुंतीचें, संमिश्र स्वरूपाचें (complex) आहे. आणि यामुळें त्या गुंतागुंतीच्या व्यक्तित्वांतील कांही छटा सरळ वाच्यार्थानें प्रकट न होतां, प्रतीकाच्या साहाय्यानें, अन्योक्तीच्या रूपानें, रूपकाच्या

द्वारें प्रकट होतात हें आपण लक्षांत ठेवलें पाहिजे. गडकऱ्यांना या कवितेंत ओसाड आडाचे वर्णन करण्यांत अथवा केवळ त्या फुलाचे वर्णन करण्यांत मुळीच महत्त्व वाटण्याचे कारण नाही. त्यांनी त्या फुलावर सर्व कोमल मानवी भावनाचा जो अध्यारोप केला आहे त्यावरून हे स्पष्ट होइल. तें फूल क्षणभर डोळ्याआड करा, आणि त्याच्याजागीं एखादी भावनावश, प्रेमविव्हल तरुणी अथवा एखादा भावनावश तरुण आहे अशी कल्पना करा. त्या फुलाच्या ज्या मनोव्यथा, त्याच्या मनाचे जे व्यापार व त्याच्या ज्या कृति गडकऱ्यानी काव्यमय भाषेत वर्णिल्या आहेत त्याचें ते वर्णन प्रेमसाफल्यासाठी धडपडणाऱ्या व वेडी, अमर्याद आशा करणाऱ्या एखाद्या तरुणीच्या किंवा तरुणाच्या मनोव्यापाराना व कृतींना सहज लागू पडेल. हे लक्षांत घेतलें म्हणजे 'a man's life of any worth is a continual allegory' असें जे कीट्स म्हणत असे त्यातील मर्म कळून येईल. गडकऱ्यांचें भावजीवन हेंच जेथे एक विस्तृत रूपक होतें तेथे आपल्या मनांतील आर्त भावना, उत्कठा, वेड्या आशा, अमर्याद इच्छा, हुरहूर इत्यादींचे आविष्करण त्यानी वेडा, ओसाड आडातील एकच फूल, व प्रेम आणि मरण यासारख्या रूपकांच्या द्वारे केले असले तर त्यात काही नवल नाही.

ओसाड आडांतील त्या फुलाचे एक रमणीय स्वप्न होते. गडकऱ्याचेंहि एक स्वप्न होते. त्या फुलाचें स्वप्न साकार होऊं शकले नाही. गडकऱ्याचेहि स्वप्न कधीच सत्यसृष्टींत अवतीर्ण व्हावयाचें नव्हतें. वेडी आशा करणारें ते ओसाड आडांतील एकाकी फूल म्हणजे रूक्ष व फसव्या जगांत एकलकोंडेपणाने वावरणारे, तोंडावर उसनें हास्य खेळवणारे, व अमर्याद आशा करणारे स्वतः गडकरीच होत! फुलाच्या रूपाने आपल्या भावना आविष्कृत करणाऱ्या गडकऱ्यांचें या बाबतींत शेलीशीं फार साम्य आहे. गडकऱ्यांनी ओसाड आडांतील फुलाची करुण कहाणी वर्णिली आहे तशीच एक रूपकात्मक कहाणी शेलीनेहि वर्णिली आहे. *Sensitive Plant* हें त्याच्या करुण कहाणीचें नांव. एका नाजूक लतिकेची ही कहाणी आहे. ही नाजूक लतिका म्हणजे स्वतः शेलीची आत्यंतिक भावनावश, हळवी मनोवृत्ति यांत

कसलीच शंका नाही असें प्रोफेसर डब्ल्यू. जे. अलेक्झँडर याने म्हटलें आहे. शेलीविषयींचे हे उद्गार गडकऱ्यांनाहि यथार्थपणें लावतां येतील असें वाटतें. गडकऱ्यांच्या रूपकात व शेलीच्या रूपकांत एक महत्त्वाचा फरक आहे. तो येथे स्पष्ट करणें जरूर आहे. कारण दोघांची मनोवृत्ति हळुवार व भावनाप्रधान असली तरी शेलीपेक्षा गडकऱ्यांना ओसाड ठिकाणांतील उद्वेगजनक भीषणतेची, भयाण एकान्ताची आसक्ति अधिक आहे हें त्याच्या अनेक कवनांवरून सहज दिसून येईल. गडकऱ्यांच्या फुलाच्या भोवतालची परिस्थिति अत्यत उद्वेगजनक आहे, स्पृहणीय असे तिच्यांत कांहीहि नाही. एक भकास, पडका, जुनाट, ओसाड आड, वर तोंडाशी वेलींचे ताणे वाटेल तसे पसरलेले,–तें दृश्य भयानकच आहे. ' वाटे अथरलें जणू दफन तें जीवत तोंडावरी. ' आत पाण्यावर ' काळीभोर कभिन्न गर्द ' सावली पडलेली—आणि असल्या भकास आडांत उगवलेलें तें फूल! याच्या उलट शेलीने आपल्या ' सेन्सिटिव्ह प्लँट ' च्या भोवतालच्या रमणीय परिस्थितीचे केलेलें वर्णन किती लोभसवाणे आहे पाहा. शेलीची लता एका रमणीय उद्यानात मद वाऱ्याबरोबर सुगधाने दरवळलेल्या वातावरणांत डोलत आहे.

> A Sensitive Plant in a garden grew,
> And the young winds fed it with silver dew,
> And it opened its fan-like leaves to the light,
> And closed them beneath the kisses of night.

शेलीच्या लतिकेच्या आजूबाजूला अनेक प्रकारच्या मोहक फुलझाडांची रांग लागलेली आहे—जाई आहे, जुई आहे, गुलाब आहे. जवळून एक ओढाहि वाहत चालला होता.

बागेंत इतकीं फुलझाडें होतीं; परंतु एकट्या त्या लतिकेला मात्र प्रेमाच्या मधुर स्वप्नाने बेचैन केलें होतें. इतरांच्या चित्ताला या अभिलाषेने बेभान केलें नव्हतें. त्या एका लतिकेचीच तेवढी अशी उन्मनी अवस्था कां झाली होती, तिच्या एकटीच्याच चित्तांत अशी भित्री धडधड कां सुरू झाली होती हें कोण सांगूं शकणार?

> But none ever trembled and panted with bliss
> In the garden, the field or the wilderness,
> Like a doe in the noon-tide with love's sweet want,
> As the companionless Sensitive Plant.

त्या भावनावश लतिकेच्या चित्तांत ज्या मृदु भावनांचें काहूर माजलें होते, ज्या अभिलाषांनी—अमर्याद अभिलाषांनी—तिला बेभान करून टाकलें होतें त्याचें वर्णन शेलीने अत्यंत आकर्षकपणें केलें आहे.

> But the Sensitive Plant which could give small fruit
> Of the love which it felt from the leaf to the root,
> Received more than all, it loved more than ever,
> Where none wanted but it, could belong to the giver:
> For the Sensitive Plant has no bright flower,
> Radiance and odour are not its dower;
> It loves even like love; its deep heart is full,
> It desires what it has not, the beautiful!

पण त्या हळुवार लतिकेचीं सारीं स्वप्नें विरून जावयाचीं होतीं. तिच्या दैवांतच ते लिहिले होतें. तिच्याच नशिबीं हें का यावें याचें उत्तर कोण देऊं शकणार ?

> The Sentive Plant was a leafless wreck.

आणि त्या ओसाड ओडांत?——

> त्या धक्क्यासरसेंच फूल मग जे कोमेजले एकदा,
> नाहीं तें हसले पुन्हा ! विकसले नाही पुन्हा तें कदा !

वेड्या आशेच्या मृगजळाच्या मागे लागून तीव्र निराशा पदरीं पाडून घेण्याखेरीज दुसरें आपल्याला काहीच करतां येणार नाही याची जाणीव गडकऱ्यांच्या मनांत जागृत नव्हती असें नाही. हें मृगजळ आहे हें कटुसत्य मुळीच माहीत नसतां केवळ अज्ञानजन्य मोहाने त्याच्या मागोमाग धावणें ही गोष्ट निराळी, आणि मृगजळाचा फसवेपणा पुरतेपणीं माहीत असून त्याच्या त्या तरळत्या आभासांत धुंद होऊन राहणें, व

परिणामाची जाणीव असताहि सैरावैरा त्याच्यामागे धावणें ही गोष्ट निराळी! आपण जिची अभिलाषा बाळगीत आहोंत ती गोष्ट आपल्या सामर्थ्याच्या आटोक्याच्या बाहेर आहे, दुष्प्राप्य आहे, तें केवळ एक स्वप्न आहे इत्यादि कटु सत्याची जाणीव झालेली असताहि 'गुंफीत कल्पनाजाला गुंगणे, गुरफटुनि त्यात जीवाला टाकणें, रंगीत स्वप्नसृष्टीला उठविणें' ही ज्याची शाश्वतची मनोवृत्ति झालेली असते अशा गडकऱ्या-सारख्या भावनावश व अमर्याद इच्छा करणाऱ्या कवींना आपल्या स्वैर मनाला आवर घालताच येत नाही. इतकेंच नव्हे तर आशानाशामुळे उत्पन्न होणाऱ्या नैराश्यात सुद्धा एक प्रकारचे विचित्र समाधान ते मिळवूं लागतात; पण काय वाटेल तें झाले तरी वेडया आशेच्या मोहिनींतून मुक्त व्हावें असे मात्र त्याना वाटत नाही. आशानिराशेचा हा खेळ पांखरास या कवितेत गडकऱ्यानी पुढीलप्रमाणे वर्णिला आहे.

परंतु सारा निर्धन मनिचा स्वप्नभास हा खरा,
विषण्ण मानस, उदास जीवन, पीत निराशागरा

* * *

दूरदूर ते पळते गाणे करिल मनाचा चुरा,
मिळता लघुसुख अधिक सुखाचा जीव सदा हावरा,
तीव्र निराशा होता होइल फार कि रे घाबरा!

थोडक्यात सांगावयाचें म्हणजे 'महती आशा, तीव्र निराशा' हें गडकऱ्याच्या भावजीवनाचें सार आहे. भयाण एकान्त या कवितेंत ते म्हणतात.

महती आशा, तीव्र निराशा, द्वंद्व हृदयिं करिती
एकीमधुनी दुसरी निपजे, खळ नाहीं कशि ती![३]

अप्राप्य गोष्टींचा ध्यास चित्ताला लागून तिच्यात साऱ्या आशा केंद्रित व्हाव्या, ती गोष्ट प्राप्त होण्याची शक्यता आहे असा गोड भास व्हावा, आणि अनावर धडपड करून आपण ती थोडयाच वेळांत हस्तगत करणार अशी स्पृहणीय संवेदना मनांत तरळूं लागावी—आणि काल्पनिक

सुखाच्या या प्रकर्षाच्या क्षणाला साऱ्या आशांचा चक्काचूर व्हावा, पेला ओठाला लागतो न लागतो तोंच हातांतून निसटून खाली पडावा आणि खळ्कन फुटावा, म्हणजे मनाची काय विलक्षण अवस्था होईल याचें अत्यंत परिणामकारक चित्र गडकऱ्यानी एका कवितेत रेखाटले आहे. ही कविता गडकऱ्यांच्या पश्चात् प्रसिद्ध झालेल्या कवितांपैकी असून कथाशेष हें तिचें नांव आहे.

उच्च पठारावरी धावता फूलपाखरामागे
हात सरकला पुढे–अरेरे–पखहि हाता लागे.
तोंच तेथुनी कडा लागला—ते सरते पाऊल
वरुनि तरळते फूलपाखरू पाडि दृष्टिला भूल.
अधातरी ते भिरभिरते मग–अतर नसता फार,
जटावलेल्या जिवास भासे पारे ते नानाकार !
नि श्वासाच्या लहरींवरतीं दूर तरगत जाई,
उदास ओसाडीच पुढे ती वरतीं खाली पाही !

पुण्यप्रभावांतील वसुधरा अमर्याद इच्छा करणाऱ्या आणि सर्वस्वाच्या सत्यानाशातच समाधान मानणाऱ्या ईश्वराला एक मार्मिक प्रश्न विचारते.

"अमर्याद सुखाची आशा धरून बसणें आणि तें मिळालें नाहीं म्हणजे डोक्यात अशी राख घालणें हें जरासे गैरच नाहीं का ?" यावर तिची समजूत घालण्याच्या विचाराने ईश्वर म्हणतो—"माझीच काय, पण आपणा सर्वांच्याच पहिल्या आशा शक्य तेला फारशा सोडून नसतात. आपलीं बाळपणचीं आशेचीं कल्पनाचित्रे जरा भडक रगात रगविलेलीं मात्र असतात; तीं व्यवहारात वठावयाला ज्या मानानें कमीजास्त वेळ लागतो त्या मानाने त्यांच्यावरचे रग उडून जाऊन तीं थोडींबहुत फिकट होतात एवढेच!"

हे उद्‌गार एक वेळ इतर सामान्य माणसाच्या तोंडी शोभून दिसतील. पण आपल्या अमर्याद इच्छांचें व्यवहारांत साफल्य होऊं शकलें नाही म्हणून सर्वस्वाच्या सत्यानाशांत समाधान मानण्याची लालसा बाळगणाऱ्या ईश्वराच्या तोंडीं ते कसेसेच वाटतात. आणि गडकऱ्यांच्या

भावजीवनाला तर ते मुळींच लागू नाहीत हें त्यांच्या अनेक कवनांवरून सहज दाखविता येण्यासारखें आहे. गडकऱ्यांचीं कल्पनाचित्रें ईश्वर म्हणतो त्याप्रमाणें ' जरा भडक रगात ' रंगविलेलीं होतीं हे मुळींच खरें नाही. त्या कल्पनाचित्राचा रग फारच भडक होता. तारका जशा दुष्प्राप्य तशींच त्या कल्पनाचित्रांतील दृश्येहि दुष्प्राप्य होतीं. आणि असलीं कल्पनाचित्रें रगविणें बरें नाही हें चागले माहीत असताहि गडकऱ्याना तो मोह कधीच आवरता आला नाही याचें कारण कल्पनेच्या काव्यानदात सतत तरगणारें त्याचें मन. हें मन वस्तुस्थितीच्या वणव्यात पार होरपळून गेले असलें आणि विषण्णतेने ते ग्रासून टाकले असलें तरी आशानिराशेच्या लपडावांतच त्याला मोठे समाधान वाटत आहे. नैराश्य आले म्हणून आशेचे विलसित थाबलें असे कधीच झाले नाही. उलट ती अधिक जोमाने वर वर भरारी मारावयास उत्सुकच आहे. आशा सफल होण्यासारखी अनुकूल परिस्थिति नाही, आणि पुढेहि येण्याची शक्यता नाही—आणि हा ' हृदयिचा लपंडाव ' सरण्याचीहि शक्यता नाही !

आपल्या अशक्य कोटींतील अमर्याद इच्छाचा व्यवहाराच्या वस्तुस्थितींत प्रत्यहीं चुराडा झालेला पाहण्याचे ज्याच्या नाशिबीं आलेले असते अशा गडकऱ्यासारख्या आत्यतिक भावनावश कवींच्या जीवनाचे सारसर्वस्व औदासीन्यांत आणि विषण्णतेत सामावलेले असते, तें त्याच्या जीवनाचें सूत्रच बनते; या हृदयव्यथेने त्याचें सारे भावजीवन पूर्णपणें व्यापून टाकलेलें असते. आपले जीवन कधीहि न सपणाऱ्या विषण्णतेने व्यापून टाकलें आहे अशी गडकऱ्याची अनेक ठिकाणीं अगदी स्पष्ट कबुली आहे. आपण ' जीवन्मृत ' आहोंत असेंहि ते म्हणतात.

काळोखाच्या जगामधे या
मृत आशाच्या चितावरुनिया,
पिशाच्च माझें भटकत आहे
शाति नसेचि तया !

अशी आपल्या निराश मनाची व्यथा पुष्पाप्रत या कवितेंत केशवसुतांनी अगदी करुणपूर्ण रीतीने व्यक्त केली आहे. गडकऱ्यांनी सुद्धा आपल्या

मनात सतत सलत असलेलें हें शल्य पुन्हा पुन्हा प्रकट केलें आहे.

या मदीय चिरनिराश । जीवन्मृत मानसास
पुनरपि उमलावयास । काल दिला कोणता ?

असा अत्यंत आर्त प्रश्न ते विचारीत आहेत. ही खिन्नता, ही उदासीनता अवेळीं ओरडणाऱ्या कोकिळेस या गीतांत सर्वत्र प्रकट झाली आहे. सगळें जग सुखाने निद्रावश झालें असून आपल्या मनातील असह्य तळमळ एक क्षणाचाहि विसावा आपल्याला मिळूं देत नाही, आणि यामुळे पापण्या जडावल्या असतांनाहि झोप अशक्य आहे या विषण्ण विचाराने ही कविता भारावलेली आहे.

उदासीनता छाया पसरी,
सृष्टि दिसे जरि वरुनी हसरी—
खिन्नताच जरि अतरि सारी,
व्यर्थ बोलतो, व्यर्थ डोलतो ससाराचा गोल !

* * *

परतु जेथे उदासीनता
व्याकुल करिते विषण्ण चित्ता
तेथे त्याला द्याया समता—
गाणे गावे, हेच अलौकिक ईश्वरतेचे काम

आपल्या या हतभागी अत:सृष्टींत आनदाची आणि समाधानाची एखादी तरळती, चोरटी लहर चमकून जावी यासाठी कोकिळेच्या आलापाची कवीला तहान ,लागली आहे; एखादी ओझरती लकेर ऐकावयास मिळावी म्हणून तो ' मनाचे कान आणि जिवाचें भान ' करून बसला आहे. आणि असल्या या रात्रींच्या खिन्न आणि भयाण एकातात असह्य विषण्णतेने त्याच्या हृदयात थैमान माडलें आहे.

निद्रा कुठली परि त्या हृदया, भविष्य नाहीं ज्यास ?
हातीं संसाराची माती,
मनिंच्या आशा मनींच खाती
भूतकाळची भूते रडती !

मिटल्या जाग्या डोळ्यापुढती शून्याचें मैदान !
निष्प्रेमाची शेज सोबता,
भयाण दुनिया सारी भंवती,
विषण्ण येती विचार चित्तीं,
बाह्यांतर विश्वात खेळते उदासीनता एक !

ऑगस्ट १९१५ मध्ये प्रसिद्ध झालेल्या **मनांतली दिवसरात्र** या कवितेतहि हेच विषण्ण विचार पुन्हा एकदा उत्कटतेने प्रकट झाले आहेत. ' हृदयिंचा लपंडाव ' हेंच त्याच्या जीवनाचे सूत्रबद्ध रहस्य होऊन बसलें असून विषण्णता हें त्या रहस्याचें केवळ बाह्य रूप आहे.

तशीच मनिं सारखी वरिवरीच आशा चढे,
गमे क्षणच जाहली सफल, तोंचि खालीं पडे
विषण्ण हृदयी तशी भयकरा निराशा जडे,
तमोमय रसा गिळी मन मनीं बिचारे रडे !

या यातना सहन करणें अशक्य झाल्यावर अगदी हृदय पिळवटून गडकरी म्हणतात—

नको दिवसरात्र ही न सरती कधीं जी पहा,
सरेल कधिं तो सरो हृदयिंचा लपंडाव हा !

परंतु हा लपंडाव सपणार नाही, तो त्याच्या ऐहिक जीवनाच्या अंतापर्यंत चालू राहणार आहे. ही विषण्णता नाहीशी होणार असेल तर केवळ मृत्यूनेच ती होईल. आणि हा उदास विचार मनात आला की ईश्वराचें तें काळजाचा ठाव घेणारें वाक्य आठवते.

" अमर्याद इच्छा करणाऱ्या निराश मनाला मर्यादित सुख-प्राप्तीपेक्षा सर्वस्वाच्या सत्यानाशानेच अधिक समाधान वाटतें ! "

आपल्या विषण्णतेंत आणि औदासीन्यात गुरफटून जाऊन त्यातच एक विचित्र समाधान मानण्याची वृत्ति गडकऱ्याच्या ठायीं निर्माण झालेली स्पष्ट दिसत असली तरी हें नुसतेंच, निखालस औदासीन्य नसून त्यात आशेची तिरीप आहे हें लक्षांत ठेवले पाहिजे. असें जर नसतें तर आपल्या

विषण्णतेचा असला सरस आविष्कार करणें त्यांना जमलेंच नसतें. कधीच नष्ट न होणारें एकजिनसी औदासीन्य पुन्हा पुन्हा प्रादुर्भूत होणाऱ्या गोड आशेने सुसह्य होणें जर शक्य नसेल तर जो उद्वेग येईल, जो वैताग येईल, त्याच्या पोटीं आपल्या भावनाचा काव्यांत आविष्कार करणेंहि कवीला जमणार नाही. या भावनांचा काव्यात आविष्कार करण्यासाठी जो ' मूड ' यावा लागतो तो ' मूड ' गडकऱ्याच्या बाबतींत शक्य होता याचाच अर्थ असा की, त्यांच्या औदासीन्याच्या भयाण काळोखात आशेच्या तारका लुकलुकत होत्या. त्यांचा प्रकाश क्षीण असला तरी त्या काळोखाचा भीषणपणा किंचित् कमी करण्याचें सामर्थ्य त्याच्यामध्ये खासच होतें. ' निराश मनिंही पुन्हा करि तशीच आशा रव ! ' अशी त्यानीच कबुली दिली आहे. गडकऱ्याच्या आत्यंतिक नैराश्यात आणि औदासीन्यात आशेचा अंकुर अस्फुट का होईना दिसत आहे हें लक्षात घेतलें म्हणजे औदासीन्याचे इतकें काव्यमय आविष्करण ते कसे करूं शकले याचा उलगडा होईल. बाह्यत: कवीची निराशा आपल्याला निरवधि वाटली, ती कधीच नष्ट होणार नाही व तिच्यापासून होणाऱ्या वेदनाहि मुळीच कमी होणे शक्य नाही असें आपल्याला वाटले तरी प्रत्यक्ष कवीच्या मनात मात्र त्या औदासीन्याच्या विचारात आशेच्या, उत्साहाच्या मोहक छटा मिसळलेल्या असतात, त्याच्या हृदयात आशानिराशेचा लपंडाव चाललेला असतो, निराशेच्या भीषण अंधाराला उजळणारी विद्युल्लता मधून मधून लकाकत असते; आणि यामुळेच आपल्या गाढ विषण्णतेचा, नैराश्याचा, औदासीन्याचा, कवनात इतका सुंदर आविष्कार करणें त्याला जमते. उद्वेगजनक विचारांनी चित्ताला बाधिरता आली, आणि कित्येक वेळां जीविताचा अत झाला तरी बरे असे वैतागाचे विचार मनाला छळूं लागले तरी दूर कोठे तरी आशेचा एखादा किरण दिसतो; आणि त्या एका इवल्याशा किरणाच्या आधारावर खिन्न झालेल्या हळुवार अंतःकरणात उत्साहाचा जो आनंद तरळू लागतो त्याच्यामुळे आपल्या निराशेच्या व विषण्णतेच्या विचारांचें काहूर काव्यात्मक रीतीने कवीला आविष्कृत करतां येतें. 'तशांत गगनामधें दिसत दूर तारा परी— ! ' ही तारा म्हणजेच तरळती आशा ! या तारकेच्या सौंदर्याची

मोहिनी अशी कांही विलक्षण असते की, तिच्यामुळे पराकाष्ठेच्या असह्य व दारुण यातनाहि सहन करणें माणसाला शक्य होते, इतकेंच नाही तर कवीच्या विषण्ण विचारांचें काव्यमय आविष्करण तिच्यामुळे होत असते.

—a dream
Of youth, which night and time have quenched for ever
Still, dark, and dry, and remembered now.

असे आर्त उद्‌गार काढणारा आणि आपले जीविताचे रम्य स्वप्न विरून गेलें असा अलॅस्टर या कवितेत विलाप करणारा शेली आपल्या नैराश्याला आणि विषण्णतेला उजळून टाकणाऱ्या आशेची रम्यता पुढील काव्यमय शब्दांत आविष्कृत करीत आहे.

Art and eloquence,
And all the shows o the world are frail and vain,
To weep a loss that turns their lights to shade.
It is a woe too 'deep for tears', when all
Is reft at once, when some surpassing Spirit,
Whose light adorned the world around it, leaves
Those who remain behind, not sobs or groans,
The passionate tumult of a clinging hope,
But pale despair and cold tranquillity,
Nature's vast frame, the web of human things,
Birth and the grave, that are not as they were.

अमर्याद नैराश्य प्राप्त होऊन विषण्णतेने मनांत थैमान घातले असतांना भयाण एकान्तांतहि गडकऱ्यांना दूर जी तारा दिसत आहे तिने त्यांचें चित्त उजळलें आहे, आणि त्यायोगें जो उत्साह त्यांना प्राप्त झाला आहे त्याचें स्वरूप वर उद्‌धृत केलेल्या शेलीच्या ओळींत आविष्कृत झालेल्या उत्साहासारखाच आहे. आशेची ही मोहिनी किती आकर्षक असते आणि त्यायोगें जीवनसंगीताची भैरवी सुद्धा किती रमणीय होते याचें प्रत्यंतर गडकऱ्यांनीं १९१९ च्या अगदी अखेरीस त्याच

**तारकेस याचना** या नांवाची जी कविता लिहिली आहे तिच्यांत उत्कृष्ट-पणें दिसून येईल. ज्या तारकेला उद्देशून ते या कवितेंत आपल्या भावना प्रकट करीत आहे ती तारका त्यांच्या आशेचें प्रतीक असूं शकेल, अथवा ज्या प्रेयसीचें अमर्याद आकर्षण त्यांना वाटत असेल तिचेंहि तें प्रतीक असेल. काहीं असलें तरी दोन्ही ठिकाणीं अमर्याद आशेचेंच आकर्षण आहे.

थाब जरा, तारके ! जरा तरि थाब, सखे सुंदरि !
कुणिकडे नेशी मज यापरी !
तव किरणाच्या सुंदर कोमल आधारावरि सखे !
केलें माझें मज पारखें !
स्वर्गसुखाची आशा लावुनि ओढिसि मजला गडे !
थाबांचि–साग परी कुणिकडे ?
अतिदु खाच्या सतत अनुभवे हळवा जिव जाहला,
सुखाची सवय नाहिं त्याजला !
परि आशा लावुनि नेशी मज वरिवरी,
देशील टाकुनी स्वर्गातुनि मज जरी,
तो अध पातही या उन्नतिच्या परी

यासारख्या कवितामधून कवींच्या नैराश्याची छाया पसरलेली दिसत असली तरी आपल्या रसिकतेला त्या नेहमी आकर्षकच वाटत असतात. नैराश्य किंवा औदासीन्य मुळांत स्पृहणीय नसतें हें खरें असलें तरी त्याचें काव्यमय आविष्करण मात्र अत्यंत हृद्य व स्पृहणीय असतें. हें हृद्यत्व नैराश्यामुळे निर्माण होत नसून कवीच्या मनातील आशानिराशांच्या लपंडावाचें तें मोहक चित्र असते म्हणून निर्माण होतें. कवीचें औदासीन्य त्याच्या चित्तांतून काव्यांत संक्रांत झाल्याबरोबर तें रासिक, सहृदय वाचकांच्या दृष्टीने अत्यंत रमणीय होत असतें. गूढ हुरहूर, खिन्नता, विषण्णता, औदासीन्य, आणि शेवटीं घोर नैराश्य या सर्व मानासिक अवस्थांतून भावनावश कवि भ्रमण करीत असतांना विद्युदुन्मेषाप्रमाणें अत्यंत मोहक पण क्षणभंगुर असलेल्या आशेने, आनंदाने, उत्साहाने त्याच्या भावजीवनांत जें अस्फुटरम्य चांदणें पसरते त्याची शोभा फार आकर्षक असते; आणि

ही शोभा त्याच्या विषण्ण गीतांत पसरलेली असल्यामुळेच तीं गीतें आपल्याला मोहक वाटत असतात. कवीच्या चित्ताचा विलक्षण दाह होत असतो, त्याच्या परस्परविरुद्ध भावनांचा घोर संगर चालू असतो, अत्यंत उत्कट झालेल्या त्याच्या मनोविकारांचें भीषण नैराश्यांतहि रूपातर होतें—तथापि या भावनासंघर्षातूनच त्याच्या व्यथित मनांतून संगीताने भारावलेले व ओथंबलेले शब्द बाहेर पडतात, आणि त्या संगीताची मोहिनी सहृदय वाचकाला भुरळ पाडावयास केव्हाहि समर्थ असते.

रोमॅंटिक कवींच्या ठायीं नेहमी दिसून येणारें एक प्रकारचें औदासीन्य विफल प्रेमामुळेच निर्माण झालेलें असतें असें नाही. प्रेमभंगाची व्यथा, किंवा प्रेमाचा वर्षाव जिच्यावर करावा अशी प्रेयसी वस्तुस्थितींत नसल्यामुळे उत्पन्न होणारी व्यथा—निष्प्रेम जीवनाची व्यथा—या गोष्टींमुळे विलक्षण औदासीन्य निर्माण होणें अगदी अपरिहार्य आहे. तथापि वरील दोन्ही कारणे नसतांहि अनेक कवींच्या जीवनावर औदासीन्याची, विषण्णतेची दाट छाया पसरलेली दिसून येते. तेव्हा याला दुसरींच कांही कारणें जबाबदार असलीं पाहिजेत हे उघड आहे. व्यावहारिक जगतांतील अनेक कटु अनुभव, भोवतालच्या लोकांची कृतघ्नता व बेपर्वा वृत्ति, ज्या प्रकारच्या यशाची प्राप्ति व्हावी यासाठी मन नेहमी तळमळत असतें ते यश न मिळाल्यामुळे येणारी खिन्नता, जग सुधारावें असें वाटत असतांहि त्याच्यातील वैगुण्य नष्ट करण्याच्या बाबतींतील स्वतःचा दुबळेपणा, इत्यादि गोष्टींमुळेहि अमर्याद इच्छा करणाऱ्या हळव्या, भावनावश मनाला औदासीन्य ग्रासून टाकूं शकेल. व्यावहारिक जीवनांत गडकऱ्यांच्या असंख्य आशांचा चुराडा झालेला होता हें आपल्याला चांगलें माहीत आहे. जग हें पराकाष्ठेचें फसवें आहे अशी खात्री होण्याइतपत त्याची जीवनाने वंचना केली असली पाहिजे हें उघड आहे. निदान जगाकडून ज्या गोष्टींची त्यांना अपेक्षा होती त्या गोष्टींची त्यांना प्राप्ति झालेली नव्हती यांत शंका नाही. आणि या आशाभंगाच्या पोटीं त्याच्या बऱ्याच कवनांतील औदासीन्य निर्माण झालें असावें असें वाटतें. निष्प्रेम जीवनाच्या जाणिवेने उत्पन्न होणारी तळमळ, किंवा जिच्यावर मृदु भावनांचा वर्षाव सतत

करावा व जिच्या प्रत्युत्तराची अपेक्षा करावी अशी प्रेयसी प्रत्यक्षांत भेटल्यानंतरहि झालेली दारुण निराशा या गोष्टींची व्यावहारिक जीवनातील इतर अपयशाच्या मालिकेंत भर पडली म्हणजे औदासीन्याची तीव्रता प्रकर्षाला जाईल हें सांगण्याची जरूर नाही. बहुतेक रोमँटिक कवींच्या जीवनात वर उल्लेखिलेल्या गोष्टींची केव्हां ना केव्हां उजळणी होऊन जात असते. इतराच्या जीवनात या गोष्टी घडत नाहीत आणि केवळ रोमँटिक कवींच्याच जीवनात त्या घडतात असा याचा अर्थ नाही. पण जे कवि असतात त्याना आपल्या व्यथाचा काव्यमय आविष्कार करतां येतो व आपल्या भारावलेल्या मनाला विरंगुळा प्राप्त करुन देतां येतो. आणि इतराना हे शक्य नसल्यामुळे केवळ मनातल्या मनात पिचत राहण्यापलीकडे त्याना दुसरें काहीच करता येत नाही. आपल्या भावनांचा आविष्कार केल्यामुळे कवींच्या मनावरचा भार मात्र हलका होत असतो.

१९१४ च्या अखेरीस गडकऱ्यानी **ओसाड आडांतलि एकच फूल** ही कविता लिहिली. ही कविता आणि **वेडा** ही कविता, या दोन्ही कवितात दिसून येणारी व्यथा ही प्रणयभंगाची व्यथा नसून निष्प्रेम जीवनाची—जिच्यावर प्रेमाची वृष्टी करावी अशी व्यक्ति निकट सहवासांत नसल्यामुळे उत्पन्न होणाऱ्या निष्प्रेम जीवनाच्या जाणिवेची—व्यथा आहे. प्रणयभगामुळे उत्पन्न होणारें दारुण नैराश्य व कटु औदासीन्य या गोष्टींनी गडकऱ्यांच्या कवनात १९१४ च्या अखेरपर्यंत शिरकाव केला होता असे वाटत नाही. प्रणयनैराश्याची आणि त्यापासून निर्माण होणाऱ्या अपार औदासीन्याची छाया त्याच्या जीवनावर, व अनुषगाने त्याच्या काव्यावर, नेमकी केव्हा पसरली हें सांगणें बरेच अवघड आहे. तथापि **ओसाड आडातील एकच फूल** ही कविता ज्या काळात त्यानी लिहिली त्या काळात तरी प्रणयभंगाच्या व्यथेपासून निर्माण होणारें औदासीन्य त्यांच्या परिचयाचें नसावें असें वाटतें. परंतु हा विषय इतक्या तांतडीने निकालांत निघण्यासारखा नसल्यामुळे एका स्वतंत्र प्रकरणांत त्याची विस्ताराने चर्चा करणेंच योग्य ठरेल. याठिकाठीं इतकाच मुद्दा मांडावयाचा आहे की, १९१५ च्या पूर्वी गडकऱ्यांच्या अनेक गीतांमधून नैराश्य व

औदासीन्य यांचें जें आविष्करण दिसून येतें तें व्यावहारिक जगतांतील अपेक्षा-भंगामुळेच निर्माण झालेले असून प्रेमभंगाच्या पोटीं उत्पन्न होणारें तीव्र नैराश्य त्यात दिसून येत नाही.

शेलीने *Alastor* ही दीर्घ काविता वयाच्या तेविसाव्या वर्षीं लिहिली. विलक्षण कल्पनाशक्ति प्राप्त झालेला एक अत्यंत भावनाप्रधान तरुण आदर्श जीवनाचीं ध्येयवादाने भारलेलीं काल्पनिक चित्रें निर्माण करतो आणि त्या रम्य चित्रांत सर्वस्वीं रंगून जातो. परंतु त्याचा हा ध्येयवाद सत्यसृष्टींत उतरला नाही, त्याच्या कल्पनाचित्रांतील मोहक रंग वस्तुस्थितीच्या प्रखर उन्हांत फिकट झाले, आणि अखेर पूर्ण उडून गेले. अशा रीतीने त्याचा विलक्षण अपेक्षाभंग झाल्यामुळे नैराश्याची व्यथा अनुभवणें त्याच्या नाशिबीं आलें, अशी कहाणी या कवितेंत शेलीने वर्णिली आहे. या कवितेची पूर्वपीठिका प्रोफेसर डाउडन या शेलीच्या चरित्रकाराने पुढीलप्रमाणें वर्णिली आहे.

> "Already at twenty-three Shelley was disillusioned of some eager and exhorbitant hopes, the first great experiment of his heart had proved a failure; his boyish ardour for the enfranchisement of a people had been without a result, his literary efforts had met with little sympathy or recognition, and during the early months of the year, he had felt how frail was his hold on life, and had almost confronted that mystery which lies behind the veil of mortal existence."

या सर्व भावनांचा—या अमर्याद इच्छांचा, आणि त्या व्यवहारांत सफल न होऊं शकल्यामुळे उत्पन्न झालेल्या नैराश्याचा—आविष्कार शेलीच्या या कवितेंत झाला आहे. याच प्रकारचे नैराश्य गडकऱ्यांच्या १९१४ च्या अखेरपर्यंतच्या कवितांत प्रकट झालें आहे.

कांही वेळां कोणतेंहि बाह्य कारण नसतांनाहि भावनावश मनाला कसली तरी चमत्कारिक, अनिर्वचनीय हुरहूर लागते, इतकेंच नव्हे तर तें

पराकाष्ठेचें उदासहि होतें. औदासीन्याचें कारणच जर कळलें नाही तर त्याचें निराकरण कसें करावयाचें? ज्या भावनावश माणसांना असल्या अकारण गूढ हुरहुरीचा आयुष्यांत केव्हा ना केव्हा अनुभव आलेला असतो त्यांनाच या भावनेचा काव्यांत झालेला आविष्कार समजेल व हृद्य वाटेल. इतरांना हें सारें चमत्कारिक वाटेल. गडकऱ्यांच्या कांही कवनांतील हुरहूर व औदासीन्य असेंच अकारण निर्माण झालें असण्याची शक्यता आहे. त्यांच्या मनाची घडण जर आपण नीट समजावून घेतली तरच या प्रकारच्या भावनाविष्काराचा अर्थ आपणांस समजेल, एरवी नाही. आणि सुखाने समृद्ध असलेल्या जीवनाची प्राप्ति होऊन सुद्धा कांही वेळां या प्रकारच्या गूढ भावनेची प्रतीति माणसांना होत नाही काय? विशेषेंकरून आयुष्याची शाश्वति कोणत्याहि कारणांमुळे क्षीण होऊं लागली म्हणजे एरवी सुखी असलेल्या माणसांचीं मनें सुद्धा अकारण हुरहुरीने भारावतात. ही हुरहूर किंवा हें औदासीन्य क्षणिक असतें हें खरें, मनाची ती अवस्था कालातराने नष्ट होते हेंहि खरें. पण त्या भावनेची प्रतीति असणें ही गोष्ट असंभाव्य नाही. 'रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान् पर्युत्सुको भवति यत्सुखितोऽपि जन्तुः' या ओळींत पर्युत्सुकत्वाची जी भावना कालिदासाने आविष्कृत केली आहे तिचें मर्महि हेंच आहे. कवि जर मुलखावेगळा भावनावश असेल, त्याच्या आकांक्षा जर अमर्याद असतील, आणि त्या व्यवहारांत उतरविण्याचें सामर्थ्य त्याच्यांत नसेल तर अपेक्षाभंगाच्या व्यथांची मालिकाच त्याच्या नशिबीं येईल, आणि कधीच नष्ट न होणाऱ्या औदासीन्याने त्याचें जीवन झाकाळून जाईल. गडकऱ्यांच्या बाबतींत नेमकें हेंच झालें असलें पाहिजे.

---

# ८. वाटे स्मशान शांतिस्थान !

Ah, 'tis the thought,
The deadly feel of solitude....
—*Keats*

'अतिदुःखाच्या सतत अनुभवें हळवा जिव जाहला, सुखाची संवय नाहीं त्याजला' अशी गडकऱ्यांनी आपल्या मनाची अवस्था वर्णिली आहे. दुःखाचीच किंवा अपेक्षाभंगाचीच सवय झाली म्हणजे उद्भवणाऱ्या शाश्वत औदासीन्यामुळे आणखी एक गोष्ट भावनावश माणसाच्या बाबतींत नेहमी दिसून येते. एकान्ताची आवड ही ती गोष्ट होय. बहुतेक साऱ्या रोमॅंटिक कवींच्या ठायीं ही एकान्ताची आसक्ति दिसून येतेच. काहींमध्ये ती सौम्य असते, आणि गडकऱ्यांसारख्या कवींमध्ये ती अतिरेकाला गेलेली दिसते. रानांतील निर्जन जागा, चर्चजवळील पटांगणांतील मध्यरात्रीच्या काळोखांतील एकान्त, जुनाट व पडक्या किल्ल्यांतील भयाण एकान्त इत्यादींची तिएक् या जर्मन स्वच्छंदवादी कवीला विलक्षण आसक्ति होती असे बोयेसेन या लेखकाने नमूद करून ठेविलें आहे. काळोख्या रात्रींतील भयाण एकान्ताचें लॉर्ड बायरनूला सुद्धा असेंच विलक्षण आकर्षण वाटत असे. अश-स्याच आसक्तीच्या पोटीं प्रसिद्ध अमेरिकन स्वच्छंदवादी कवि एडगर ॲलन पो याने आपली रेव्हन ही गाजलेली कविता लिहिली आहे.

Once upon a midnight dreary, while I pondered weak and weary.

अशीच मुळी रेव्हन या कवितेची सुरवात आहे. मध्यरात्रींच्या भयाण एकान्तात कुढत बसण्याची वृत्ति गडकऱ्यांच्या ठायीं सुद्धा मधून मधून प्रबळ होत असे हें अवेळीं ओरडणाऱ्या कोकिळेस— या कवितेवरून दिसून येते. भावनावेग अनावर झाला आणि भोवतालच्या परिस्थितींत समाधान मिळण्याची शक्यता नसली म्हणजे कीट्सलाहि एकान्तवासाचा ध्यास लागत असे. भोवताली कोणी माणसें नसलीं आणि एकान्तांतील औदासीन्याच्या छाया घनदाट होऊ लागल्या म्हणजे आपल्या मनातील विषण्णतेच्या विचारांची उजळणी करीत त्यातच रममाण होण्याची, व विषण्णतेतहि एक विचित्र आनद प्राप्त करून घेण्याची लालसा असल्या भावनावश कवींच्या ठायीं प्रबळ होऊ लागते. औदासीन्यात किंवा विषण्णतेत आनदाचे कण शोधण्याची धडपड हे शब्दच अनेकांना विरोधाभासात्मक किंवा वदतोव्याघातासारखे वाटतील पण अनेक भावनावश कवींच्या मनांत नैराश्याची वृत्ति बळावली म्हणजे औदासीन्यातहि तल्लीन होण्याची, एकान्ताच्या भयाणपणातहि सुख मानण्याची, त्याना लालसा वाटूं लागते हें त्याच्या अनेक कवनावरून स्पष्ट दिसून येतें. या प्रवृत्तीचें 'self-spiritualisation into a kind of sublime misery' असें मिड्ल्टन् मरी या प्रसिद्ध टीकाकारानें वर्णन केलें आहे. औदासीन्याच्या अतिरेकातहि कीट्सला काहीं वेळां कसलें तरी विचित्र समाधान वाटत असे.

A thing of beauty is a joy for ever:
Its loveliness increases, it will never
Pass into nothingness, but still will keep
A bower quiet for us, and a sleep
Full of sweet dreams, and health, and quiet breathing.

अशा सुरवातीच्या उत्साहपूर्ण ओळी असलेल्या एंडिमियन् या कवितेंत औदासीन्यात रममाण होण्याची व त्यापासून समाधान मानून घेण्याचीहि कीट्सची वृत्ति प्रकट झालेली आहे.

Happy gloom !
Dark paradise ! where pale becomes the bloom
Of health by due; where silence dreariest
Is most articulate......[२]
A path in hell, for ever would I bless
Horrors which nourish an uneasiness
For my own sullen conquering . [३]

कीट्स जिचें 'the deadly feel of solitude' असें एंडिमियनमध्ये[४] वर्णन करतो त्या भावनेची आसक्ति त्याच्या ठायीं अनेक वेळा प्रबळ होते हें खरें असलें तरी त्याला अभिप्रेत असलेला एकान्त आणि गडकऱ्यांना अभिप्रेत असलेला एकान्त यामध्ये मोठाच प्रकारभेद आहे असें मला वाटतें. मानवी जगतातील अनेक व्यथाचा उबग आल्यामुळे भावनावश कवि पुष्कळ वेळां एकान्तात राहण्याची धडपड करतो. पण हा एकान्त त्याला निसर्गाच्या रमणीय सांनिध्यातहि मिळूं शकणार नाही का ? एखाद्या नदीच्या काठीं संध्याकाळच्या रमणीय प्रसगीं दिसणारी शोभा न्याहाळीत तेथल्या मोहक एकान्तवासाचें सुख त्याला मिळविता येईल. एकान्त फक्त मसणवटींतच असतो, आणि तो भीषणच असावयास पाहिजे असे कोणीं सांगितलें ? निसर्गाच्या रम्य दृश्याशीं जेथे तादात्म्य पावता येईल असा एकान्तवासहि असू शकतो. अथाग दर्याच्या किनाऱ्यावर असलेल्या तालीवनातील पानाची सळसळ आणि लाटाचा मर्मरध्वनि ऐकत तेथील भव्यरमणीय एकान्तवासाचा आस्वाद घेता येणार नाही काय ? एखाद्या डोंगरावर बसून समोर दूरवर पसरलेल्या खोऱ्यातील रम्य वनश्री पाहत तेथील एकान्ताचें सुख मिळवता येणार नाही का ? निसर्गाच्या रमणीय एकान्तांत आपल्या व्यथांचा पूर्ण विसर पडतो व आपली चित्तवृत्ति उल्लसित होते अशी कबुली अनेक रोमॅंटिक कवींनी दिलेली आहे. निसर्गात सामावलेल्या दिव्य सौंदर्याने कवित्वाला स्फूर्ति येते हा कीट्स व बालकवि यांचा अनुभव आहे. तेव्हा मानवी जीवनातील असह्य व्यथाचा मनाला विसर पडावा यासाठी निसर्गाशीं तादात्म्य पावून तेथील रम्य एकान्ताचें सुख मिळविण्यास काही हरकत नाही असें दिसतें. एकान्तच हवा तर तो भयाण

आणि भीषण कशाला हवा ? रमणीय एकान्त कां नको ? शहरातील अत्यंत दाट वस्तींतील गलिच्छ व मोडक्या घरांतील उद्वेगजनक व भयाण एकान्त आपल्याला नको असून निसर्गातील रमणीय एकान्ताची आपल्या मनाला आसक्ति आहे असें कीट्सने स्पष्ट म्हटलें आहे.

O solitude ! if I must with thee dwell,
Let it not be among the jumbled heap
Of murky buildings; climb with me the steep,—
Nature's observatory—whence the dell,
Its flowery slopes, its river's crystal swell,
May seem a span; let me thy vigils keep
'Mongst boughs pavillion'd, where the deer's swift leap
Startles the wild bee from the fox-glove bell.

एकदा औदासीन्याचा अतिरेक होऊन शेलीला एकान्तवासांत एकटा बसण्याची आसक्ति निर्माण झाली. पण हा एकान्त स्मशानांतील एकान्त, किंवा अमावास्येच्या काळोखातील भीषण एकान्त नसून रमणीय निसर्गांतील एकान्त होता. *Written in Dejection near Naples* या कवितेंत शेलीला कोणत्या प्रकारचा एकान्त हवा होता ते स्पष्ट झालें आहे.

आता गडकऱ्यांना कसल्या प्रकारच्या एकान्ताची लालसा लागलेली होती तें पाहावयाचें आहे. या बाबतींत शेली व कीट्स यांच्या मनोवृत्तींचें जें स्वरूप वर दिग्दर्शित केलें आहे त्याच्यापेक्षा गडकऱ्यांच्या मनोवृत्तीचें स्वरूप अगदी निराळें आहे. कीट्स व शेली यांना एकान्त हवा आहे, पण तो रमणीय एकान्त असला पाहिजे. पण गडकऱ्यांना ज्या एकान्ताची आसक्ति आहे तो रमणीय नसून भयाण एकान्त आहे, भीषण एकान्त आहे. यामुळे या एकान्ताच्या आसक्तीच्या प्रकाराच्या बाबतींत गडकऱ्यांचें साम्य कीट्स किंवा शैली यांच्याशीं नसून मागे उल्लेखिलेल्या रेव्हन या कवितेचा कर्ता जो एड्गर पो त्याच्याशींच आहे असें दिसून येईल. आणि रेव्हन[५] या कवितेंतील भीषण वातावरणाची बरोबर आठवण जिच्यायोगें होईल अशी घुबडास— या नांवाची एक दीर्घ कविताहि गडकऱ्यांनी लिहिलेली आहे.

अर्थात् या दोन कवितांमध्ये थोडेसें साम्य असलें तरी वैधर्म्यहि खूपच आहे. फक्त भयाण एकान्ताची विचित्र आसक्ति उभयत्र दिसून येते एवढें लक्षांत ठेवलें म्हणजे झालें. घुबडाचें भेसूर गाणें गडकऱ्यांना मोहक वाटत आहे व त्याच्याविषयीं त्यांना आस्था वाटत आहे या एकाच गोष्टीवरून गडकऱ्यांच्या मनोवृत्तीची ताबडतोब साक्ष पटावयास हरकत नाही. गडकरी घुबडाशीं अगदी समरस झाले आहेत.

मनात माझ्या जी हुरहूर
जनात काढिन तीचा सूर,
साथ मला कर, जरि तू दूर–
बेसूराने, भेसूराने झोप जगाची भगू ?
तुमची अमुची न्यारी रीत,
एकान्ताचे भालाईत,
काळोखावर लिहिले गीत .
एकान्ताला का पनकरशी ?
समाधीत या कधिंचा रमशी ?
कुठें असा संन्यासहि शिकशी ?
शिष्य तुझा मी झालो म्हणुनी,
नि सगाची सगत धरुनी,
काळोखाची राख फासुनी

घुबडाचें गाणें पराकाष्ठेचें भेसूर असलें तरी तें ऐकण्यासाठी कवि अगदी आतुर झालेला आहे. कवीच्या मनोवृत्तीशीं जमेल असें कांही तरी त्या घुबडाच्या गाण्यात असलेंच पाहिजे. त्याशिवाय त्याच्याशीं इतकें तादात्म्य कसें शक्य आहे !

असे असे जर गाणे भेसुर,
ऐकाया तरि आत्मा आतुर,
का न कळे तें लावी हुरहुर,
त्यात काहिं तरि असे थेट जे जिवास लागे बिलगू

तात्पर्य, गडकऱ्यांना जो एकान्त पाहिजे तो भयाण काळोखांतील–बडाच्या भेसूर गाण्याने हबकलेल्या काळोखांतील–भीषण एकान्त पाहिजे

आहे. आणि याच वृत्तीमुळे त्याना स्मशान हें शांततेचें आगर वाटत आहे. स्मशानशांततेची आसक्ति त्याच्या मनाला भुरळ घालीत आहे. जगातील अवांतर शांतता त्याना नको, सृष्टिसौंदर्याने ओतप्रोत भरलेल्या ठिकाणचीहि शांतता नको; तर मसणवटींतील भयाण व भीषण शांतता पाहिजे. ' वाटे स्मशान शांतिस्थान ! ' अशी ललकारी देऊन ते म्हणतात—

सजीवतेचा चाले चाळा,
कवीस त्याचा ये कटाळा,
त्रास जगाचा चुकवायाला,
शांतपणाचे, रूप जगाचे अशा स्मशानीं जात !

* * *

भयाण जागीं, भयाण काळीं,
भयाण वृत्ती होत निराळी,
भयाण झाली तो आरोळी !
जरा दचकला, कवि तो उठला, ऐके देउनि कान.
'शांतीची ही स्मशानकारा,
सजीवतेला इथे न थारा

आपल्या मानसिक व्यथाची विस्मृति व्हावी म्हणून अनेक कवि निसर्गाच्या रम्य एकान्तात धाव घेतात. गडकऱ्यांना असल्या रमणीय एकान्ताची अभिलाषा नसून अमावास्येच्या काळोखात, मसणवटींत, घुबडाच्या भेसूर गाण्याने 'सुरस' झालेल्या, भयाण एकान्ताची अभिलाषा आहे हें लक्षात घेतल्याबरोबर गडकऱ्याच्या मनोवृत्तीची ताबडतोब ओळख पटेल. इतकेंच नव्हे तर, काही गीतात व नाटकांतहि मधून मधून गडकऱ्याची भीषणतेची जी विचित्र आसक्ति प्रकट होते तिचेंहि मूळ कोठे आहे ते कळून येईल. सृष्टिसौंदर्यांत तल्लीन झाल्यामुळे आपल्या यातनांचा विसर पडेल अशी लालसा बाळगणारे जे कवि असतात त्यांच्याशीं निदान या एका बाबतीपुरता तरी गडकऱ्याचा काहीहि संबंध नाही. आणि आपल्या मनोवृत्तींतील हें वैशिष्ट्य अगदी अभावितपणें त्यांनी एका नाटकांत प्रकट सुद्धा केलें आहे. पुण्यप्रभावाच्या पहिल्याच प्रवेशांत ईश्वर म्हणतो—

"...काही दिवस जगांतल्या नव्याच्या नवाईचें नवल वाटून मन निरनिराळे प्रदेश पाहण्यात रमून जात असे; परंतु अलीकडे अतिशयामुळें सृष्टिसौंदर्यात माझ्या मनाचें आकर्षण करण्याची शक्ति राहीनाशी झाली आहे. गगनाशीं गोष्टी सांगणारे पर्वत माझ्या घराच्या उंबरठ्याप्रमाणें मला दुर्लंघ्य झाले; मोठालीं रमणीय अरण्यें घरापेक्षांहि शून्य वाटूं लागलीं; स्मशानातहि आमच्या दिवाणखान्यातलीच भीषणता दिसूं लागली. विषण्ण अर्थांचा एकांतातला कलकलाट......कानठळ्या बसवू लागतो."

१९१६ सालीं गडकऱ्यानी निराश प्रेमाचीं जीं अनेक गीते लिहिलीं त्याच्यापैकी काहींमध्ये विलक्षण कडवटपणा प्रकट झाला आहे. या कडवटपणाचीं बीजें गडकऱ्याच्या मनोभूमींत फार पूर्वीपासून अगदी खोलवर रुजलेलीं होतीं. आपलें गाणें हें 'पिशाचगान' आहे असे म्हणणाऱ्या कवीच्या भावनातील अतिरिक्त कडवटपणा आवर्जून स्पष्ट करण्याची जरूर आहे असें नाही. भीषणतेची जी आवड घुबडास व स्मशानांतलें गाणें या कवितात प्रकट झाली आहे तीच गडकऱ्यानी अन्यत्रहि प्रकट केली आहे. यावरून गडकऱ्याच्या अंतःकरणाच्या अगदी आतल्या कप्प्यात कोठेतरी भीषणतेची आसक्ति चोरूनमारून वुटमळत असावी असें मला वाटतें. ही आसक्ति प्रकट होण्याला निमित्तें वेगवेगळीं झालेलीं असलीं तरी ती आसक्ति गडकऱ्याच्या 'अंतर्हृदयात' अस्फुट स्वरूपांत का होईना वास्तव्य करीत असावी असा तर्क केला तर तो चुकणार नाही. प्रेमसंन्यासाच्या तिसऱ्या अंकाच्या पाचव्या प्रवेशातील कमलाकराचे स्वगत भाषण काळजीपूर्वक पाहावें. "या वर्षाकालीन सध्यासमयाची किती भीषणरमणीय शोभा ही !" याच वाक्याने कमलाकराने संध्यावर्णनाची नादी म्हटली आहे. या नांदीवरून पुढच्या वर्णनातील 'भीषणरमणीय शोभा' कोणत्या प्रकारची असेल याची सहज कल्पना करता येईल. "अंधार ! भयाण अंधार ! या भयाण पार्श्वभूमीवर मृत्यूचें उग्र चित्रच खेळावयास पाहिजे !" अशी भीषण सूचना देऊन कमलाकराने हें संध्यासमयाच्या शोभेचें वर्णन संपविलें आहे. कमलाकर हा बोलून चालून कृष्णकारस्थानाची आसक्ति बाळगणारा पापी

खलपुरुष असल्यामुळे त्याच्या तोंडच्या भीषण उद्‌गारांचा गडकऱ्यांच्या मनोवृत्तीशीं संबंध जोडणें मूर्खपणाचें होईल अशी शंका कोणीहि घेईल. कमलाकर हें नाटकांतील पात्र असल्यामुळे त्याच्या बाबतींत गडकऱ्यांनीं वस्तुनिष्ठेचा (objectivity) अवलंब केला आहे असें म्हणतां येण्याची शक्यता आहे. पण कवितेच्या बाबतींत तरी असें म्हणतां येणार नाही ! कारण तिच्यांत कवीच्या स्वतःच्या भावनांचाच आविष्कार झालेला असतो. अरुण (दुसरा) या नांवाची गडकऱ्यांची एक कविता आहे. या कवितेंतील कल्पनाविलासाचें यथार्थ वर्णन करावयाचें झालें तर कमलाकराने वापरलेले 'भीषणरमणीय' हेच शब्द वापरावे लागतील. आणि "'अरुणगीत' ही भीषणतेचा जिरवी हुंकार" या ओळींत स्वतः गडकऱ्यांनीहि बालकवींच्या कोमल व सुंदर अरुणगीताने आपल्या मनांत थैमान घालणाऱ्या भीषण विचाराचा निरास केला अशी अगदी स्पष्ट कबुली दिली आहे. या कवितेमध्ये आपण बालकवींच्या अरुण या कवितेकडे 'अगदीं निराळ्या दृष्टीनें' पाहिलें आहे असें गडकरी म्हणतात. ही निराळी दृष्टि म्हणजे दुसरें कांही नसून गडकऱ्याच्या मनांत अगदी दूर कोठे तरी आत्यंतिक कडवटपणाचा, भीषणतेच्या आसक्तीचा, जो अंश घोटाळत होता तोच होय यांत मला तरी काही संदेह वाटत नाही. अरुणोदयानंतर पूर्वदिशेवर ज्या आरक्त वर्णाच्या छटा दिसत आहेत त्या पाहिल्यावर गडकऱ्याच्या मनांत—अथवा दुसऱ्या मनांत असें म्हणणें अधिक युक्त होईल—कसल्या भीषण कल्पनाचें थैमान चाललें आहे याचा प्रत्यय पुढील ओळींवरून सहज येईल.

किंवा कोमल बाला मेली तीव्र निराशानी,
हृदया फोडुनि तिच्या प्रीतिचो लाट चढे गगनी !
मुक्याच इच्छा, आशा झाल्या कोणाच्या खाक,
रागाने ही लाल जाहली का त्याची राख ?

* * *

रविकिरणांचे भाले शिरले आकाशापोटीं,
रक्ताचे शिंपणें करी का जखम अशी मोठी ?

* * *

मृतरात्रीची चिता उषा ही अरुणमया ज्वाला,

पूर्वक्षितिजावर तांबूस रंगाचा जो सर्वत्र शिडकावा झालेला दिसतो, आणि ज्यायोगें असंख्य कवींच्या स्फूर्तीला बहर येतो, त्याचें अवलोकन केलें असतां गडकऱ्यांच्या मनांत एखाद्या वेळीं का होईना, असले भीषण विचार थैमान घालतात याचा अर्थ आपण काय समजावा? असल्या भीषण कल्पनांचा आविष्कार करीत असतां त्यांची प्रतिभाहि थकून भागून दीनवाणी झाली असावी असें दिसतें.

फार विचारें कविकल्पकता अतिश्रांत झाली

येवढ्यांत बालकवींचें रमणीय अरुणगीत गडकऱ्याना आठवलें आणि त्या गीतांत आविष्कृत झालेल्या कोमल भावनांच्या प्रभावाने त्यांच्या चित्तांत तांडव घालणाऱ्या भयाण कल्पनांचे वर्चस्व किंचित् कमी झालें.

बालकवीचे ' अरुणगीत ' तो मनीं उर्डी घाली,
जसा निवळवी रंग नभाचा अरुणतेज फार,
' अरुणगीत'ही भीषणतेचा जिरवी हुंकार !

यानंतर पुन्हा लगेच गडकऱ्यांच्या मनात कोमल व रमणीय भावनांचा प्रादुर्भाव झालाहि असेल. पण निसर्गातील एक अत्यंत रमणीय दृश्य समोर दिसत असतां, अथवा मनश्चक्षूपुढे तरळत असतां, इतक्या भीषण विचारांचा शिरकाव त्याच्या मनांत व्हावा या गोष्टीवरून त्याच्या दुसऱ्या मनांत असले अस्पृहणीय विचार मधून मधून जागृत होत असले पाहिजेत हाच याचा सरळ अर्थ आहे. गडकऱ्यांचें व्यक्तित्व पराकाष्ठेचें समिश्र, गुंतागुंतीचें व म्हणूनच त्याचा वरवर अभ्यास करणाराला अनाकलनीय असेंच आहे, याचा पुरावा त्याच्या दुसऱ्या मनांतील या भीषणतेच्या हुंकारात आढळेल.

नाटकांत ज्या ज्या ठिकाणीं असले भीषण विचार निरनिराळ्या पात्राच्या तोंडून प्रकट झाले असतील त्या त्या ठिकाणीं ते विचार खास त्या पात्रांचेच असून गडकऱ्यांचा त्यांच्याशीं कसलाहि संबध नाहीं अशी एखाद्याच्या मनांत शंका येणें शक्य आहे याचा वर उल्लेख केलाच आहे. आतां खास गडकऱ्यांचे विचार जिच्यांत आविष्कृत झालेले आहेत अशी अरुण (दुसरा) ही कविता

वाचल्यांनंतर त्यांनी आपल्या नाटकांतील पात्रांच्या तोंडीं या प्रकारचे जे उद्‌गार घातले आहेत त्यांचें परिशीलन करावें. असले भीषण विचार एरवी सहृदय व कोमल भावनांनी ओतप्रोत भरलेल्या मनांत निर्माणच कां होतात या प्रश्नाची मीमांसा करणें उद्‌बोधक व मनोरंजक ठरेल. मानसशास्त्रज्ञाना हें चांगलें जमेल. या प्रश्नाचें एक साधें उत्तर असें की, व्यवहारांतील अनेक प्रकारच्या दारुण आघातांनी वैतागलेल्या व पराकाष्ठेची निराशा अनावर झाल्यामुळे बधिर झालेल्या मनात असले विलक्षण कडवट विचार येणें कधी कधी शक्य आहे. हे विचार क्षणिक असतात, ते विरून जातात आणि मनांत पुन्हा कोमल भावनाचा प्रादुर्भाव होऊं शकतो. पण आघाताचा प्रभाव जेवढा जास्त आणि निराशेची तीव्रता जेवढी दारुण तेवढीच या भीषण विचारांची तीव्रता अधिक हें आपण लक्षांत ठेवले पाहिजे. अर्थात् हें सारें कवीच्या मनोवृत्तीवर अवलंबून आहे. अत्यत तीव्र निराशेचा भयंकर दारुण आघात होऊनहि कांही भावनावश कवींच्या मनात असले भीषण विचार चुकूनसुद्धा येणार नाहीत. गडकऱ्याच्या मनोवृत्तींतील विविध वैशिष्ट्याचा अभ्यास केला असतां त्यांच्या मनात असले विचार येणें अगदी शक्य आहे हे सहज दिसून येईल. त्यांची मनोवृत्तीच लोकविलक्षण होती. यामुळे गडकऱ्यांच्या भावनाचें विश्लेषण करावयाचें झालें तर तें केवळ त्याच्या काव्यांत आविष्कृत झालेल्या गोष्टींच्या साहाय्यानेच करावें लागेल. असें केलें तरच त्याच्या मनोवृत्तींत खोलवर रुजलेल्या अत्यंत परस्परविरोधी तत्त्वांचें मर्म उकलेल.

नैराश्याचा अतिरेक असह्य झाला व जीवितहि त्यायोगे असह्य झाल म्हणजे कोमल भावनावश मनातहि किती चमत्कारिक विचाराचे काहूर माजतें हे सुधाकराच्या पुढील उद्‌गारावरून दिसून येईल. या ठिकाणीं सुधाकराच्या तोंडून स्वतः गडकरीच आपल्या भावना बोलून दाखवीत आहेत असें बेलाशक समजावें.

"...मनुष्याच्या आयुष्यांत निराशेचा शेवटचा असा काल येतो कीं, ज्या वेळीं जीविताची आठवण मोहानं त्याला फसवूं शकत

नाहीं....मृत्यूच्या भयानक स्वरूपाशीं मनुष्याची दृष्टि परिचयानं एकरूप होताच, तो क्षणभंगुर जगाकडे काळाच्या क्रूरपणान पाहूं लागतो. मनुष्यहृदयातल्या सहज काव्यस्फूर्तींतही हा दृष्टींतला क्रूरपणा खेळूं लागतो. अशा वेळीं तीव्र निराशेने कडवटलेल्या मृत्यूच्या क्रूर काव्यदृष्टीनं पाहतांना सुंदर वस्तूंबद्दलसुद्धां भयाण कल्पना आठवतात. त्या दृष्टीन पहातांना, आईच्या मांडीवर समाधानानं स्तनपान करणारं मूल दिसलं कीं, ते तिथल्या तिथं मेलं तर त्या आईला काय दुःख होईल, असं चित्र अशा क्रूर कल्पनेपुढं उभं रहातं ! हळदीनं भरलेली नवी नवरी पाहताच वपनानतर ती कशी दिसेल याबद्दल कल्पना विचार करूं लागते ! " ( **एकच प्याला**, अंक १, प्र. ४ ).

या असल्या कडवटपणाच्या अतिरेकाचे 'सिनिसिझम्' मध्ये रूपातर होत असते. आणि **प्रेमसंन्यासांतील** कमलाकरांच्या तोंडीं 'सिनिसिझम्'ने ओथबलेले जे अनेक उद्गार आहेत त्यांचे मूळहि गडकऱ्याच्या स्वभावात मुरलेल्या 'सिनिसिझम्' मध्येच आहे अशी माझी खात्री झाली आहे.

> मुत्र्याच इच्छा, आशा झाल्या कोणाच्या खाक
> रागाने ही लाल जाहली का त्यांची राख ?

या गडकऱ्यांच्या कवितेंतील ओळी वर उद्धृत केल्या आहेत. या ओळींतील कल्पनेचें मूळ **प्रेमसंन्यासांतील** कमलाकराच्या पुढील उद्गारांत आढळेल.

"......पलीकडे तें स्मशान आहे. ..त्या स्मशानांतल्या प्रत्येक राखेच्या ढिगाखाली, जळून गेलेल्या प्रेताबरोबर खाक झालेल्या शेवटपर्यंत आशानिराशा यांच्या कैचीनें कातरलेल्या, सुखदुःखाच्या पेचांत पिळून निघालेल्या, हृदयांतल्या हजारों गूढांची—मनुष्यांच्या मेलेल्या आशांची जशी राख सांपडेल तशी प्रत्येक देवाच्या मूर्तीखालीं......हताश मानवी कल्पनेची राखच सांपडेल." ( **प्रेमसंन्यास**, अंक १, प्र. ५ )

कमलाकराच्या या उद्‌गारांतील विचारांचें गडकऱ्यांच्या कवितेंतील वर उद्‌धृत केलेल्या विचारांशीं तर साम्य आहेच, पण कांहीं शब्दांतहि विलक्षण साम्य आहे.

की रजनीची टिकल्यासाठीं फाडुनि कांचोळी,
जरी पुराण्यासाठीं केली तारांची होळी ?
रविकिरणाचे भाले शिरले आकाशापोटी,
रक्ताचें शिंपणें करी का जखम अशी मोठी ?

* * *

हा रक्ताचा सडा फडकवी की त्याची ख्याति ?
मृतरात्रीची चिता उषा ही अरुणामया ज्वाला ? ....

अरुण ( दुसरा ) या कवितेंतील हें वर्णन आणि रक्ताचा सडा, जखम, आग, चिता इत्यादींच्या उल्लेखांची मालिका, यांचें विलक्षण साम्य मागे उल्लेखिलेल्या कमलाकराच्या स्वगत भाषणात आढळेल. वर्षाकालीन संध्या-समयाचें हें कमलाकराने वर्णिलेलें ' सौंदर्य ' पाहा.

"या वर्षाकालीन सध्यासमयाची किती भीषणरमणीय शोभा ही ! गगनमार्ग चालण्याच्या श्रमानें उरी फुटल्यामुळें सूर्यानें रक्ताची गुळणी टाकून नुकताच प्राण सोडिला आहे; रक्तानें भरलेल्या या त्याच्या मृत्युशय्येवर हा सोसाट्याचा वारा ढगाचा शेणगोळा फिर-वीत आहे! इकडे मरतां मरता सूर्यानें मारलेल्या हृदयभेदक भाल्यानीं झालेली इंद्रधनुष्याची जखम ( या कल्पनेशीं वर उद्‌धृत केलेल्या " रविकिरणांचे भाले...जखम अशी मोठी " या ओळींतील कल्प-नेचें केवढें विलक्षण साम्य आहे ! ) अजून पुरतीशी भरून आली नाहीं म्हणून हे कृष्णमेघ थोडे अश्रु गाळीत आहेत. दक्षिणेकडे एकटाच चमकणारा हा अगस्तीचा तारा मृत्युशय्येजवळच्या दक्षिणमुखी समयीची साक्ष पटवीत आहे !......अंधार, भयाण अंधार ! या भयाण पार्श्वभूमीवर भयानक मृत्यूचें उग्र चित्रच खेळा-वयास पाहिजे ! " ( अंक ३, प्र. ५ )

नैराश्याची तीव्रता असह्य झाल्यामुळे जो विलक्षण कडवटपणा रक्तांत भिनतो असें सुधाकर म्हणतो त्याच प्रकारचा भीषण कडवटपणा गडकऱ्यानी आपल्या आयुष्याच्या अगदी शेवटीं शेवटीं लिहिलेल्या अनेक गीतांत—विशेषत: १९१६–१९१७ या दोन वर्षांत लिहिलेल्या निराश प्रेमाची व्यथा प्रकट करणाऱ्या प्रेमगीतांत—आविष्कृत झाला आहे. गडकऱ्यांच्या प्रणयनैराश्यांतील या अतिरिक्त कडवटपणाचें मर्म समजावून घेतां यावें या साठी ही पूर्वतयारी करावी लागली.

भीषणतेच्या व भयानकपणाच्या आसक्तीच्या जोडीला काळोखाचीहि विलक्षण आसक्ति गडकऱ्याच्या अनेक कवितांतून अगदी स्पष्टपणें प्रकट झाली आहे. या दोन्ही गोष्टींची जात एकच आहे. घुबडास व स्मशानांतलें गाणें या कवितांत सर्वत्र भयाण काळोखाचें भीषण थैमान आहे. घुबडाचें गाणें काळोखावर लिहिलेलें आहे, काळोखावर सोसाट्याचा वारा घुमत आहे, कवीनेहि 'काळोखाची राख' फासली आहे—जिकडे तिकडे भयाण, घोर अंधार दाटलेला आहे.

वरती नभ हें खाया पाही,
खाली काळ्याकभिन्न राई,
काळोखाच्या भकास खाई,
सळसळुनी काळोख उकळतो, पवनहि लागे झिंगूं !
तेजाची गंगाच आटली,
काळोखाची प्रभा दाटली,
भयानकाची सभा थाटली .. ...

दाट काळोखाचें हें भीषण थैमान 'कलगीचें गाणें' या कवितेंतहि चालू आहे. काळोखाखेरीज दुसरें कांही नाही.

मेघांच्या छायेसरसें
काळोखाचें राज्य दिसे;
दाट तमाच्या तेजांत
नाहिंपणाचा गिरि दिसत;
काळोखाच्या किरणांचे
कांटे खुपती मग साचे......

रात्रीस ओरडणाऱ्या घुबडास—या कवितेचें शीर्षकच तिच्यांत काळोखाचें तांडव सुरू आहे हे सुचवीत आहे.

आधीच भीषण निशा, तम त्यात घोर.

असल्या भयाण पार्श्वभूमीवर घुबडाचे घोर ओरडणे कवीला आकर्षक वाटत आहे!

भीषण काळोखांतील भयानक एतान्तांत रमणाऱ्या माणसाच्या वृत्तींत एकंदर मानवी जीवनाविषयींच कडवटपणा निर्माण न झाला तरच आश्चर्य. या कडवटपणाने गडकऱ्याच्या मनावर केवढा विलक्षण पगडा बसविला होता हें मागे विस्ताराने स्पष्ट केलेंच आहे. या कडवटपणाचा अतिरेक झाला म्हणजे मरणाची ओढ लागणें स्वाभाविकच होय. गडकऱ्यांना मरणाच्या कल्पनेची काहीतरी विचित्र ओढ लागलेली होती याचें प्रत्यंतर त्यांच्या कवितांत व नाटकात अनेक ठिकाणीं येईल. 'ये काळा, ध्यान तुझें मात्र लागलें' या 'बालकवीं'च्या प्रसिद्ध ओळींत प्रकट झालेली मृत्यूची विचित्र आसक्ति गडकऱ्याच्याहि ठायीं दिसत आहे. घुबडाच्या गाण्यात रमून जाणाऱ्या व स्मशानांतल्या भीषण काळोखांत उल्लसित होणाऱ्या मनाला मरणाविषयीं इतकी आपुलकी वाटली तर तें स्वाभाविक असेंच नाही काय? कलगीचें गाणें या कवितेंत गडकरी म्हणतात—

सर्वांगी त विष भिनलें,<br>
सुख मरणाचे सापडलें,<br>
ऐकत असता मी मेलों,<br>
प्रेतावरि माझ्या बसलों!<br>
भान न साचे–आजउद्याचें–मग–आताचें<br>
दिवस वाटले जायाचे<br>
प्रेताच्या आयुष्याचे!

'......मृत्यूनेंच जगाला मनोहर केलें आहे! मरणामुळेंच माणसाला मोल येतें' असें म्हणून पुण्यप्रभावातील कालिंदी भाग्यशाली मरणाचें चित्र पुढीलप्रमाणें रंगवीत आहे.

"......प्रेमाच्या निशेंत गुंगलेल्या जीवाला सुखाच्या सागरांत पोहण्याइतकी .जाणीव नसते. सुखसागरात बुडून जीव कोंडून मरण्यांतच प्रेमाचा शेवट व्हायला पाहिजे. प्रेमाच्या जहरी निशेनें बेभान, बेहोष होऊन, चढत्या लहरींनीं सर्वांग थरारून निघत असताना, डोळ्यावर धुंदीची झापड पडली असताना, अगदीं श्वासोच्छ्वास करण्याचाही विसर पडून हा जीव ठायींच्या ठायीं विरून गेला तर आणखी काय पाहिजे ? "

प्रेमातील उन्मादक सौख्यातिरेकाचा शेवट मृत्यूतच झाला पाहिजे हा विचार भूपालानेंहि प्रकट केला आहे.

" एकएकदा जिज्ञासाबुद्धि इतक्या आतुर तीव्रतेने बळावते, कीं मला आत्महत्या करण्याची अनावर प्रवृत्ति होते! ज्ञानपूर्तिविरहित जीवन जड वाटून, मरणाबद्दल अनिवार उत्कठा वाटते! "

इतकेंच म्हणून भूपाल थांबत नाही. तो पुढे म्हणतो—

" चेतनापूर्ण जीवनाचे उदात्त मरणात पर्यवसान होतें त्याप्रमाणें सुखविचाराचा शेवटहि करुणनिराश विषादात झाल्यास तें सरळच आहे. "

मरणाच्या कल्पनाचित्राकडे 'आशाळभूतपणानें' पाहण्याची भूपालाची वृत्तीच झाली आहे. पण हे मरणाचें कल्पनाचित्र मोहक आहे हें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे.

मृत्यूचें जें कल्पनाचित्र भूपालाला दिसत आहे त्यांत व सुधाकराला दिसणाऱ्या मृत्यूच्या कल्पनाचित्रात फार फरक आहे. सुखाचा अतिरेक झाला असतां त्या प्रकर्षाच्या क्षणीं शरीरांतील अणू भराभर विरून जाऊन जीव ठायींच्या ठायीं विरून गेला तर भूपालाच्या दृष्टीने तें अत्यंत भाग्याचें मोहक मरण होय. ( कालिंदीलाहि असेंच मोहक मरण हवें आहे ! ) परंतु सुधाकर मात्र असह्य यातनांतून मुक्त करणारा मित्र याच दृष्टीने मृत्यूकडे

पाहत आहे. असंख्य व्यथांचा शेवट निदान मृत्यूने तरी होईल या केविल-वाण्या आशेने सुधाकर मृत्यूची उत्कंठेने वाट बघत आहे.

गडकऱ्यांनी १९१६ मध्ये निराश प्रेमाच्या व्यथा व्यक्त करणारीं जीं गीतें लिहिलीं त्यांमध्ये अनेक ठिकाणीं मृत्यूचें आवाहन आढळेल.मरणा-विषयींची आतुर उत्कंठा गडकऱ्यांच्या मनांत कितीतरी दिवस घोळत होती हें लक्षात घेतलें असतां प्रणयभंगाच्या दारुण वेदनाचा कायमचा शेवट करण्या-साठी मृत्यूला त्यांनी पाचारण केलें असलें तर तें त्यांच्या मनोवृत्तींतील वैशिष्ट्यांना अनुसरून झालें असेंच म्हणावें लागेल !

---

# ९. अज्ञेयाच्या महाद्वाराशीं

.. and heard great Argument
About it and about but evermore
Came out by the same Door as in I went
— *Omar Khayyam*

स्मशानातील भीषण एकान्ताची व भयानक काळोखाची विचित्र आसक्ति, घुबडाच्या भेसूर गाण्यांत रमणारी वृत्ति, करुणपूर्ण विषाद बळावल्यामुळे लागलेली मरणाची अनावर ओढ इत्यादि गोष्टी अतिरिक्त भावनाप्राधान्याच्या द्योतक असल्या तरी यांतून निर्माण होणाऱ्या वृत्तीच्या कडवटपणातूनच विचारप्रवणतेचा, किंबहुना, शुष्क बुद्धिवादाचाहि उगम होत असतो, व तो प्रसगीं भावनांच्या उद्वेगावर मात करूं शकतो. बुद्धिवाद व भावना यांच्यामधील कलह गडकऱ्यांच्या मनात नेहमीच चाललेला होता; कांही वेळां हा विलक्षण कलह पराकोटीला पोचलेलाहि दिसून येतो. गडकऱ्याना तीव्र बुद्धिमत्तेची जोड मिळालेली होती. या बुद्धिमत्तेचें स्वरूप मागे (पृ. ६८–६९) विस्ताराने स्पष्ट केलेच आहे. पण गडकऱ्याची बुद्धि तीव्र असली तरी ते काही कोणी तत्त्वज्ञ खास नव्हते. त्याची मनोवृत्ति तत्त्वज्ञाची नव्हती, ती कवीची मनोवृत्ति होती; आणि भावनाप्राधान्य हा तिचा प्राण होता. शिवाय जी अल्प हयात गडकऱ्यांना लाभली त्या हयातींत तत्त्वज्ञान परिपक्व होणें शक्यच नव्हतें. एखादा मनुष्य एवढ्या अल्प हयातींत सुद्धा खरा तत्त्वज्ञानी बनूं शकेल, नाही असें नाही. पण गडकऱ्यांची वृत्तीच या गोष्टीला अनुकूल नव्हती. गडकरी पराकाष्ठेचे बुद्धिमान् व

कल्पक होते याविषयीं वाद असणेंच शक्य नाही. पण गडकऱ्यांची ही प्रकर्षाला पोचलेली बुद्धिमत्ता व कल्पकता म्हणजे तत्त्वज्ञाची बुद्धिमत्ता खास नव्हे. ती कवीची कल्पक बुद्धि आहे. गडकरी प्रतिभाशाली कवि असले व आपल्या या कल्पक बुद्धीचा विलास त्यांनी पदोपदीं दाखविला आहे हें खरें असलें तरी ते खऱ्या अर्थाने बुद्धिवादी ( intellectual ) होते, किंवा तत्त्वज्ञ ( thinker ) होते असे म्हणण्याचे धाडस कोणालाहि करवणार नाही. आत्यंतिक भावनाप्राधान्याचा स्वैर विलास दाखविणें, व उन्मत्त कल्पनाशक्तीच्या साहाय्याने आकर्षक कल्पनाचित्राची पखरण करणे हाच त्यांच्या प्रतिभेचा खरा प्रांत होय. असें असले तरी, मधून मधून बुद्धिवादाची लहर त्याना येत असते, आणि अशा वेळीं आपण बुद्धिवादी तत्त्वज्ञाची भूमिका पतकरली आहे असा भासहि ते कौशल्याने निर्माण करू शकतात.

पण या बुद्धिवादात त्याचे मन खऱ्या अर्थाने रमत नसावें असें दिसतें. बुद्धीला भावनाची जोड मिळाली तरच ती स्पृहणीय ठरते असें त्याचें मत होतें याला पुरावे आहेत. **पुण्यप्रभावाच्या** पाचव्या अंकातील चवथ्या प्रवेशात भूपालाच्या तोंडीं जे उद्‍गार गडकऱ्यानी घातले आहेत ते या दृष्टीने फार महत्त्वाचे आहेत. भूपाल म्हणतो—

> " शुष्क बुद्धिवादानें जग चालणार नाहीं ! भावनांच्या रसरंगात बुद्धीचें तेज मिसळलें तरच हृदयाचे समाधान होते ! तेजाला रसाची जोड देण्यासाठीं, मानवी करामतीने कारंजाच्या जलधारांतून दीपकिरणें खेळविलीं आहेत ! बुद्धितेजाचा हृदयरसाशीं प्रीतिसंगम पाहण्याची हौस पुरविण्यासाठीं, मानवी कल्पनेनें तेजोमय चंद्रकांताला शीतळ पाझर फोडिलेले आहेत ! "

भूपालाच्या ' तत्त्वज्ञानी ' मनांत चाललेले हे विचार आहेत हें लक्षांत ठेवलें पाहिजे. तत्त्वज्ञानी भूपालाचेंहि ' शुष्क बुद्धिवादानें ' समाधान होऊं शकत नाही. त्याला भावना व बुद्धि याचा ' प्रीतिसंगम ' पाहिजे आहे. कांही गोष्टी ' बुद्धिप्रधान मस्तकाचें समाधान ' करूं

शकत नसल्या तरी त्या ‘भावपूर्ण हृदयाला’ पटत असतात अशी कबुली स्वतः गडकऱ्यानीच **मुरली** या कवितेच्या प्रास्ताविक टीपेंत दिलेली आहे स्वत: गडकरीच येणेंप्रमाणें वस्तुनिष्ठ तत्त्वज्ञानाच्या, शुष्क बुद्धिवादाच्या, भावनाशून्य तर्ककठोरतेच्या प्रभावाविषयीं साशंक आहेत. किंबहुना भावनाचा उद्रेक झाला असता बुद्धीचा प्रभाव अगदी उपेक्षणीय ठरतो असेंहि त्याना वाटत असावे. ‘तत्त्वज्ञानी’ भूपालाच्या तोंडीं असलेले एक वाक्य या दृष्टीने फार सूचक आहे.

> “ त्या निशेच्या गोड धुर्दींत, हृदय उसळत्या रक्ताच्या खळखळाटात (म्हणजे भावनांच्या अतिरेकांत) बुद्धीला बुडवीत असल्यामुळें तिची बडबड होडीच्या दोहो बाजूस मोडत्या लाटांवर चाललेल्या जलतरगाच्या मर्मर ध्वनीप्रमाणे मधुर वाटत आहे.”
> (अंक २, प्र. २)

शुष्क, भावनाशून्य, कठोर बुद्धिवादाने भावनांवर मात करावी हें भूपालालाहि मान्य नाही असें त्याच्या याच प्रवेशातील एका वाक्यावरून वाटतें.

> “ वाढत्या विचाराच्या हातघाईत, निर्दय बुद्धिवादाच्या आघातानी प्रेमळ श्रद्धेच्या हृदयाचीं शतशः शकले होतात.”

याच प्रकारची तक्रार **मुरली** या प्रसिद्ध कवितेच्या प्रस्तावनेंतहि गडकऱ्यानी केलेली आहे.

पण निर्दय, शुष्क बुद्धिवाद गडकऱ्याना नको असला तरी बुद्धीच्या साहाय्याने ज्ञान प्राप्त करून घेण्याची लालसा मात्र त्यांच्या ठायीं प्रबळ आहे. हें ज्ञान कशासाठी मिळवावयाचें ? अज्ञेयाचें मर्म उकलता यावें, ज्ञाताच्या पलीकडे असलेल्या अज्ञाताच्या अफाट प्रदेशांतील गूढें उकलतां यावींत यासाठी ज्ञानाची आवश्यकता आहे. अज्ञेयाचें गूढ मानवी प्रज्ञेला सर्वस्वीं उकलतां आलें नाही तरी जिज्ञासा त्यामुळे कमी होऊं शकत नाही; उलट ती बळावत जाते. भूपाल म्हणतो—

" अज्ञेयाच्या भव्य महाद्वाराशीं आथडणारी कल्पना, हताश वृत्तीनें कपाळमोक्ष करून घ्यावयालाही तयार होते. एकएकदा जिज्ञासाबुद्धि इतक्या आतुर तीव्रतेनें बळावते, कीं मला आत्महत्या करण्याची अनावर प्रवृत्ति होते! ज्ञानपूर्तीविरहित जीवन जड वाटून मरणाबद्दल अनिवार उत्कंठा वाटते!" (अक २, प्र. २ ).

तात्पर्य, अज्ञेयाचे गूढ उकलण्यासाठी विलक्षण धडपडणारी ही जिज्ञासा आहे. खऱ्या, यथार्थ ज्ञानाच्या अभावीं हें गूढ मानवी बुद्धीला उकलतां येणें शक्य नाही; आणि तें ज्ञान प्राप्त होणें ही तर कांही सामान्य गोष्ट नव्हे. आणि यामुळे, अज्ञेयाचें गूढ उकलण्याची तळमळ अनावर झाल्यामुळे, मरणाचें मोल देऊन का होईना, ते ज्ञान प्राप्त करून घ्यावें असेंहि भूपालाला वाटत आहे. ज्या ज्ञानाच्या साहाय्याने अज्ञेयाचें मर्म जाणून घ्यावयाचें ते ज्ञान जर या मर्त्य जीवनात— अनेक बंधनांनी व मर्यादानी जखडलेल्या या मर्त्य जीवनात— जर दुष्प्राप असेल तर देहाचीं हीं बंधनें दूर झाल्यावर, या शृंखला तुटल्यावर तरी तें ज्ञान प्राप्त होईल अशी आशा त्याला वाटत आहे. भूपालाचे हे उद्‌गार पाहा.

" ......थंड पाण्याच्या स्नानाने बुद्धीचे कण एकामागून एक सावध होत असताना, शरीराचे अणु भराभर विरत जावे! त्या वेळीं होडी अथाग सागराच्या तळाशीं जाण्यापूर्वींच आम्हीं अज्ञेयाच्या मुळाशीं जाऊन पोहोंचूं आणि मरणाच्या मोलानें मिळविलेल्या पूर्ण ज्ञानात रगून जाऊ." ( अक २, प्र. २)

अशा किती तरी गोष्टी या मानवी जीवनाच्या पलीकडे आहेत की, त्यांचे ज्ञान आपल्या मर्यादित बुद्धीला होणेंच शक्य नाहीं. काही गोष्टी अज्ञात राहणार, अज्ञेय राहणार. भविष्यकाळ, भवितव्यता, परमेश्वरी इच्छा या गोष्टी आपल्या आकलनाच्या सर्वस्वीं पलीकडे आहेत. किंबहुना या बाबतींतील अज्ञान हेंच मानवी जीवनाचें वैशिष्ट्य आहे असेंहि गडकऱ्याना सुचवावयाचें आहे. " भविष्याचें अज्ञान हेंच सृष्टीच्या संसाराचें सार्वत्रिक सूत्र आहे" असे भूपाल म्हणतो. मानवी आशा व इच्छा, आणि

भवितव्यता, किंवा परमेश्वरी इच्छा, यांच्यामध्ये अनेक वेळां विरोधच असतो व या कलहात अखेर भवितव्यताच बलवत्तर ठरते. ही गोष्ट भूपालाच्या पुढील उद्गारांवरून स्पष्ट होईल. "भावि संसाररचना करण्याचे विधात्याचे हक्क आपल्याकडे घेऊन, आम्ही सदिच्छेनें आणि भाबड्या आशेनें जेव्हां शक्यतेच्या भुसभुशीत वाळूवर मनाचे मनोरे उभारूं लागतों तेव्हां काळ-पुरुष आमच्या पाठीमागें उभा राहून निर्दय विनोदानें हंसत असतो."

विश्वाचे नियमन करणाऱ्या भवितव्यतेचें, अथवा परमेश्वरी शक्तीचें महत्त्व भूपालाने आणखी एकदा वर्णिलें आहे. आकाशांतील तारकेला उद्देशून तो म्हणतो—

> "वेडे, अवाढव्य आकाशाच्या मैदानातही तुला तरी आंखलेल्या रेषामात्र मार्गापासून जरासें इकडे तिकडे सरकतां येतें आहे का ! ...टीचभर जागेंत कोंबलेला भूपाल काय आणि अनत अंतराळात खिळलेली तारका काय– पूर्वसंचिताने दोघानाही सारखेंच जखडून ठेविलेलें आहे." (अंक ३, प्र. १)

ईश्वराच्या तोंडींहि याच आशयाचें तत्त्वज्ञान गडकऱ्यानी घातलें आहे.

> "परिस्थितीच्या पटांगणांत मानवी मनोरथाना कल्पनेच्या वेगानें फिरविताना आम्ही विश्वाचें नियमन करणाऱ्या अदृश्य शक्तीला जमेस धरीत नाहीं म्हणूनच आमच्या स्वैरसचाराला वेळोवेळीं आघा-तांचे अडथळे होतात." (अंक १, प्र. १)

मानवी इच्छा व भवितव्यता यांच्या या कलहात कधी कधी मानवी इच्छांना साफल्याचें भाग्य लाभतें. असें भाग्य जर लाभलें नसतें तर ईश्वर म्हणतो त्याप्रमाणे, 'जग म्हणजे वैतागलेल्या बैराग्याची एक मोठी थोरली धर्मशाळा झाली असती.' (अंक १, प्र. १) पण संसार अफाट आहे, विशाल आहे, आणि या अफाट ससारात वावरणाऱ्या मानवांचें जीवन तर अगदीच क्षुद्र आहे. शिवाय हा साराच ससार क्षणभंगुर, विनाशी व अत्यत अस्थिर आहे. तथापि या क्षणभंगुरतेमुळेच ससाराला खरी शोभा आलेली आहे. "संसाराची ही क्षणभंगुरता समाधानकाळींसुद्धां

कष्टदायिनी होते" अशी भूपाल तक्रार करीत असला तरी साऱ्याच गोष्टी अविनाशी व शाश्वत झाल्या तर त्यांत गोडी ती काय राहिली ! सारेंच क्षणभंगुर असल्यामुळे मानवी जीवनांतील प्रत्येक गोष्टच अस्थिर आहे; मानवी सुखहि क्षणभंगुर आहे. या क्षणभंगुरतेचें भूपालाला वाईट वाटत आहे. "सुखाच्या प्राप्तीनें इच्छेची तृप्ति होते; पण त्या सुखाच्या अक्षयतेसाठी पुन्हा नवी इच्छा भविष्यत्कालाकडे केविलवाण्या आशेनें पाहूं लागते. तृप्तीला इच्छेच्या उत्तरक्रियेचें अमंगल रूप मिळतें ! एका इच्छेच्या मरणांतून दुसरीचें जनन होऊन त्याची परपरा आजन्म चालूं राहते." भूपालाच्या म्हणण्यांत तथ्य असले आणि मानवी ससाराच्या क्षणभगुरतेच्या विचाराने चित्ताला खिन्नता येत असली तरी त्या क्षणभंगुरतेमुळे मानवी जीवन विशेषच रमणीय झालें आहे हेंहि खोटें नाही. वस्तुनाशाची भीति नसती तर आपली उत्सुकता ताबडतोब कमी झाली असती. मानवी जीवनांतील प्रत्येक गोष्ट अगदी अशाश्वत, क्षणभगुर आहे हें कटु सत्य चांगले माहीत असताहि त्या जीवनाविषयीं आपल्याला इतकी विलक्षण आस्था वाटत असते, प्रत्येक स्पृहणीय गोष्ट आपण अनावर उत्सुकतेने कवळीत असतों यांतील मर्म हेंच होय. कालिंदीचे पुढील उद्गार याच आशयाचे द्योतक आहेत.

> "चिरजीवनात सुख नाही; मृत्यूनेंच जगाला मनोहर केले आहे ! मरणामुळेच माणसाला मोल येतें. प्रेमाला मरणाचे भय नसेल तर त्याबद्दल सभय उत्कंठा कधींच वाटणार नाहीं ! नाशाच्या भीतीमुळें सुखाबद्दल सारखी गोड हुरहुर वाटत असते, संसाराची सारी गोडी नश्वरतेत—अगदीं अविश्वासी क्षणभंगुरतेंतच आहे ! प्रेमांत अमृता-सारखें नीरस, एकरूप चिरंजीवन असेल तर त्याच्या स्पर्शानें हृदयाची भित्री धडपड एकदम बद पडेल, दृष्टींतून करुणमुद्रेची आशा नाहींशी होईल". ( अंक १, प्र. २ )

आशेची ही भित्री, धडधडती हुरहूर नष्ट झाल्यावर मग मानवी जीवनात काहीच स्पृहणीय उरणार नाही असें कालिंदीला सुचवायाचें आहे.

गडकऱ्यांच्या ‘ तत्त्वज्ञाना ’ चें हें असें स्वरूप आहे. विश्वाचें नियमन करणाऱ्या अदृश्य शक्तीचें—भवितव्यतेचें—अफाट सामर्थ्य, या सामर्थ्या-पुढे मानवी कर्तृत्वाचा व पराक्रमाचा दुबळेपणा, ससाराची क्षणभगुरता, या क्षणभंगुरतेमुळेच संसाराला प्राप्त झालेली शोभा ‘ ज्ञाताच्या कुंपणा– ’ पलीकडे असलेल्या अज्ञेयाच्या अफाट, अधुक प्रदेशातील अनाकलनीय गूढांचें मर्म उकलण्याची तीव्र धडपड करणारी मानवी जिज्ञासा, व हें मर्म उकलणें शक्य व्हावें म्हणून यथार्थ ज्ञानाच्या प्राप्तीची अनावर ओढ, आणि तें मिळणें आपल्या मर्यादित सामर्थ्यामुळे अशक्य असेल तर मृत्यूचें मोल देऊनहि ते मिळविण्याची दुर्दम्य लालसा—हे गडकऱ्याच्या तत्त्वज्ञानाचें सार आहे.

पुण्यप्रभाव नाटकात गडकऱ्यानी माडलेले हे तत्त्वज्ञान इतक्या सुगम पद्धतीने माडले आहे की त्यात अनाकलनीय व व दुर्बोध असे कांहीहि नाही. क्वचित् एखादे वाक्य जरा क्लिष्ट असले तरी त्याच्या तत्त्वज्ञानाचें एकंदर स्वरूप समजावून घेणें त्यामुळे अवघड होत नाही. पण गद्याचें क्षेत्र सोडून हेच तत्त्वज्ञान पद्याच्या क्षेत्रात अवतीर्ण झाले म्हणजे ते दुर्बोध व अनाकलनीय कसे होते, किंबहुना अज्ञेयाच्या ज्या गूढाचा शोध लावण्या-साठी तें प्रवृत्त झालेलें आहे त्या गूढापेक्षाहि ते अधिक अनाकलनीय कसें होतें, हें पाहावयाचें असेल तर गडकऱ्याच्या काही ‘ गूढ ’ कविता अवश्य वाचाव्या. कलगीचें गाणें व फुटकी तपेली या दोन कविता याचीं उत्कृष्ट उदाहरणें आहेत.

संसाराची क्षणभंगुरता, जगाची उफराटी तऱ्हा, जगाचा स्वार्थीपणा, ठराविकपणाचा तिरस्कार, सारे बंध तोडून स्वतंत्र विशाल वातावरणांत विहार करण्याची लालसा, काळोखाच्या भयाण आवरणापलीकडे दडलेल्या प्रकाशाचा–अज्ञेयाचा–साक्षात्कार करून घेण्याची धडपड, काळोखातूनच प्रकाश प्राप्त होईल हा आशावाद, हें घुबडास या दीर्घ कवितेंतील गूढ-वादाचें सार आहे. मानवी जग हें अत्यंत क्षणभंगुर आहे व मृत्यु हा त्याचा शेवट आहे.

मातींत मिसळुनि झाली माती ..

असल्या या क्षणभंगुर जीवनांत

शंख कुणाचा पोटापाठीं
गात कुणी तर तिसऱ्यासाठीं !
छाया जीवाची उफराटी· ..

अशी जगाची सदा उफराटी रीत दृष्टीस पडते.

असल्या या विचित्र जगाला रामराम ठोकून काळोखांतील एकान्तांत आपल्या मनातील सारी हुरहूर, सारी निराशा, सारी उदासीनता आविष्कृत केलेली बरी; आणि हे करीत असतां घुबडाचे भेसूर 'पिशाचगान' आपल्याला चागली साथ करील असें कवीला वाटतें.

मनात माझ्या जी हुरहूर
जनात काढित तीचा सूर,
साथ मला करि

क्षणभंगुर जगाची फसवी संगत सोडून देऊन सारें विसरावें व घुबडाप्रमाणें निःसंग व्हावें, 'फकीर' व्हावें, असा कवीला मोह होत आहे. घुबड हाच आपला या निःसगपणाच्या बाबतींत खरा गुरु होय असें त्याला वाटतें.

शिष्य तुझा मी झालो म्हणुनी,
निःसंगाची संगत धरुनी,
काळोखाची राख फासुनी
साग तुझा गुरुमत्र मला तो .

घुबडाचें गाणें कमालीचें भेसूर असताना सुद्धा ते आतुर कानांनी ऐकावें अशी तळमळ ज्याअर्थी आपल्याला लागलेली आहे त्याअर्थी काळजाला अगदीं भिडणारे असें काही तरी त्यात असलेंच पाहिजे अशी कवीची खात्री झाली आहे. या भेसूर गाण्याने घोरणाऱ्या जगाची झोप भंगेल. जगाला काळोखांत कांही दिसत नसलें तरी घुबडाला मात्र दिसतें. त्याची दृष्टि 'तमोभेदिनी'—अंधारांतून पलीकडचे पाहणारी—आहे. ही तमोभेदिनी दृष्टि आपल्यालाहि प्राप्त झाली तर आपल्यालाहि काळोखाच्या

पलीकडे दडलेल्या अज्ञेयाचें मर्म उकलतां येईल अशी कवीला आशा वाटत आहे. शिवाय, काळोख दाटला असता बाह्य जगांतील इतर कोणतीहि गोष्ट दिसणेच शक्य नसल्यामुळे त्या काळोखात चांगलें ' आत्म-निरीक्षण ' करता येईल हाहि काही लहान फायदा नाही. असें आत्मनिरीक्षण पूर्ण झाल्यावर जो आत्मविश्वास जागृत होईल त्याच्यामुळे

अहपणाच्या गाऊ गाना,
मुक्त्या मनाच्या उघड्या ताना,
स्वानुभवानें हलवू माना,
ठराविकाला लाथ मारुनी नभासही उल्लधू !

ठराविकाला अशा रीतीने लाथ मारल्यावर, सारीं क्षुद्र बंधनें तोडून टाकल्यावर, त्या दाट काळोखातहि तेजाचे काही कण प्रकाशतांना दिसतील, त्या काळोखापलीकडे असलेल्या अफाट अज्ञेयाचे मर्म उकलेल.

ऐकुनि तव हें शांतरसाचे,
काळे गाणे करुणरसाचें,
उफळतील कण काळोखाचे,
प्रकाशबीजे गूढ लागतिल फुलुनी स्वैर तरगू !

*　　*　　*

फुक आपले भयाण शिंग,
काळोखाचे फोडुनि भिंग,
अज्ञेयाचें उकली बिंग

अज्ञेयाचें कोडे एकदा उकलल्यावर मग या क्षुद्र मानवी जगताची पर्वा काय ? सारें जग लाथाडता येईल. अज्ञाताच्या घनदाट काळोखातून ज्ञानाच्या प्रकाशाचें विश्व उजळेल, ' काळोखातील अज्ञेयाचा ' असख्य गूढांनी ओतप्रोत भरलेला प्रदेश दृष्टिगोचर होईल. थोडक्यात, विश्वाचे कोडें उलगडेल. हें ज्ञान प्राप्त करून घेण्यासाठी कवीचा जीव झुरत आहे.

**फुटकी तपेली** ही गडकऱ्यांची आणखी एक गूढवादी कविता १९१५ जुलैच्या **मनोरंजनांत** प्रसिद्ध झाली. अनततेची, विशाल जीवनाची, ज्ञाताच्या पलीकडे असलेल्या अफाट, अज्ञात विश्वाची तहान

ज्याला लागली आहे त्याला पूर्ण ज्ञानाची जोड मिळाली तर अज्ञेयाचें मर्म त्याला उकलतां येईल. अर्धवट ज्ञान, अपूर्ण ज्ञान, किंवा प्रामादिक ज्ञान त्याचे ईप्सित कधीच साध्य करून देणार नाही. अज्ञान जितकें धोक्याचें, तितकेंच अर्धवट किंवा प्रामादिक ज्ञानहि धोक्याचें असतें. किंबहुना अज्ञानापेक्षाहि अर्धवट ज्ञान अधिक वाईट असें म्हणावयास हरकत नाहीं. 'फुटकी तपेली' हे अपूर्ण ज्ञानाचें प्रतीक आहे असें समजावें. ज्या पाण्याची जीवाला तहान लागलेली आहे तें पाणी म्हणजे ज्ञातापलीकडे असलेल्या अनततेत, अज्ञेयाच्या अफाट विश्वात, कोंदून भरलेल्या असंख्य गूढाचें आकलन. 'अनंततेची तहान' भागविण्यासाठी साधन म्हणून जें ज्ञान प्राप्त व्हावयास पाहिजे ते पूर्ण व यथार्थच असलें पाहिजे. अज्ञान किंवा अपूर्ण ज्ञान उपयोगीं पडावयाचे नाही. अनंततेची तहान फुटक्या तपेलींतील सतत गळून जात असलेल्या पाण्याने कशी भागविता येणार ? अर्धवट ज्ञानाच्या जोरावर विशाल अज्ञेयातील गूढाचे मर्म शोधून काढण्याचा हव्यास बाळगणे ही शुद्ध थट्टाच नाही का ? आपले हें मानवी जगत् म्हणजे अनंत, विशाल विश्वांच्या समुदायांतील एक क्षुद्र व उपेक्षणीय अणु होय. सर जेम्स जीन्सच्या भाषेंत बोलावयाचे म्हणजे हे 'mysterious universe' आहे. त्याला आदि नाही व त्याला अंत नाही. तें अनतापलीकडचें अनत होय. या असल्या अनत, विशाल विश्वातील गूढांचे आकलन करून घेणें हे जर मानवी जीवनाचें परमोच्च ध्येय असेल तर ते ध्येय प्राप्त करून घेण्यासाठी अत्युच्च, पूर्ण ज्ञानच आवश्यक आहे. याच्या अभावीं, पूर्ण व यथार्थ ज्ञानाच्या अभावीं, 'मी, मी' म्हणवणाऱ्या अनेक अहंमन्य व पंडितंमन्य लोकांना ध्येयाच्या अर्ध्या वाटेवर जाऊन निराश होऊन परत फिरावें लागले आहे. आपला अहंभाव मात्र साऱ्या जगताला व्यापून राहाणारा आहे, 'माझें मीपण फारच मोठें' आहे, असे कवि अतिरिक्त आत्मविश्वासाने म्हणत आहे. 'अपुल्यामध्ये विश्व' पाहणाऱ्या केशवसुतांची आठवण होईल अशीच गडकऱ्यांची ही उक्ति आहे. या विशाल, सर्वव्यापी मीपणामुळे

मज जाणाया मीच [illegible]

असें म्हणणें त्यांना भाग पडलें आहे. हें आत्मज्ञान, यथार्थ आत्मज्ञान आहे. या आत्मज्ञानावाचून अनंततेचें यथार्थ ज्ञान कसें होणार ? या आत्म-ज्ञानाचा प्रकार साराच विलक्षण !

नसते परके आधिं जाणतां,
असत्या मलाच न परी बघतो
मज ओळखता इतर विसरतो ..

'नसते परके' म्हणजे आभासात्मक बाह्य जगत् ( appearance ); 'असत्या मलाच' म्हणजे सत्तत्त्वाला, परमात्म्याला ( reality ला ); 'मज ओळखता इतर विसरतो' म्हणजे या सत्तत्त्वाची, आत्मतत्त्वाची ओळख पटली; आत्मज्ञान झालें म्हणजे 'इतर' म्हणजे आभासात्मक दृश्य जगत् उपेक्षणीय ठरते. हा तर निर्भेळ वेदान्त ( metaphysics ) झाला !

तात्पर्य असे की, अनंततेचें, सत्तत्त्वाचें यथार्थ ज्ञान व्हावयाचें असेल तर शुद्ध व पूर्ण ज्ञानाची अपेक्षा आहे. या ज्ञानाला पार नाही. ज्ञानाचा व्याप जों जो वाढत जातो तो तो अनंततेची विशालताहि अधिक व्यापक होत जाते. या ज्ञानाची अंतिम सीमा गाठता आली तरच आतुर जिज्ञासा पूर्ण होईल, एरवीं नाही. हें अंतिम ध्येय गांठणें हे जर मानवी जीवनाचें सारसर्वस्व असेल तर तें ध्येय सफळ होण्यासाठी अपूर्ण ज्ञानाचा, 'फुटक्या तपेलीचा' काय उपयोग ? ज्या तपेलींत भरलेलें पाणी हां हां म्हणता झिर-पून जातें त्या तपेलीचा काय उपयोग ? अर्धवट ज्ञानाच्या योगें जे सत्य गवसलें असें माणसाला वाटतें तें सत्य नसून सत्याचा तो केवळ भास असतो, तें 'मृगजळ' असतें. या आभासात्मक मृगजळांत बुडण्याचें मात्र अपूर्ण ज्ञानामुळे नशिबीं येतें.

मृगजळ प्याया आत उतरतों,
अफाट तरि मी त्यातच बुडतों
नसत्यामाजीं असता जिरतो ....

म्हणून कवीला ही 'फुटकी तपेली' नको, हें अपूर्ण ज्ञान नको; सर्व ब्रह्मांडालाच व्यापून टाकावयास समर्थ होईल असें व्यापक, विशाल, पूर्ण

ज्ञान त्याला पाहिजे आहे. ' माझी ओळख ' म्हणजे आत्मज्ञान हें ब्रह्मांडाच्या विशाल तपेलीतील पाणी होय, आणि त्या पाण्यांत असंख्य विशाल विश्वांचा सहज लय होईल; आणि केवळ यथार्थ आत्मज्ञानच उरेल.

माझी ओळख पाणि तिच्यातिल,
कैक अनते तयांत जिरतिल
माझ्यावाचुनि सारे विरतिल.....

असली ही विशाल तपेली कितीहि वेळा रिकामी करण्याचा प्रयत्न केला तरी ती भरलेलीच राहाणार; आत्मज्ञान हा असा विचित्र व अनिर्वचनीय प्रकार आहे. आणि एका ज्ञानांतून दुसरें ज्ञान अशी अविच्छिन्न परंपरा सुरू झाली म्हणजे जिकडे तिकडे ज्ञानच ओतप्रोत भरणार, सारें ज्ञानमय होणार ! आणि या विशाल ज्ञानाच्या योगानेच अज्ञेयाचें मर्म जाणून घेण्याची जिज्ञासा अखेर तृप्त होणार !

अज्ञेयाच्या भव्य महाद्वाराशीं डोके आपटून घेणाऱ्या मानवी मनाला यथार्थ ज्ञानाची जी तीव्र व अनावर लालसा लागलेली असते तिचा सर्वंकष प्रभाव वर्णून अपूर्ण ज्ञानाचा धिक्कार करणें हाच या रूपकात्मक गूढवादी कवितेचा उद्देश आहे. या कवितेंतील विचार वेदान्ताशीं अगदी वरवर परिचय असणाऱ्या कोणाहि माणसाला अगदी ओळखीचेच वाटतील. ' फुटकी तपेली ' व ' पाणी ' या प्रतीकांचा अर्थ चागल्या प्रकारे समजावून घेतला म्हणजे पुढे या कवितेंत फारसा दुर्बोधपणा जाचणार नाही.

**फुटकी तपेली** या कवितेतील आशयाच्या दुर्बोधतेविषयीं डॉ. हर्षे म्हणतात—" या कवितेंतील गूढतेमुळें ती एक चेष्टेचा विषयच होऊन बसली आहे. "[1] वास्तविक डॉ. हर्षे म्हणतात तितकी कांही ही कविता दुर्बोध नाही व तिच्यांतून काही सुसगत विचाराची प्राप्ति होणें शक्य आहे हें वर जें विवेचन केलें आहे त्यावरून दिसून येईल.

पण **कलगीचें गाणें** या कवितेच्या बाबतींत इतकेंहि समाधान मिळणार नाही अशी भीति वाटते. या आठ पानी दीर्घ कवितेंतील प्रतीकें ( symbols ) अनाकलनीय असून एकंदर साऱ्याच कवितेंतील आशय

पराकाष्ठेचा दुर्बोध झाला आहे. गूढवाद म्हणतात तो हाच असेल तर वाचकांची असल्या गूढवादापासून सुटका होईल तो सुदिन मानावा लागेल. .ज्या ' शुष्क बुद्धिवादा 'ची पुण्यप्रभावातील भूपालाने हेटाळणी केली आहे त्या शुष्क बुद्धिवादाचा सारा नीरसपणा या कलगीच्या गाण्यांत अगदी ओतप्रोत भरलेला आहे. आणि किती लांबच लांब कंटाळवाणी झाली आहे ही कविता! गडकऱ्यानी या कवितेत वाचकांच्या सहनशीलतेचा जणुं अंत पाहावयाचा निर्धार केलेला दिसत आहे. दुसरें असे की, या कावितेंत त्यानी तमाशांतील परिभाषा वापरली आहे. आपलें ' कलगी 'चें गाणे असून कलगीच्या सवालाला ' तुऱ्याचा जबाब ' मिळावा अशी त्याची अपेक्षा आहे. या कलगीवर तुरा करणारा खबीर मर्द कोण आढळणार ? असा कोणता तुरेवाला गडकऱ्याना अभिप्रेत आहे तें त्यांच्याच शब्दांत स्पष्ट करतों.

बोल बोललों सलगीचें,
गाणे माझे कलगीच !
तोच तयावरि करिल तुरा
वेडा जो मनिं खराखुरा
खराखुरा परि पुरा पुरा
असला वेडा करिल तुरा !

अगदी खराखुरा व पुरापुरा जो वेडा असेल तोच आपल्या कलगीवर तुरा करूं शकेल असें गडकरी म्हणत आहेत. कलेतील – मग ती सगीतकला असो, किवा काव्यकला असो – बेहोषीने ज्याला भारून टाकले आहे, कलेंतील उन्मादाने ज्याची तल्लीन अवस्था झाली आहे, उन्मनी अवस्था झाली आहे असा एखादा धुंद ' वेडा ' आपल्या गाण्याला जबाब देऊं शकेल असें गडकऱ्याना सुचवावयाचे असेलहि. आणि असा जर त्याचा आशय असेल, कलेने उत्पन्न होणारी धुंदी, बेहोषी, एकाग्रता, तन्मयता जर त्याना अभिप्रेत असेल तर त्याचा तो आशय ताबडतोब पतकरणें जरूर आहे. पण हा आशय व्यक्त करण्यासाठी त्यानी जीं प्रतीके, जीं रूपकें वापरलीं आहेत तीं इतकीं क्लिष्ट, अनाकलनीय व दुर्बोध आहेत व त्यांचा विस्तार

इतका नीरस आहे की, वर उल्लेखिलेला आशय या दुर्बोधतेंत व नीरसतेंत केव्हाच विरून जाईल व गडकऱ्याच्या कलगीच्या सवालाला जबाब देणारा कोणी तुरेवालाच पुढे येणार नाही असें साधार भय वाटतें. तुरेवाल्याने जबाब द्यावा असें वाटत असेल तर कलगीचा सवाल आकलनाच्या आटोक्यांतला असावयास नको काय ? सवाल कोणालाहि कळणार नाही इतका दुर्बोध झाल्यावर ' तुरा ' कोण करणार ? ' षण्मासिंचा वायदा ' देऊनहि कोणालाहि ' तुरा ' करता येऊं नये अशीच मुळी गडकऱ्यानी योजना केली आहे. तुऱ्याचा जबाब ज्याला पाहिजे असेल त्याने आपला सवाल कसा ठेवावा याचे वर्णन प्रसिद्ध आधुनिक लावणीकार पठ्ठे बापूराव याने एका कवनांत फारच नामी केलें आहे. गडकऱ्याच्या कलगीच्या सवालातील क्लिष्ट दुर्बोधपणा चांगला जाणवावा यासाठी पठ्ठे बापूरावाच्या ' सवाल कसा असावा ? ' या शीर्षकाच्या कवनातील काही भाग येथे उद्धृत करतों.

चतुर कवींनी सभेत येउन जबर प्रश्न केला,
मला वाटते वाया परि तो खास तुझा गेला.
सवाल करावा असा रोकडा मोजून घ्यावा धडा... ..
एक सवालात व्हावा निवाडा जणुं काय उचलावा विडा
सवाल नसावा वेडा वाकडा फुकट जगाला पिडा.
आधळा घोडा असुनि लंगडा तुम्हि राव ढकलत नेला,
मला वाटते वाया परि तो यत्न तुझा गेला.
सवाल असावा लोण्याहुन मऊ पाण्याहुन पातळ......
सवाल नसावा कुचकट तिखट; जसा कस्तुरी परिमळ
सवाल असावा सोलिव रसिक आणि गूढ अर्थ निर्मळ... ...
सवाल असावा चोखट अगदीं धुवट वस्त्र जसे
सवाल असावा नीट जयाचा वीट मनाला नसे.
सवाल असावा जड गाणारा ऐकुन भरावे पिसे,
तुमचा सवाल पाहताच खरोखर आलें मला नवलाचें हांसे.
ऐकून घे' आतां अर्थ पंडिता शब्द बरा टाकिला,
मला वाटते वाया परि तो यत्न तुझा गेला .....

गडकऱ्यांच्या कलगीच्या सवालाला पठ्ठे बापूरावाच्या तुऱ्याचा जबाबच खरोखर पाहतां अगदी योग्य आहे. सवाल ' सोलिव, रसिक ' असावा व

त्यांतील ‘ गूढ अर्थ निर्मळ ’ असावा, तो ‘ चोखट ’ असावा, या गोष्टींपैकी एकहि गोष्ट दुर्दैवाने गडकऱ्यांच्या कवितेंत नाहीं. गडकऱ्यांचा हा सवाल ‘ वेडावाकडा ’ म्हणजे पराकाष्ठेचा दुर्बोध असल्यामुळे ‘ फुकट जगाला पिडा ’ असाच त्याचा प्रकार झाला आहे; आणि यामुळे ‘ तुमचा सवाल पाहतांच खरोखर आलें मला नवलाचें हासे ’ असाच उद्‌गार रसिकाच्या तोंडून बाहेर पडेल अशी भीति वाटते.

पण हा करमणुकीचा व विनोदाचा भाग सोडून देऊन गडकऱ्यांच्या कवितेत कोणता गूढार्थ, कोणता गूढ आशय भरलेला आहे तें शोधून काढण्याचा थोडासा प्रयत्न करावयास कोणती हरकत आहे? तो गूढार्थ नेमका सापडला नाही तरी प्रयत्न करून पाहिला इतके समाधान तरी आपल्याला लाभेल; आणि हेहि काही लहानसहान समाधान नाहीं! गडकऱ्यांच्या कवितेचा जो सुलभ व सुबोध भावार्थ मी आतां कसोशीने देणार आहे त्यातून त्यानी वापरलेल्या प्रतीकांचा अर्थ लावण्याची खटपट वाचकानीच करून पाहावी.

कवीजवळ असलेली सारंगी त्याला एका काळीं फार प्रिय होती व तिच्यांतून उत्कृष्ट सूर निघत असत. कालांतराने तो पूर्वींचा आनंद मावळून गेला, नवी नवाई उरली नाही. सारंगीच्या सुरानी आता पूर्वींसारखा आनंद होईना. पण त्यांची स्मृति मात्र मन अजूनहि भारून टाकीत आहे. कवि असाच एकदा सारगी हातांत घेऊन बसला होता. त्याला विलक्षण औदासीन्य आले होते. आणि सारंगीचे सूर तें औदासीन्य नष्ट करूं शकतील अशी त्याला आशा वाटत होती.

भोवताली ढोल, नगारे इत्यादि वाद्यांचे कर्णकटु ध्वनि निघत होतेय पण त्याच्यात कसलाहि मेळ नव्हता. असल्या या गोधळांत सारगीच्या सुराचा मिलाफ होईना; आणि चित्त रमेना. यामुळे औदासीन्य वाढू लागलें.

इतक्यांत आकाशांत काळ्या ढगांची गर्दी झाली, त्यांचा विलक्षण कडकडाट सुरू झाला. या कडकडाटाने कवीचें मस्तक सुन्न झालें. बाहेर

दाट धुकें पसरलें. मन बावरलें, घाबरलें, त्याला काहीहि सुचेना. जिकडे तिकडे दाट काळोख दाटला. त्या दाट ' काळोखांतील तेजांत ' कवीला नाहिंपणाचा ( अभावाचा ? शून्याचा ? ) डोंगर दिसला. या डोंगराच्या शिखरावर एक बाळ मजुळ गाणे गात आहे असा कवीला भास झाला.

मेघाचा कडकडाट इतका विलक्षण होता की, त्यांत त्या बाळाचे गाणें धड ऐकू येईना. कवीने त्या गोंधळात सुराचा मेळ घालण्याचा खूप प्रयत्न केला. त्या बाळाच्या गाण्यात सुराचा मेळ शोधण्याऱ्या भलत्याच नादांत त्याने सारगी हातात धरली नाही. ते गाणे मधून मधून ऐकू येत होतें, आणि कवि पुन्हा पुन्हा ते विसरत होता.

नतर कवि काळोखावर वाऱ्याच्या इमारती बांधू लागला. मेघगर्जनेबरोबर तोहि ओरडू लागला. ढोल-नगाऱ्याच्या बेसूर आवाजांत तो सूर मिळवू लागला. सप्त सुराचा मिलाफ व्हावा अशी त्याला वेडी आशा होती. पण अखेर त्याची निराशा झाली व तो भयाण हसला.

प्रत्येक वाद्याचा सूर निराळा. अशा स्थितींत सुरांचा मेळ व्हावा कसा ? शेवटचा प्रयत्न म्हणून तो सारंगी छेडूं लागला. पण तें भेसूर संगीत त्याला ऐकवेना, आणि संतापाने त्याने सारगी फोडून टाकली. तत्क्षणीं भान हरपले, सुराचा मेळ संपला, सूरच विरून गेले; आनंद संपला. सारगीच्या ताराचे जाळे झाले. हृदयात मेघांचा कडकडाट घुमत होता. समोरच दिसणारा ' नाहिंपणाचा डोंगर ' कवि भकास डोळ्यानी पाहत होता. मधून मधून त्या ' बाळा ' चें गाणें चाललेच होतें.

तें निष्ठुर ' बाळ ' ' नसत्याच्या पडद्याआड ' दडलें आहे असें त्याला वाटलें. इतक्यांत मेघांचा शेवटचा कडकडाट झाला, आणि वीज चमकली. मनांत अवसान भरलें. धुकें विरून गेलें, मेघ नाहीसे झाले. कवीची वृत्ति आनंदी झाली, रंगली; आणि मेघ नसताच वृष्टि होण्याचा उफराटा प्रकार घडून आला. खरेपणाच्या पावसाने काळोख धुवून टाकला, दाट काळोखाचे तेजांत रूपांतर झालें. नवल असें की, आपल्या हातांत सारंगी जशीच्या तशी आहे असें कवीला दिसून आलें. तो ' नाहिंपणाचा डोंगर ' हि समोर दिसत होता व तें बाळ स्वच्छंदाने गात होतें. त्या

गाण्याचा प्रत्येक सूर ऐकूं येत होता. ते सूर ऐकताच कवीची वृत्ति थरारली व सारंगी वाजविण्याची त्याला अनावर इच्छा झाली. ती सारंगीहि छेडली जाण्यासाठी उतावीळ झाली; सप्तसुरांच्या मिलाफाची लालसा तिला लागली. कवि आनंदाने सारंगी छेडूं लागला. आणि पूर्वींपेक्षा किती तरी गोड असा एकच सूर तिच्यांतून निघूं लागला. त्या सुराबरोबर 'नाहिंपणाचा' तो डोंगर अदृश्य झाला. डोंगराच्या शिखरावर 'नाहींचें नाहीं झालें' (अभाव नष्ट झाला !), आणि समोरच तें गाणारें बाळ दिसूं लागलें.

ते ढोलनगारे पहिल्यासारखेच वाजूं लागले, पण बाळाच्या सुरानी त्याच्या आवाजातील पोकळपणा नष्ट केला वृद्धवधूचें बालवराशीं लग्न लागलें. पण या जोडप्याचें अपत्य जें गाणें तें त्या दोघांच्याहि जन्माच्या आधीच जन्माला आलें होते. ढोलनगारे ही त्या लग्नातील वाजत्री. सुमुहूर्ताचा क्षण फुटून त्यातून युगे निर्माण झालीं. बाळ गाणे गात होतें. नवरामुलगा लग्नमत्र म्हणत होता. नवे-जुने, उणें-पुरें, असे-नसे या सर्वांचें लग्न लागलें. कवीने आपल्या सारगीचा अहेर केला.

त्या बाळाच्या गाण्याला साथ करण्यासाठी कवीने सारगी हातात घेतली. 'तू गा, माझी सारगी तुला साथ करील' असें कवि म्हणताच त्या स्वच्छंदी बाळाने गाणेच बंद करून टाकले. तें रुसलें व पळून जाऊं लागलें. 'माझी सारगी' या कवीच्या शब्दामुळेच ते बाळ स्तब्ध झाले. पण कवीला गाण्याचें विलक्षण वेड लागलें. त्याने त्या बाळाचीं खूप आर्जवें केलीं, पण त्याचा राग जाईना. तथापि 'जिचा मी प्राणापलीकडे संभाळ केला अशी ही सारंगी तूच धर' असें कवीने म्हटल्याबरोबर बाळ आनदलें व पुन्हा गाऊं लागलें. 'भिन्नत्वाचा एकपणा' हा त्या गाण्याचा प्राण होता. कवीने आपल्या हृदयाचा मृदु गालीचा पसरला व त्यावर तें गाणें नाचूं लागलें. त्यासुरात कवीचा जीव विरून गेला. सुराच्या मोहिनीचें 'विष' त्याच्या सर्वांगात भिनलें व त्याला मरणाचें सुख गवसलें. गाणें एकत असताच कवि मेला व स्वतःच्याच प्रेतावर तो बसला. काळाचें सारें भान नष्ट झालें.

सर्वत्र गाणें कोंदून राहिलें. इतकेंच नव्हे तर तें मूर्तहि झालें असा कवीला भास झाला. कवीचें सारें शरीर व मन हीं गानमय झालीं. सर्व विश्व गानमय झालें. या नादब्रह्मात साऱ्या भेदांचा पूर्ण लय होऊन गेला. तें गाणें ऐकताच, जो ऐकणारा त्याचेंच गाणे झालें. त्या गाण्यांत काळहि विरून गेला. सारे कांही त्यांत विरून गेले. असलें गाणें सुखासुखी ऐकावयास मिळत नाही.त्याला मोठी किंमत द्यावी लागते.

जो मनांत खरा व पुरा वेडा असेल तोच या कलगीवर तुरा करू शकेल.

जगताना गा, मरताना गा, आणि .मेल्यानंतरहि गा. जो स्वतःच्या प्रेतावर बसतो ( जीवन्मुक्त ? ), जो तुझ्याठायीं मला बघतो, गाण्यांत जो दोघाना ( तुला आणि मला ) पाहतो व ज्याला या गाण्याचा अर्थ कळतो त्यालाच हें गाणे अर्पण केलें असे. आदि–मध्य–अंत सर्वच गानमय ! असें हें विलक्षण गाणे आहे.

पूर्वी हे गाणें माझे होते, ते आता तुझे झालें आहे; किंबहुना साऱ्या विश्वाचें झालें आहे.

या सवालावर तुरा करणारा कोण आहे ?

गडकऱ्याच्या सवालाचें स्वरूप हे असें आहे. ज्या प्रज्ञावंताला याचें उत्तर देतां येणे शक्य असेल त्याने ते अवश्य द्यावे. मी स्वतः मात्र अगदी शरण आहें हें नम्रपणें कबूल करतों. ' आधळा घोडा असुनि लगडा तुम्ही राव ढकलत नेला ' असें पठे बापूरावांच्या शब्दात म्हणून गडकऱ्याच्या या शुष्क व नीरस बुद्धिवादाच्या पोटीं उद्भूत झालेल्या ' गूढवादा' चा निरोप घ्यावा आणि तारकेच्या उन्मादक सहवासांत धुंद होऊन राहावें हेंच बरें !

# १०. त्याच तारकेस याचना

The desire of the moth for the star!—
—*Shelley*

गडकऱ्यांच्या कवनांचा सूक्ष्म अभ्यास करीत असतां तारकेचा उल्लेख पुन्हा पुन्हा आढळला. तारका हे दुसऱ्या कशाचें तरी प्रतीक असेल अशी पुसट देखील शका आरभीं मला आली नव्हती. तारकेचा उल्लेख त्यांनी केवळ अभावितपणेच ठिकठिकाणीं केला असेल या कल्पनेने मी तिकडे बरेच दिवस दुर्लक्ष करीत होतों. तारकेचें हें प्रतिमान (image) गडकऱ्यांच्या भावनांशीं अत्यंत निगडित असेल, व ते त्याच्या अतर्मनाच्या सूक्ष्म व्यापाराचें द्योतक असेल असे मला पूर्वी मुळीच वाटले नव्हतें. परतु प्रत्येक उल्लेखाची नोंद करून तिचा तपशीलवार विचार केल्यानंतर या प्रतिमानाचा गडकऱ्यांच्या संवेदनांशीं व भावनांशीं अत्यंत निकटचा संबंध आहे याविषयीं माझी खात्री झाली. एखादें प्रतिमान नाटकांत अथवा काव्यांत पुन्हा पुन्हा येऊं लागलें म्हणजे तें वापरण्यांत लेखकाचा कांही हेतु तर नसेल ना, अथवा त्याने तें अहेतुकपणें वापरलें असल्यास त्याच्या अतर्मनात कोणते विचार थैमान घालीत असतील इत्यादि गोष्टी आपल्या मनात येणें स्वाभाविक आहे. लेखक जीं प्रतिमाने वापरतो त्यांचा त्याच्या भावनांशीं साक्षात् सबंध असतो ही गोष्ट अगदी अलीकडे मानसशास्त्रज्ञांना समजली; आणि कांही टीकाकारांनी या ज्ञानाचा फायदा घेऊन लेखकाच्या संवेदना व भावना, आणि त्याने वापरलेलीं प्रतिमानें यांच्यांतील संबंध स्पष्ट

करण्याचा प्रयत्न केला. शेक्स्पियरच्या ट्रॅजिक नाटकांत जीं प्रतिमानें पुन्हा पुन्हा आढळतात त्यांचा सूक्ष्म अभ्यास कॅरोलिन स्पर्जन् या विदुषीने केला व या विषयावर १९३० सालीं शेक्स्पियर ॲसोसिएशन्‌पुढे एक व्याख्यान दिलें. पुढे याच व्याख्यानाचा विस्तार करून १९३५ सालीं सदर विदुषीने आपलें 'शेक्सपियर्स इमेजरी' हें पुस्तक प्रसिद्ध केलें. शेक्स्पियरच्या ट्रॅजेडींमध्ये पुन्हा पुन्हा आढळून येणाऱ्या प्रतिमानांच्या आशयाविषयीं कॅरोलिन स्पर्जन् म्हणते—

> "......recurrent images play a part in raising, developing, sustaining, and repeating emotion in the tragedies, which is somewhat analogous to the action of a recurrent theme or 'motif' in a musical fugue or sonata... ."

हीं प्रतिमानें विनाकारण येत नसून लेखकाच्या विचारांचीं तीं प्रतीकें (symbols) असतात व लेखकाच्या अंतर्मनाचे व्यापार त्याच्या द्वारें आविष्कृत होत असतात, असें विवेचन करून मॅक्बेथ व हॅम्लेट या नाटकातील पुन्हा पुन्हा येणाऱ्या प्रतिमानाविषयीं स्पर्जन् म्हणते—

> " ..the recurrent images in *Macbeth* or *Hamlet* reveal the dominant picture or sensation—and for Shakespeare the two are identical—in terms of which he sees and feels the main problem or theme of the play, thus giving us an unerring clue to the way he looked at it, as well as a direct glimpse into the working of his mind and imagination."

शेक्स्पियरच्या महत्त्वाच्या ट्रॅजिक नाटकांमध्ये कथानकात होणाऱ्या भावनाविष्कारातूनच त्यातील प्रतिमानें निर्माण होतात, म्हणजेच तीं प्रतिमानें भावनाना अगदी अनुरूप असतात असें म्हणून ' किंग लिअर ' मधील पुन्हा पुन्हा येणाऱ्या प्रतिमानाचें वर्णन स्पर्जन्‌ने पुढीलप्रमाणें केले आहे.

"So constant and all-pervading as to be reiterated, not only in word-pictures, but also in the single words themselves."[१]

शेक्स्पियरच्या नाटकातून पुन्हा पुन्हा येणाऱ्या प्रतिमानातून विशिष्ट पात्राच्या मनोधर्मातील महत्त्वाचीं वैशिष्ट्ये प्रकट होत असतात असा सिद्धात मोरोझॉफ् या राशियन् टीकाकारानेहि माडला असून शेक्स्पियरच्या ऑथेल्लो, मॅक्बेथ व हॅम्लट या नाटकात निरानिराळीं पात्रे जीं प्रतिमानें (images) वापरतात तीं त्याने पुराव्यादाखल दिलीं आहेत. मोरोझॉफ् म्हणतो—

"The range of the predominating image met with in the speeches of a character is of tremendous significance"[२]

गडकऱ्याच्या कवितामध्ये तारकेचे प्रतिमान पुन्हा पुन्हा आढळू लागल्यामुळे हें प्रतिमान गडकऱ्याच्या व्यक्तित्वातील काही वैशिष्ट्याशीं निगडित झालें असले पाहिजे अशी शंका येऊन कुतूहलाने मीं त्याच्या नाटकाचा याच एका दृष्टीने पुन्हा अभ्यास केला. आणि माझी शका खरी ठरली. जी तारका त्याच्या अनेक कवनातून पुन्हा पुन्हा लकाकताना दिसते तीच तारका **प्रेमसंन्यास** व **पुण्यप्रभाव** या त्याच्या नाटकातहि असख्य वेळां आढळते. हा केवळ योगायोग आहे असें नसून गडकऱ्याच्या व्यक्तित्वाचें एक महत्त्वाचे वैशिष्ट्य या प्रतीकात किंवा प्रतिमानात उत्कृष्टपणें आविष्कृत झालेले आहे. हें प्रतिमान गडकऱ्यानी जाणूनबुजून वापरलें आहे असें मुळीच दिसत नाही. त्याच्या अतर्मनातील गूढ भावना त्याना अगदी नकळत या प्रतिमानाच्या द्वारे प्रकट झालेल्या आहेत. तात्पर्य, तारकेच्या पुनरुक्त प्रतिमानाचा गडकऱ्याच्या भावनाशीं अगदी निकटचा साक्षात् सबंध आहे. आकाशात दूर दूर असलेल्या आणि सर्वथैव दुष्प्राप्य असलेल्या तारकेची मोहिनी गडकऱ्याच्या मनाला कांही विलक्षणच आहे. प्रेमसंन्यासांत तर या तारकेच्या प्रतिमानावाचून गडकऱ्याची प्रतिभा चालतच नाही असें दिसतें. गाण्यात जसें ध्रुवपद तसें या नाटकात तारकेचें प्रतिमान आहे. " जवळचे काचेचे दिवे आकाशातल्या दूरच्या तारापेक्षा जास्त

तेजस्वी दिसतात म्हणून त्यांची तुलना कोण करील? " असे सुशीला विचारीत आहे (अंक १, प्र. ३). " आकाशांतल्या तारका नुसत्या चमकतात हाच त्यांचा उपयोग? " असेहि ती विचारीत आहे. (अंक५, प्र. १) कमलाकरासारखा व्हिलन सुद्धा लीलेने झिडकारल्यामुळे झालेला अपमानाचा प्रसंग पाहण्यासाठी आकाशांतील तारकाना आवाहन करीत आहे " आकाशांतील दिवटयांनो! पाहिलात आजचा हा नाटकी प्रकार! " (अंक १ प्र. ५). तथापि तारकांची खरी आसक्ति जयत व लीला यांच्याच ठिकाणीं दिसून येते. दुसऱ्या अंकाच्या पांचव्या प्रवेशांत अगदी सुरवातीला जयंत व लीला यांच्या सवादात ताराची नुसती बरसात नाचत आहे. मंदतेज झालेल्या तारकेला उद्देशून लीलेने एक उत्प्रेक्षा केल्याबरोबर जयंत म्हणतो–"अनतकालापासून तारका या पापी पृथ्वीला शिवल्या नाहीत म्हणूनच त्यान्वें तेज चिरकाल चमकत आहे." पृथ्वीवरील वातावरण अत्यत पापी, मलिन व अपूर्णतेने भरलेलें असून तारका या अत्यत विशुद्ध वातावरणात विहरत असतात, त्याचे तेज मागल्याने परिपूर्ण असते असेंच जयंताला सुचवावयाचे असावें. थोड्याच वेळाने जयत मागल्याने व सौकुमार्याने नटलेल्या फुलांची तारकाशींच तुलना करीत आहे, आणि लगेच तारका म्हणजे परमेश्वराच्या उद्यानातील रमणीय फुलेंच असे रूपक लीला वापरीत आहे. या नश्वर मानवी देहाचा त्याग केल्यानतर माणसे आकाशांत 'तारकारूपाने चमकू' लागतात असा जयंताचा समज आहे, आणि 'पुण्यवंताचे आत्मे आकाशात तारे होऊन रहातात' अशी लीलेने तावडतोब त्याला पुष्टि दिली आहे. 'चांदण्या म्हणजे मृतांच्या प्राणानीं स्वर्गात जाण्यासाठीं केलेले मार्ग असावेत' असली अचाट कल्पनाहि जयंताच्या मनात येते. 'आईच्या मरणानतर मी दररोज एका ठळक ताऱ्याकडे किती तरी आशेने आणि उत्कठेनें पहात असें!' असें जयंत म्हणतो. यावर लहानपणींच्या निष्पाप जविनाची आठवण लीलेला होते आणि त्या अल्लड वयात चाललेल्या खेळांत आकाशांतील चांदण्या आळीपाळीने ती व जयत कशीं वाटून घेत होतीं याचें वर्णन ती करते. बालपणींच्या रम्य आठवणी चित्तात उचंबळून आल्याबरोबर जयंत म्हणतो—

" त्या वेळच्या त्याच या तारका, आम्हाला आज अशा स्थितींत पाहून काय म्हणत असतील ?...... हे अनन्तयुगसाक्षी तारकांनो, आमच्यासारखी अल्लड अर्भकें आशेनें आमच्याप्रमाणे भविष्यकालाचीं सुखदायक चित्रें काढतांना कधीं तुमच्या दृष्टीस पडलीं तर ...... हंसूं नका. "

दवाचा थेंब अंगावर पडल्याबरोबर आपल्या ' मातेच्या ताऱ्याचा हा अश्रुबिंदु तर नसेल ना ?' अशी शका त्याच्या मनांत तरळून जाते. या अवघ्या तीन पानांच्या संवादांत तारकेचा उल्लेख निदान पधरा वेळा आलेला आहे हें लक्षांत ठेवण्यासारखे आहे. पांचव्या अंकाच्या दुसऱ्या प्रवेशांत लीलेने जलाल विष घेतलें आहे व ती आतां जगत नाही या सत्याची जाणीव झाल्याबरोबर जयत वैतागाने म्हणतो—

" नाहीं लीले, परमेश्वर प्रेममय नाहीं....... ही भूमि नको, तें आकाश नको, ताराचा रस पिळून त्यानें मेघमंडळांतल्या गाराचा वाडा बाधूं आणि चिरकाल त्यातच राहू. "

याच अकाच्या शेवटच्या प्रवेशात पुन्हा जयताच्या तोंडीं तारकेचे उल्लेख एकसारखे आले आहेत. मृत लीलेचा आत्मा आपल्याला मिळणार या विचाराने ' आकाश आनदाने तारकारूपी नेत्र मिचकावीत आहे ' असें त्याला वाटते, आणि लगेच त्या तारका निर्दय नसून लीलेच्या 'प्रेमतारका' आहेत असे त्याला वाटू लागतें, इतकेंच नव्हे तर लीलेच्या चितेंतून बाहेर पडणाऱ्या ठिणग्या ' तारकापदाला पोहोंचत आहेत ' असेंहि त्याला वाटतें [३] आणि तो विद्याधराला म्हणतो—

" ... या नव्या तारामंडळांत, या ताराक्षरानीं खचिलेल्या प्रेमस्वास्तिकांत माझ्या लीलेचा आत्मा कौस्तुभासारखा चमकताना दिसेल ! तो देदीप्यमान प्रणयतारा ...... उद्याच्या भाग्यशाली जयंतावर स्वर्गीय, तेजोमय प्रेमसर्वस्वाची वृष्टि करील ! ...... तारामंडळांतून माझ्यावर जेव्हां प्रेमाश्रूंचा पाऊस पडेल, लीलेच्या

ताराकिरणांशीं माझ्या डोळ्यांचीं किरणें प्रेमालाप बोलूं लागतील तेव्हां तुमची खात्री होईल ! ”

या एका भाषणात ‘ तारा ’ हा शब्द निदान नऊ वेळां तरी आला आहे. जयताच्या व्यक्तिरेखेंतील अनेक वैशिष्ट्यें स्वतः गडकऱ्यांचींच आहेत हें मागे दाखविलेंच आहे. जयंत म्हणजेच गडकरी असेंहि म्हणावयास काही हरकत नाही. प्रेमसंन्यासांत तारकेचे प्रतिमान निदान तीस वेळा आलें आहे. त्यातील तेवीस उल्लेख एकट्या जयंताच्या तोंडीं आहेत, आणि लीला हें प्रतिमान फक्त चार वेळा वापरते. हें लक्षात घेतलें म्हणजे जयताच्या व्यक्तिरेखेचा आधार जे गडकरी त्यानाच या तारकेची काही विलक्षण चमत्कारिक मोहिनी असली पाहिजे असा तर्क करावासा वाटूं लागतो.

या प्रतिमानाचा अंतर्गत आशय काय असावा हा पुढचा प्रश्न आहे. जयंताच्या तोंडीं तारकाचे जे उल्लेख आले आहेत त्याचा साकल्याने विचार केला असतां, अपूर्णतेने भरलेल्या या फसव्या व पापी जगात जें कधींच आढळणार नाहीं असले दिव्य सौंदर्य, किंवा पावित्र्य व मांगल्य, किंवा यासारख्या कोणत्याहि दुष्प्राप्य पण अत्यंत अभिलषणीय गोष्टींचें ते प्रतीक गडकऱ्याच्या मनात तयार झाले असावे असें वाटते. निराशेच्या काळोखाने गडकऱ्याचे जीवन भरलेलें असल्यामुळे तारकाच्या प्रकाशाची आसक्ति त्याच्या ठायीं निर्माण होणे अपरिहार्य आहे. तेजाचे जे अनेक उल्लेख प्रेमसंन्यासांत ठिकठिकाणीं आले आहेत ते याच आसक्तीचे द्योतक आहेत. तेजाच्या या आसक्तींतूनच दूर दूर तरळणाऱ्या, अंधुक दिसणाऱ्या, स्पृहणीय व विलोभनीय परंतु अत्यंत दुष्प्राप्य गोष्टींची लालसा, आटोक्याच्या बाहेर असलेल्या म्हणूनच विचित्र भुरळ घालणाऱ्या गोष्टींची लालसा, निर्माण होत असते. हे ‘ दूरचे दिवे ’ मोठे लोभसवाणे असतात. मानवाच्या अमर्याद आशांचें, अतृप्त आकांक्षांचे, मृगजळाप्रमाणें दूर दूर पळणाऱ्या ध्येयाचे, परिपूर्ण जीवनाविषयींच्या त्याच्या स्वप्नांचें, प्रेमसाफल्याच्या तीव्र इच्छेच्या पोटीं निर्माण होणाऱ्या धडधडत्या हुरहुरीचें, अनिवार उत्कंठेचें, अज्ञेयाच्या भव्य महाद्वाराच्या आत दडलेल्या गूढ गोष्टींचें आकलन करून

घेण्याच्या तळमळीचें— थोडक्यात, आपल्या सामर्थ्याच्या बाहेर असलेल्या अनेक दुर्लभ गोष्टींचें तें प्रतीक आहे. हे दूरचे दिवे, या दूरच्या तारा, प्राप्त करून घेणें हें आपल्या दुबळया सामर्थ्याच्या सर्वस्वीं पलीकडचें आहे याची खात्री होऊन सुद्धा त्याचा लोभ मुळीच सुटत नाही. किंबहुना त्याची मोहिनी त्यांच्या दुष्प्राप्यतेतच सामावलेली असते; अथवा दुष्प्राप्य असल्या-मुळेच त्या मोहक वाटतात असे म्हटलें तरी चालेल. त्याची प्राप्ति न झाल्यामुळे आपल्या दुबळेपणाची फार तर आपण कीव करूं, पण त्याच्या-विषयींचा विस्मययुक्त आदरभाव, आणि त्याच्याविषयींची उत्कंठापूर्ण आसक्ति या गोष्टी नष्ट होतील असे मुळीच नाही. पुण्यप्रभावांतील ईश्वर वसुंधरेला म्हणतो " हातालगतचीं फुललेलीं फुलें खुडून घेण्याची इच्छा होते, पण आकाशात बसून हसणाऱ्या तेजस्वी फुलांकडे आपण विस्मयपूर्ण आदरदृष्टीनें पहात असतों. " तारकाची, आकाशातील या हसऱ्या तेजस्वी फुलाची, गडकऱ्याना जी अनिवार आसक्ति वाटत आहे तिच्या पोटीं अगदी नकळत त्याच्या चित्तांत खोलवर रुजलेल्या भावना हे प्रतीक, हे प्रतिमान धारण करून प्रकट होतात. तारका या मानवाच्या दग्ध झालेल्या आशाच्या ज्योति आहेत असें घुबडास या कवितेंत गडकरी म्हणतात.

> दिवे चमकती आकाशातिल,
> नसल्या चिरनना ते गातिल,
> अपुल्या काळोखाला खातिल,
> जळत्या आशेच्या या ज्योती ...

तारका या दुष्प्राप्य आहेत आणि म्हणूनच त्या मोहक असतात, त्याच्या तेजामुळे काळोखाचा भयाणपणा सुसह्य होणे शक्य असते. हुरहूर या कवितेंत गडकरी म्हणतात—

> काळोखामधुनी पल्याड न दिसे या रात्रिचा शेवट
> आणी मोहकता तिला तरि कशा दुष्प्राप्य तारागण ?

या ओळींतील तारकांचें प्रतिमान याच कवितेत प्रकट झालेल्या 'माझें होइल सर्व हें कधि, मला जें आजला पारखें ?' या उत्कठेचें द्योतक आहे' थोडक्यात सागावयाचें म्हणजे, अमर्याद इच्छांचें द्योतक आहे. या अमर्याद

इच्छा मनुष्याच्या मनांत विलक्षण कालवाकालव करतात; तथापि त्यांची भुरळ नाहीशी व्हावी असें त्याला वाटतच नाही; या तारकेवर खिळलेली दृष्टि माघारी फिरतच नाही. हृदयशारदेस या कवितेंत पुढील ओळी आहेत.

तव वसतीच्या दिशेवरी जी तारा लखलखते,
नेत्रयुग्म हे तीवर खिळतें, नच कांहींही हलतें !

मनांत आशा निर्माण होऊन तिची सफलता होईल अशी खात्री होते न होते तोंच निराशा पदरात पडावी, आणि चित्तांत विषण्णता अनावर व्हावी अशा उद्वेगजनक स्थितींत दूर दूर आकाशात आपल्याला एक तारका दिसते आणि आपलें मन कावरेंबावरें होतें असे मनांतली दिवस-रात्र या कवितेत गडकरी म्हणतात—

तशात गगनामधे दिसत दूर तारा परी—
मनातंहि सहस्रधा फिरत कल्पना बावरी !

या दुष्प्राप्य तारकेची आसक्ति कधीं ? या उत्कृष्ट कवितेत पुढील प्रमाणें प्रकट झाली आहे.

सतेज वचने देई तारा, परी लकाके नभामधीं,
खालीं येइल परी कधी ?

ही तारका आपल्या आकर्षक तेजाची विलक्षण मोहिनी घालीत आहे; पण ती किती तरी दूर आकाशामध्ये लकाकत आहे. ती खाली यावी आणि तिचा लाभ व्हावा अशी कितीहि अनावर अभिलाषा असली तरी ती कधी खाली येणार ! हे रम्य स्वप्न सत्यसृष्टींत कधी अवतीर्ण होणार ?

वेडा या कवितेत सर्वत्र तारकेचेंच प्रतीक आहे. या कवितेंतील वेडा म्हणजे अमर्याद, अतर्क्य, वेड्या आशांना हृदयाशीं कवटाळून बसलेला भावनावश, हळव्या अंत:करणाचा मानव ! आणि त्या अमर्याद आशा, सत्यसृष्टींत न उतरणाऱ्या आकांक्षा, खरीं न होणारीं स्वप्नें, पाहतां पाहतां अदृश्य होणाऱ्या इंद्रधनुष्यांतील तरल परंतु मोहक छटा, दूर दूर पळून जाणारें मृगजळ, पकडता न येणारा आकर्षक कांचनमृग, भीषण काळो-

खाचा भेद करून त्याला उजळणारी पण तळपून क्षणार्धात हरपणारी आणि पुन्हा केव्हा दिसणार याचा नेम नसलेली गूढरम्य विद्युल्लता—इत्यादि गोष्टींत सामावलेल्या दुष्प्राप्यतेचें, गूढरम्यतेचे, तरल मोहकतेचें प्रतीक म्हणजे ती तारा !

तारा एक तशात पश्चिमदिशा फोडून बाहेरली ...
वेड्याने तिजला भकास नयनी येताक्षणीं हेरली ..
काहीं वेळ तसाच पाहि तिजला, एकाग्रता ती खरी.
आशा, प्रीति, तशेच वेड असले, यानाच ती साधते !

' हातीं तीस धरीन ' असा निश्चय त्या वेड्याने केला खरा ! पण कुठे ती आकाशातील तारका आणि कुठे हा दुबळा वेडा ! त्याच्या उदास हृदयात निराशेचा काळोख दाटू लागला. त्या काळोखात त्याला एकच आधार होता. तो म्हणजे ती तारका ! ' तारा तारक त्या तमीं; मनिं तसा तो एक आशाकण.' त्या तारकेमागून भटकता भटकता तो वेडा अखेर नाहीसा झाला—पण ती तारका मात्र आजहि स्थिर आहे. ती कायमचीच दुष्प्राप्य आहे; तिच्या प्राप्तीसाठी जिवाचें रान करणारा दुबळा मानव हताश होऊन नाहीसा झाला तरी ती मात्र स्थिर राहणारी आहे. त्या वेड्याप्रमाणेच आपल्या मनात चमकणाऱ्या ' चादणी ' च्या मागे धावत जाण्याची गडकऱ्याना तीव्र इच्छा आहे.

अमर्याद आशेचा अनावर मोह किती उन्मादक असतो हें **त्याच तारकेस याचना** या कवितेंत पुन्हा एकदा प्रकट झालें आहे. आशेची भुरळ आणि नैराश्याची भीति याच्या कैचींत मनुष्य सापडला असला तरी त्या आशेचा, त्या अमर्याद इच्छेचा—त्या दुष्प्राप्य तारकेचा—मोह त्याला सोडवत नाही.

थाब जरा, तारके ! जरा तरि थाब, सखे सुंदरी !
    कुणिकडे नेशी मज यापरी ?
तव किरणाच्या सुंदर कोमल आधारावरि सखे !
    केलें माझें मज पारखें !
स्वर्गसुखाची आशा लावुनि ओढीसि मंजला गडे !

* * *

परि आशा लावुनि नेशी मज वरिवरि

उच्च पदीं विराजणाऱ्या, दिव्य, स्पृहणीय परंतु दुष्प्राप्य सौंदर्याविषयीं जो विस्मययुक्त आदरभाव मनात निर्माण होतो असें पुण्यप्रभावांतील ईश्वर म्हणतो तो आदरभाव तारकेचे प्रतिमान वापरून गडकऱ्यांनी दिव्य प्रेमाची जाति या कवितेंत आविष्कृत केला आहे.

शुक्रतारका अशी नभा
नवी नवी देई शोभा
तारा गगनीं
परि भूवरुनी
बघता नयनीं
जी मन्चरते हृदयीं, ती
दिव्य प्रेमाची जाति !

तारकेच्या तेजाच्या मोहकपणाचा उल्लेख गडकऱ्याच्या कावितांत आणखी वीस वेळा तरी आलेला आहे.

पुण्यप्रभाव नाटकाच्या दुसऱ्या अकाच्या दुसऱ्या प्रवेशात तारकेचे प्रतिमान पुन्हा पुन्हा आले आहे. या प्रवेशाच्या पहिल्या आठनऊ पानात हें प्रतिमान चौदा वेळा आलें आहे. चद्रप्रकाशाच्या नाजूक झोताने ताराची बरसात कमी झाली असे भूपाल म्हणतो; आणि हा तारकालोप पाहिल्यावर वसुधरेच्या मनात उत्कंठेचे काहूर जमावयास लागते. याठिकाणीं गडकऱ्यांनी वसुंधरेच्या तोंडीं ‘ नाचत ना गगनात, नाथा ! तारांची बरसात ’ हे अप्रतिम सौंदर्याने नटलेलें गीत घातलें आहे. तारका हे गडकऱ्याना पावित्र्य व मागल्य याचें प्रतीक वाटत असे याचा पुरावा भूपालाच्या भाषणात आढळेल. “ नुकतेंच देवाजवळून आलेल्या निष्पाप बालकाचे स्वभावतःच वरतीं पाहणारे डोळे, आपल्या घरच्या ओळखीनें ताराकडे पाहतात. ” भूपालाच्या या उद्‌गारांतील कल्पना आणि विशेषतः त्यातील तारकेचे प्रतिमान पाहिल्यावर वर्ड्स्वर्थच्या एतत्सदृश कल्पनेची आठवण होणें अगदी अपरिहार्य आहे.

Our birth is but a sleep and a forgetting,
The soul that rises with us, our life's star,
Hath had elsewhere its setting,
And cometh from afar,
Not in entire forgetfulness,
And not in utter nakedness,
But trailing clouds of glory do we come
From God who is our home
Heaven lies about us in our infancy![४]

काळोख्या रात्रीं चमकणाऱ्या तारकांचें दृश्य गूढरम्य असतें आणि त्यामुळे कसली तरी विचित्र भीति हृदयाला व्यापून टाकते, आणि चद्राच्या प्रकाशात त्या विरून जात असलेल्या पाहताक्षणींच कसली तरी गूढ हुरहूर चित्ताचा ठाव घेते असे भूपाल म्हणत आहे.

"काळ्या अंधाराच्या पोटीं याना चकाकताना पाहिलें म्हणजे माझ्या मनात भीतीच्या भावना उत्पन्न होतात आणि चंद्रिकेच्या रसात तारामागून तारा विरघळताना पाहून मनाला खेद वाटतो."

गूढरम्य दृश्याच्या अवलोकनाने मनात करुणखिन्न कल्पनांचें काहूर जमूं लागतें असा अनेक रोमॅंटिक कवींनी आपला अनुभव सांगितला आहे. गडकऱ्याच्या मनातील या संवेदनेचा आविष्कार भूपालाच्या वरील उद्गारात उत्कृष्टपणें झालेला आहे.

तारका हे देवताचे डोळे होत ही कल्पना पुण्यप्रभावांत कालिंदीच्या तोंडीं दोन वेळा आली आहे.

जीवाच्या जळत्या ज्योति
आकाशी तारा होती,
मोलाची माणिकमोतीं,
त्या डोळ्यानीं देवराय तुज पाही......

या सारखाच दुसरा उल्लेख सहाव्या अंकाच्या दुसऱ्या प्रवेशांत आला आहे.

" हे वनदेवींनों, हे गगनदेवतांनों, तुमच्या फुलांच्या आणि ताऱ्याच्या डोळ्यांनीं तुम्ही सर्व कांहीं पाहत आहां...... ! "

आपल्या मुलाला खाचेंत पुरण्याचा घोर प्रसंग आल्यामुळे हें असलें क्रूर कृत्य पविल तारकाच्या तरी नजरेस पडू नये असे कालिंदीला वाटत आहे.

" रजनि, आपले चिमुकले डोळे झांकून घे; नाहीतर माझें हें अघोर कर्म पाहून हे तुझे तेजस्वी डोळे भीतीनें काळवंडून काळे ठिक्कर पडतील. "

तारकांनी आपले क्रूर कृत्य पाहूं नये या कालिंदीच्या उद्गारातील तळमळीची जाणीव झाल्याबरोबर देस्देमोनाचा खून करावयास उद्युक्त झालेल्या ऑथेल्लोचे उद्गार आठवणे स्वाभाविक आहे.

It is the cause, it is the cause, my soul,
Let me not name it to you, you chaste stars !

आणि शेवटीं आई आपल्या मुलाच्या मृतदेहावर माती टाकावयास तयार होते या कारुण्यपूर्ण दृश्याने तारका दयार्द्र व्हाव्यात अशी इच्छा कालिंदी व्यक्त करते.

हे तारानो, उचंबळूं द्या करुणारसरंगा'......

प्रणयोन्मादाच्या बेभान अवस्थेत शेक्स्पियरच्या रोमियोला जूलियट् ही आकाशांतील दिव्य तारका आहे असें वाटत असतें, आणि उलट रोमियोविषयीं नेमकी तीच भावना जूलियट्च्याहि मनात प्रादुर्भूत होते. जूलियट्चे मोहक नेत्र म्हणजे आकाशांतील दोन दिव्य तारकाच आहेत ही कल्पना रोमियोच्या चित्तात अगदी दृढमूल झालेली आहे. दुसऱ्या अंकाच्या दुसऱ्या प्रवेशांत जूलियट्च्या बाल्कनीखाली उभा असलेला रोमियो वर खिडकींत जूलियट् दिसल्याबरोबर भावनावश होऊन म्हणतो—

Two of the fairest stars in all the heaven,
Having some business, do entreat her eyes
To twinkle in their spheres till they return.
What if her eyes were there, they in her head ?

या सर्वच ओळींतील, विशेषतः शेवटच्या ओळींतील कल्पनेचें कांही अंशांत विलक्षण साम्य हाय हाय ! या गडकऱ्यांच्या कवितेतील पुढील ओळींत मला दिसून आलें.

लाख तारका नभी सहज या ठेविल्यात देवा,
दोनच का या नयनिं कोंडिल्या, त्याहि तिथे ठेवा !

गडकऱ्यांच्या कवितामध्ये तारांच्या तेजाचा उल्लेख आणखी कितीतरी ठिकाणीं आलेला आहे. पण ते उल्लेख प्रतीकाच्या स्वरूपाचे नसल्यामुळे मीं त्यांच्याकडे दुर्लक्ष केलें आहे. तथापि तारकांविषयीं गडकऱ्यांना आनिर्वचनीय, विचित्र, आकर्षण वाटत होतें याचाच त्या उल्लेखात पुरावा आढळेल. तारकेचें प्रतिमान गडकऱ्याच्या दोन नाटकात व अनेक कवितांत इतक्या वेळा पुनरुक्त झालें आहे की, गडकऱ्यांच्या अंतर्मनातील गूढ भावनांशीं त्यांचा काहीतरी — अगदी निकटचा सुद्धा — संबंध असलाच पाहिजे हा विचार चित्तांत बळावूं लागतो. माणसाचे मन जेव्हा एकाच विशिष्ट वस्तूभोवती अथवा त्या वस्तूशीं निगडित असलेल्या सहचारी कल्पनाभोवती एकसारखें घुटमळत राहतें ( मग त्या मनाला या गोष्टीची जाणीव असो अथवा नसो ! ), अगदी नकळत एकाच प्रतिमानाचे उल्लेख पुन्हा पुन्हा त्याच्या काव्यात अथवा नाटकांत येऊं लागतात, परिस्थितीचें बलवत्तर बाह्य कारण नसतांहि, म्हणजे त्या प्रतिमानाचा उल्लेख सर्वस्वीं आवश्यक नसला तरी, त्याचें मन जेव्हा अगदी अभावितपणें त्याच प्रतिमानाच्या उल्लेखांत अनावर आनंद मानूं लागतें, तेव्हा त्या प्रतिमानाचा त्याच्या गूढ आणि अनिर्वचनीय भावनांशीं अगदी जवळचा प्रत्यक्ष संबंध असला पाहिजे असा तर्क आपण केला तर त्यात प्रमाद होण्याची भीति मुळीच नाही असें समजावें. याच न्यायाने गडकऱ्याना अत्यत प्रिय असलेल्या तारका या प्रतिमानाचा विचार केला असता त्यांच्या मनांत खोलवर दडलेल्या, आणि त्यांनाहि अज्ञात असलेल्या, भावनांच्या सूक्ष्म छटांचा प्रत्यय आपणांस येऊं शकेल. परिपूर्ण जीवनाचीं स्वप्नसृष्टींतील मोहक दृश्यें व दुष्प्राप्य ध्येयें; स्वर्गीय

सौंदर्याच्या सांनिध्याचा वेडगळ, अतर्क्य हव्यास; दिव्य प्रेमाच्या प्राप्तीसाठी आसुसलेल्या मनांतील अमर्याद इच्छाचे काहूर—थोडक्यात, जे जें कांही स्पृहणीय, अभिलषणीय, परंतु पराकाष्ठेचे दुष्प्राप्य, त्याचें व त्याच्याशीं निगडित असलेल्या कल्पनांचें प्रतीक म्हणजे तारका! ही तारका आपल्या सामर्थ्याच्या सर्वस्वीं बाहेर आहे, तिच्या प्राप्तीसाठी तळमळत बसणे हा शुध्द वेडेपणा आहे, ही आत्मवचना आहे, हा आत्मघात आहे, इत्यादि कटु व्यावहारिक सत्यांची जाणीव मधून मधून तीव्रतेने होत असली तरी या अलभ्य व गूढरम्य तारकेची भुरळ गडकऱ्याच्या मनावर जी पडली होती ती कायमचीच ! स्वप्नांतील दृश्ये केवळ आभासात्मक असून जागृतींत त्याचा मागमूसहि उरत नाही, तीं एकदा विरून गेल्यावर त्याच्या उन्मादक मोहकपणाला पुन्हा आकार प्राप्त करून देतां येणे शक्य नाही, हे सारे सारे चागले माहीत असलें तरी स्वप्नसृष्टीची मोहिनी किंचित् तरी कमी होते काय ? उलट आयुष्यात असे कांही क्षण येतात की त्या वेळीं ही स्वप्नसृष्टीची ओढ अनावर होते, आणि सत्यसृष्टींत अप्राप्य ठरलेलीं सारी ईप्सिते या स्वप्नसृष्टींत भावनावश मनुष्य प्राप्त करून घेत असतो, आणि जागृतींत आपल्या डोळ्यांसमोर तरळून जाणाऱ्या अनेक दिव्य आभासांचे काही तरी प्रतीक तयार करून त्या प्रतीकाच्या द्वारे तो आपल्या अतृप्त आकाक्षांचें साफल्य करून घेण्याची धडपड करीत असतो. ही धडपड वाया जाणार नाही असा भरवसा कोण देऊ शकेल ? ती वाया जाण्याचीच भीति अधिक ! तथापि त्या आभासाचे सौंदर्य असें काही विलक्षण असते की, सत्यसृष्टींत ते अवतीर्ण झाले नाहीत तरी अभिलाषेत रंगलेले मनुष्याचे मन त्यांचा मोह सोडूंच शकत नाही. एका आशेतून दुसऱ्या आशेचा जन्म होत असतो, आणि मॅथ्यू आर्नोल्डने म्हटल्याप्रमाणें

> Still nursing the unconquerable hope,
> Still clutching the inviolable shade

अशी वृत्ति झाल्यामुळे मनुष्य डोळ्यांत सारे प्राण गोळा करून, पायांखाली काय आहे याचा थोडा सुद्धा विचार न करतां, आजूबाजूला पसरलेल्या कांटेरी [illegible] दुर्लक्ष करून क्षितिजाव[illegible]

दूर दूर कोठेतरी लुकलुकणाऱ्या तारकेच्या तेजस्वी सौंदर्याकडे अनिमिष नेत्रांनी पाहत बसण्यांत जीवितार्चे सर्वस्व मानूं लागतो, आणि

सतेज वचने देई तारा, परी लकाके नभामधीं,
खाली येइल परी कधीं ?

अशा आर्त उत्कंठेच्या मोहक व धडधडत्या हुरहुरींत धुंद होऊन राहतो. हा वेडेपणा आहे असे कोणी रूक्ष, व्यवहारी लोक म्हणोत; पण भावनावश हृदयाचा तो स्वभावच असतो. गडकऱ्यांचा स्वभाव असाच होता; आणि या स्वभावा-पोटीं निर्माण झालेले त्याचे तारकेच्या प्राप्तीचें विचित्र वेड शेलीच्या पुढील ओळींत प्रकट झालें आहे.

The desire of the moth for the star,
Or the night for the morrow,
The devotion to something afar
From the sphere of our sorrow ..



# ११. दिव्य प्रेमाची जाति

Love is not love
Which alters when it alteration finds.
—*Shakespeare*

"A conflict between desire and renunciation—a massacre of longings with doubts of constancy"
—*Emil Ludwig*

स्त्री आणि पुरुष याच्यामध्ये शुद्ध व निष्काम प्रेम असूं शकेल अशी गडकऱ्यांची ऐन तारुण्यात दृढ समजूत असावी. निदान १९१२ च्या सुमारास **प्रेमसंन्यास** लिहिण्याच्या काळात तरी ही समजूत त्यांच्या चित्तात प्रबळ असावी असे दिसते. ही त्याची आदर्श प्रेमाची ध्येयवादी कल्पना दिसते. अभिलाषेने न डागळलेलें, वासनारहित, निष्पाप व निष्काम प्रेम हेच खरें उच्च प्रेम अशी कल्पना अनेक भावनावश रोमॅंटिक कवींमध्ये तारुण्याच्या सुरवातीला तरी बलवत्तर असते. **प्रेमसंन्यास** गडकऱ्यानी लिहिलें तेव्हा ते ऐन पंचविशींत होते. दुष्प्राप्य ध्येयसृष्टींत आणि आभासात्मक स्वप्नसृष्टींत विहार करणारें व काव्यानंदांत रमणारें त्याचें भावनावश मन निष्काम, शुद्ध प्रेमाच्या कांचनमृगाला भुललें असल्यास त्यांत कांहीच नवल नाही. व्यवहारांत असंभाव्य व दुर्लभ असलेल्या अनेक गोष्टींची गडकऱ्यांच्या मनावर फार मोठी मोहिनी होती तारकेचा मोह असलेल्या मनाला अमुक एक गोष्ट अव्यवहार्य व अप्राप्य

आहे अशी शंका तरी कशी यावी ? **प्रेमसंन्यास** ज्या काळात गडकऱ्यांनी लिहिलें त्या काळाच्या आसपास तरुणीच्या प्रेमाच्या प्रत्यक्ष अनुभवाची प्रतीति गडकऱ्यांना कितपत होती हें निश्चयाने सागणें अत्यंत अवघड आहे. १९०४ च्या सुमारास गडकऱ्याचें लग्न झालें. येथपासून १९१२ पर्यंत गडकऱ्याना पत्नीचा सहवास कितपत व कोणत्या प्रकारचा लाभला होता, व तरुण स्त्रीच्या प्रेमाचा कसला साक्षात्कार त्यांना झाला होता याविषयीं त्यांच्या चरित्रात कांहीहि निर्णायक स्वरूपाची माहिती मिळत नाही. अवघ्या तीस वर्षांपूर्वीं दिवंगत झालेल्या गडकऱ्यासारख्या एवढ्या मोठ्या नाटककाराच्या व कवीच्या वैवाहिक जीवनातील घटनाची थोडीहि साधार माहिती उपलब्ध नसावी, आणि या अत्यत महत्त्वाच्या बाबतींत केवळ कांही तर्क करण्याची पाळी यावी यापरतें दुर्दैव कोणतें असू शकेल ? तथापि असा तर्क करण्याखेरीज गत्यतरच नसल्यामुळे, म्हणजे असला कांही तर्क केल्याशिवाय त्याच्या नाटकातील अनेक घटनाचे व किती तरी कवितांचें मर्मच उकलणें शक्य नसल्यामुळे, त्याच्या नाटकातील कांही घटनांच्या आधारें व अनेक महत्त्वाच्या कविताच्या आधारें या बाबतींत काही तर्क करण्याचे मी धाडस करून पाहणार आहें. गडकऱ्याच्या मनातील आशय बराचसा स्पष्ट करता आल्यास पाहावा हाच हेतु माझ्या मनात असल्यामुळे त्याच्या जीवनातील काही नाजूक बाबींत डोकावून पाहण्यांत मी त्याना काही अन्याय करीत आहें अशी शका माझ्या मनात चुकून सुद्धा आली नाही, आणि इतरांच्याहि मनात अशी शका येण्याचें कारण सुतराम् नाही.

आपलें मन कल्पनेच्या काव्यानदांत पूर्ण रमलेलें आहे अशी कबुली **प्रेमसंन्यासां**तील जयंताने अनेक वेळा अगदी स्पष्टपणें दिली आहे. आपल्या वैवाहिक जीवनाविषयींहि त्याने रुचिर कल्पनादृश्यें मनापुढे ठेविलीं असलीं पाहिजेत. आपलीं हीं कल्पनादृश्यें सत्यसृष्टींत अवतीर्ण होण्याची पूर्ण अशक्यता आहे हें जयंताला कळून चुकलें होते. याचा पुरावा पहिल्या अंकाच्या तिसऱ्या प्रवेशांत आहे.

" लहानपणापासून कल्पनेच्या काव्यानंदावर तरंगणारा माझा प्रेमात्मा वस्तुस्थितीच्या वणव्यात पार होरपळून गेला आहे. "

प्रणयिनीच्या बाबतींत त्याच्या आशेच्या कुंचलीने जीं मोहक चित्रें हृत्पटलावर चितारलीं होतीं त्यांच्यांतील रंग अगदी भडक असले पाहिजेत. वस्तुस्थितीच्या प्रखर उन्हाने हे रंग फिकट झाले असल्यास त्यात काय आश्चर्य ?

" नीरस, हृदयशून्य, जडवृत्ति मनोरमेची प्राप्ति आणि तीहि काव्यमय हृदयसर्वस्व लीलेची आशा भग्न झाल्यावर ! "

या एकाच उद्‌गारावरून जयंताच्या वैवाहिक जीवनांतील अपेक्षाभंगाची व नैराश्याची यथार्थ कल्पना येऊ शकेल. पण जयंताच्या वैवाहिक अपेक्षाभंगाच्या बाबतींत तर्क करीत बसण्याचें कांही सुद्धा कारण नाही. तिसऱ्या अंकाच्या चवथ्या प्रवेशात विद्याधराजवळ त्याने आपल्या या नैराश्याचा समग्र पाढा वाचला आहे. मनोरमेचा आपल्याला इतका विलक्षण तिरस्कार कां वाटतो याची कारणमीमांसा करण्याच्या इराद्याने तो विद्याधराला म्हणतो—

" ...लहानपणापासून स्त्रीबद्दल मीं एक मनोरथाचें सुदर चित्र काढून ठेविलें होते ! मी मनोवृत्तींचा गुलाम असल्यामुळे म्हणा, किंवा प्रेमसाम्राज्याचीं काल्पनिक वर्णनें वाचल्यामुळे म्हणा, माझ्या कल्पनेतली माझी भावी स्त्री एखाद्या कादंबरींतल्या नायिकेसारखी होती ! पण मनोरमेच्या एका क्षणाच्या अनुभवानें त्या सुंदर चित्राचे तुकडे तुकडे केले ! तिचे पहिलेच बोलणे माझ्या मनाला विषासारखें वाटून मला तिचा वीट आला ! तें बोलणें कशाप्रकारचें होतें तें स्त्रीपुरुषांच्या रहस्याच्या किल्ल्यांत आहे....! लहानपणापासून उराशीं बाळगलेली काव्यमय कल्पना ऐन फलप्राप्तीच्या वेळीं अशी समूळ नाश पावल्यामुळे मी संसाराविषयीं अगदीं उदासीन झालो. "

हा उतारा बराच मोठा झाला आहे हें खरें. पण आपल्या भावना व्यक्त करण्याची जयंताची पद्धति इतकी उत्कट व प्रामाणिक दिसत आहे की, हें सारें अगदी त्याच्या अंतरंगातून आविष्कृत झालें आहे असें स्पष्ट दिसते. आणि जयत ही बहुशीं गडकऱ्याचीच प्रतिमा आहे हेंहि सत्य असल्यामुळे या उताऱ्यातील अनेक गोष्टींची गडकऱ्याना साक्षात् अनुभवाची प्रतीति असली पाहिजे अशी जबरदस्त शंका येऊं लागते. हे लिहिणें अत्यंत तापदायक आहे हें मला चागलें कळत आहे. पण गडकऱ्यांसारख्या 'आत्यंतिक वृत्तीच्या माणसावर' मनोभगाचा कसला भयंकर परिणाम झाला असला पाहिजे हे त्याच्या स्वभावांतील वैशिष्ट्यें ज्याला समजावून घेता आलीं आहेत त्याला सहज जाणता येईल. जयंत जसा 'मनोवृत्तीचा गुलाम' होता तसेच गडकरीहि मनोवृत्तीचे गुलाम होते. मनोरथाचीं सुंदर चित्रें रगविणे हा जसा जयताचा स्वभावधर्म होता तसाच गडकऱ्याचाहि होता. आणि जयताचा जसा दारुण अपेक्षाभंग झाला तसाच गडकऱ्याचाहि झाला असला पाहिजे ही माझ्या मनाची पक्की खात्री झाली आहे. या अपेक्षाभंगाचे नेमके स्वरूप कोणते होते याचा थोडासा तर्क करण्याइतपत पुरावा माझ्याजवळ आहे. पण तो ऐकीव पुरावा असल्यामुळे येथे माडणें युक्त होणार नाही. वैवाहिक जीवनात गडकऱ्यांच्या आत्यतिक मनोवृत्तीला धक्का बसेल अशी कोणती घटना घडली असावी याची अधिकृत माहिती गडकऱ्याच्याबरोबरच लयाला गेली आहे.

ते काहीहि असले तरी वैवाहिक जीवनात गडकऱ्याचा दारुण अपेक्षाभंग झालेला होता या सत्याकडे कधीहि दुर्लक्ष होता कामा नये. कारण या अपेक्षाभगांतूनच त्यांच्या भावजीवनातील अनेक महत्त्वाच्या घटना घडलेल्या आहेत. प्रेमसन्यासांतील लीलेचे जयताशीं लहानपणीं थट्टेत लग्न ठरलें होतें असें दिसतें (अंक २, प्र. ५). लीलेच्या बाबतींत आपला आशाभग झाल्यानतर मग आपलें मनोरमेशीं लग्न झाले असें जयतहि म्हणत आहे (अंक १, प्र. ३). 'लहानपणाच्या थट्टेतल्या लग्नाच्या लोभानें जयंत लीलेच्या निराश आशेवर जीव काढतो' अशी कमलाकराचीहि साक्ष आहे (अंक १, प्र. ४). विवाह होण्यापूर्वीं गडकऱ्यांचा असला कांही आशा-

भंग झालेला असावा काय ? निर्णायक मत देतां येईल असा पुरावा या बाबतींत मुळीच उपलब्ध नसल्यामुळे स्वस्थ बसणें भाग आहे. तथापि त्यांच्या एका कवितेंतील पर्यायानें आलेल्या उल्लेखावरून कांही तर्क या बाबतींत करतां येईल काय ? ही कविता गडकऱ्यानी बोरिवली मुक्कामीं १६ फेब्रुवारी १९१८ या दिवशीं लिहिलेली आहे. म्हणजे मृत्यूपूर्वी एका वर्षाच्या आत ही कविता त्यांनी लिहिली. या कवितेवर नैराश्याची, अपेक्षाभंगाची व औदासीन्याची दाट छाया पसरलेली आहे. जुन्या कवितांची आठवण हें या कवितेचें नाव.

> साऱ्या त्या कविता तशाच असती, ते अर्थही त्यापरी
> शाळाही अजुनी नवीच दिसते त्या रम्य जागेवरी
> * * ! वाहतसे भरूनि दुथडी 'उल्हास' तेव्हा जशी,
> गेला वाहुनि काळ तो, सकळ तीं सौख्येंहि त्याचीं तशीं ॥
> आनंदे भरले असे जग तसे आताहि * * ! पहा,
> ! * ही असतील त्यापरि किती लोकात रम्या अहा !
> प्रेमाचीं नवजीवनेंहि दिसती स्वच्छंद चोहीकडे,
> ज्याचे त्यास नसे तरी जगभरी शून्यत्व ये रोकडे ॥
> बाले, दृष्टि मनोहरा मजवरी तू टाकिली ज्या क्षणीं,
> गेला तो क्षण साग माप्रत कुठे ? हें शल्य राही मनी !
> काळाच्या उदरात खोल दडला जाऊनि कोठे तरी
> * * ! शोकच शेष आज उरला प्रेमातुनी अंतरीं ॥
> विद्यादानि नसे विशेष गति त्या बाल्यात आम्हा तशी,
> प्रेमाचा पहिला धडा गिरविला निर्दोषशा मानसी !
> * * ! ती वचने मरून पडलीं, पद्यात त्या पाठवी,
> 'गोविंदाग्रज' आज विव्हल मने. * * ! तुला आठवी !

या कवितेंत सहा ठिकाणीं फुल्या असून गाळलेला शब्द दोन अक्षरी आहे हें अगदी उघड आहे. या सहापैकीं पाच ठिकाणीं हा दोन अक्षरी शब्द म्हणजे एका मुलीचें नांव असले पाहिजे हेंहि उघड आहे. या कवितेंतील निर्देश 'व्यक्तिगत' आहे असे डॉ. हर्षे हेंहि मान्य करीत आहेत.[१] ते पुढे म्हणतात– "त्यांच्या हृदयाला अगदीं पहिला प्रेमस्पर्श या ठिकाणीं झाला असे दिसतें.

बहुधा हा प्रसंग कर्जत येथील असावा... या कवितेंत उल्लेखिलेल्या व्यक्तीचें नांव त्र्यक्षरी आहे असें गाळलेल्या अक्षरांवरून दिसतें." या कवितेंत 'उल्हास' नदीचा स्पष्ट उल्लेख आहे; आणि १९०० पर्यंत गडकरी कर्जतला होते अशी श्री. खाडेकराची साक्ष आहे.[२] तेव्हा सदर कवितेंत उल्लेखिलेली घटना कर्जत येथेच घडली असली पाहिजे यांत तिळमात्र संदेह नाही. घटनेचा काळ १९०० च्या सुमाराचा आहे. म्हणजे गडकरी या वेळीं पंधरा वर्षांचे होते. कर्जत येथील वास्तव्यात भावनावश गडकऱ्याचा एखाद्या मुलीशीं निकटचा सहवास होऊन तिच्याविषयीं त्यांच्या मनात मृदु भावनाचा उद्‌भव झाला असण्याची शक्यता आहे काय ? या कवितेंतील भावनाचा आविष्कार अत्यंत प्रामाणिक व उत्कट झालेला आहे. तथापि एखाद्या काल्पनिक घटनेचा उल्लेख करून आपल्या मनोरथाचें ते कोडकौतुक पुरवीत असावेत अशी शका कोणा सशयात्म्याला येईल. पण मला तशी शका मुळीच आली नाही. गडकऱ्यानी या कवितेत आत्माविष्कारच केलेला आहे अशी माझी खात्री झालेली आहे. एक तर ही कविता गडकऱ्यांनी मृत्यूची चाहूल लागल्यावर लिहिलेली आहे. या काळातील गडकऱ्याच्या शारीरिक व मानसिक अवस्थेचा विचार केला असता काही कल्पनादृश्याचें वर्णन करून आपल्या मनाला ते याप्रकारे विरगुळा देतील ही गोष्ट मुळीच सभवनीय नाही. दुसरे असें की, या कवितेत उल्लेखिलेली घटना जवळ जवळ पधरा वर्षांपूर्वी घडलेली होती. इतक्या दूरच्या काळातील घटना त्याच्या मनांत आयुष्याच्या अखेरच्या काळात स्मृतिरूपाने जागृत होऊन त्याचें मन अस्वस्थ झालें असणे शक्य आहे. गडकऱ्याच्या स्वभावाचीं जीं वैशिष्ट्यें आपण मागे पाहिलीं आहेत त्यावरून यात असंभाव्य असे कांहीहि दिसणार नाही. शरीर रोगाने जर्जर झाले असता व मृत्यु केव्हा झडप घालील याचा नेम नसता मनुष्य खोटीं, काल्पनिक प्रेमचित्रें काढीत बसत नाही. जे त्याच्या काळजांत शल्यासारखें सलत असतें त्याचाच उल्लेख तो करीत असतो हें लक्षात ठेवावयास पाहिजे. मरणाच्या खात्रीने स्वतःच्या देहावर मृत्यूच्या दरबाराची सत्ता कबूल करणारा सुधाकर 'अशा वेळीं मी उचंबळून बोलत आहें' असें म्हणतो. गडकरीहि

आयुष्याच्या या शेवटच्या अवस्थेंत असेच 'उचंबळून' बोलत आहेत; आपल्या मनात खोलवर रुजलेल्या भावना, अनेक वर्षें दडपून टाकलेल्या भावना, अगदी प्रामाणिकपणें या कवितेत गडकऱ्यानी व्यक्त केल्या आहेत. मृत्यूचा पायरव कानी आल्यावर मनुष्य अप्रामाणिक राहूंच शकणार नाही. तात्पर्य, या कवितेंत व्यक्त झालेल्या भावना गडकऱ्यांच्या चित्तात किती तरी वर्षें स्थिर होत्या; आतां त्याच्या पुनःप्रत्ययाच्या आनदांत गडकरी तल्लीन झाले आहेत. ही कविता लिहिण्यापूर्वीं फक्त सहाच दिवस गडकऱ्यानी पुनःप्रत्ययाच्या आनदाने परिपूर्ण असलेली एक भावनोत्कट कविता लिहिली होती. त्याहि कवितेंत याच घटनांचा उल्लेख आहे अशी माझी खात्री आहे. **फणसाचें पान** हें त्या कवितेचें नाव. बोरिवली मुक्कामींच १० फेब्रुवारी १९१८ रोजी ही कविता लिहिलेली आहे. आणि वर उल्लेखिलेली कविता १६ फेब्रुवारीची आहे. **फणसाचें पान** या कवितेंत उल्लेखिलेली घटनाहि फार पूर्वीं घडलेली आहे. याला अंतर्गत पुरावा आहे.

> फणसाच्या त्या पानावरतीं दिसल्या ज्या मज रेषा,
> कधींकाळच्या उघडुनि दाविति मनिंच्या आतरवेषा !
> लिहुनि ठेविली पूर्ववयामधि कथा गोड जी पानी
> पुन्हा वाचिली आणि जाहला सखेद हर्षहि रमाणि !

या ओळींतील 'कधींकाळच्या' आणि 'पूर्ववयामधिं' हे शब्द फार महत्त्वाचे आहेत. फार दूरच्या काळाला उद्देशून हे शब्द असले पाहिजेत. सहज पायाखाली फणसाचे पान दिसल्याबरोबर फार दूरची ती रम्य घटना गडकऱ्याना आठवली आहे. त्या फणसाच्या पानाशी ती घटना सलग्न असली पाहिजे हें उघड आहे. फणसाच्या पानावर त्या मुलीचें नांव तर लिहिलेलें नसेल ना ?

> गाव कुणाचे–नाव कुणाचे–आणि कुणाचे पान ?
> सरोवराला परका मधुकर करित रसाचे पान !

दुसऱ्या ओळीतील आशय स्पष्ट आहे. कोणीतरी परका मनुष्य येऊन त्या मुलीला घेऊन गेला असा याचा अर्थ असला पाहिजे. असली ही

'मदपूर्णा' कथा सुमारें अठरा वर्षांनी फणसाचें एक पान दिसल्याबरोबर गडकऱ्यांना आठवली; आणि त्यांनी

डोळे झाकुनि भरभर फिरुनी कथा वाचिली मग ती !

**फणसाचें पान** या कवितेंतील भावनाविष्कारहि अत्यंत व प्रामाणिक आहे. वस्तुस्थितींत प्रत्यक्ष घडलेली घटनाच गडकऱ्यांच्या डोळ्यांसमोर जशीच्या तशी आता उभी राहिलेली आहे अशी खात्री पटावी इतका हा आविष्कार उत्कट झाला आहे. अगदी उचंबळून येऊन गडकऱ्यानी ही कविता लिहिलेली आहे यात कसलाहि संदेह नाही. आणि या उत्कट भावनांचा सारा प्रकर्ष पुढील ओळींत झाला आहे.

सुंदर चित्रा ! मदपूर्णा ती कथा तुझी आठवते,
बाले ! रमणि ! प्रणयभरानें हृदय किती खळबळते !
सळसळतीं हीं आजहि, सखये, भंवतीं हिरवीं रानें,
'गोविंदाग्रज' परी शोधितो तीं फणशीचीं पानें !

'तीं' फणशीचीं पानें आता कशीं दिसणार ? तीं केव्हाच अनंतात विलीन झालीं ! पण त्याची स्मृति— ? ती कशी नष्ट होणार ?

या दोन पराकाष्ठेच्या भावनोत्कट कविता वाचल्यानंतर गडकऱ्यांच्याच एका प्रसिद्ध कवितेचे शीर्षक डोळ्यांपुढे उभें राहतें. ती कोण ? — या दोन कवितामध्ये उल्लेखिलेली ही बाला कोण ? दोन्ही कविता एकाच बालेला उद्देशून लिहिलेल्या आहेत यांत शंकाच नाही. 'उल्हास' नदीच्या कांठीं राहणारी आणि गडकऱ्याच्या भावनावश मनाला उल्लसित करणारी ही बालिका कोण ? गडकऱ्यानी तिच्या नावाचा उच्चार केलेला नाही. 'नाव घेतल्यावाचुन आता मनात झुरणें आलें' या **निर्दय बालेस** या कवितेतील ओळींत व्यक्त होणारें दुर्दैव गडकऱ्याच्या पाचवीला पुजलेलें होते. गडकऱ्यानी त्या बालेच्या नावाच्या जागीं फुल्या टाकल्या आहेत. कदाचित् आरंभीं लिहिलेलें नाव खोडून टाकून त्याऐवजीं फुल्या टाकल्या असतील. कदाचित् तें नांव लिहिण्याचा त्याना धीरच झाला नसेल. पण ही कविता अत्यंत काळजीपूर्वक वाचून पाहिल्यावर, पुन्हा पुन्हा वाचून पाहिल्यावर, त्या नांवाचा छडा लागेल असा एक नाजूक धागा मला सापडला. सुताने

स्वर्गात जाण्याच्या प्रकारासारखाच हा कार आहे असेंहि कांहींना वाटेल. पण असलाहि प्रयत्न कधी कधी करावा लागतो. शेक्स्पियरच्या सॉनेट्स-मधील *Dark Lady* कोण ? या प्रश्नावरच्या वादंगांत आतांपर्यंत कितीतरी टीकाकारानीं भाग घेतला आहे आणि शेकडो पानें या वादाच्या चर्चेत खर्च झालीं आहेत ! "Love is too young to know what conscience is" या ओळीने सुरू होणाऱ्या १५१ व्या सॉनेटमध्ये शेक्स्पियरने आपल्या प्रेयसीचें नाव मोठ्या कौशल्याने, पर्यायोक्तीच्या अवगुठनांत दडवून, गुफलें आहे असे टायलर या टीकाकाराचे निश्चित मत असल्याचें जॉर्ज ब्रँडासने नमूद करून ठेवले आहे. [3] मेरी फिटन नावाची स्त्री शेक्स्पियरची प्रेयसी होती आणि तिलाच उद्देशून शेक्स्पियरने सुमारे पंचवीस सुनीते लिहिलीं आहेत असा सशोधकाचा आग्रह दिसतो. वर उल्लेखिलेलें १५१ वे सुनीत मीं असंख्य वेळा वाचलें. पण मला तरी सदर नावाचा त्यांत थागपत्ता लागला नाही. आता, त्यांतील श्लिष्ट शब्दाचा बोध न झाल्यामुळेहि कदाचित् मला हे नाव त्यात सापडलें नसेल ! शेक्स्पियरच्या सुनीताच्या बाबतींत ही अडचण असली तरी गडकऱ्याच्या कवितेच्या बाबतींत ही अडचण आहे असे मला वाटत नाही. शेक्स्पियरला वर उल्लेखिलेल्या सुनीतात आपल्या प्रेयसीच्या नावाचा उल्लेख करावयाचाच असेल याला प्रत्यक्ष पुरावा काही नाही· पर्यायोक्तांतून आणि श्लिष्ट भासणाऱ्या शब्दातून टीकाकारानी तें नाव शोधण्याचा उपद्व्याप केलेला दिसतो. परतु गडकऱ्यांना आपल्या प्रेयसीचें नांव लिहावयाचे होते हे ठिकठिकाणीं असलेल्या फुल्यांवरून स्पष्ट होईल. त्याना तें नांव प्रत्यक्ष लिहिण्याचा धीर झाला नाही ही गोष्ट वेगळी !

मग जुन्या कवितांची आठवण या कवितेंत फुल्यांच्या जागीं अदृश्य असलेले नाव कोणतें ? एकदर सहा ठिकाणीं जागा रिकामी सोडलेली असून तेथे दोन फुल्या आहेत. पैकी पांच ठिकाणीं फुल्यांच्या पुढे उद्गारचिह्न असून फक्त एका ठिकाणीं उद्गारचिह्न नाही व 'ही' या अव्ययाने तो शब्द युक्त आहे. ज्या ठिकाणीं उद्गारचिह्न आहे त्या ठिकाणीं सबोधन आहे हे उघड आहे. खालीं दोन ओळी मुद्दाम उद्धृत करीत आहे.

आनंदे भरलें असे जग तसे आताहि * * ! पहा,
* * ही असतील त्यापरि किती लोकात रम्या अहा !

पहिल्या ओळींत * * ! हें संबोधन आहे. पण दुसऱ्या ओळींत ते संबोधन नसून 'सुद्धा' या अर्थाच्या 'ही' या अव्ययाने युक्त असलेलें एक प्रथमान्त नाम तेथे असलें पाहिजे. हे प्रथमान्त नामहि गाळून टाकण्याचें कारण स्पष्ट आहे. पहिल्या ओळींतील सबोधनांत जें विशेषनाम अंतर्भूत झालेलें आहे तेच दुसऱ्या ओळींत सामान्यनाम म्हणून आलें असले पाहिजे. सामान्यनाम आणि विशेषनाम हीं दोन्ही एकाच शब्दात अतर्भूत होऊं लागल्यामुळे दुसऱ्या ओळींतहि गडकऱ्याना तो शब्द गाळणे भाग पडलें असलें पाहिजे. दुसऱ्या ओळींत ( मुळातील सहाव्या ओळींत ) गाळलेला शब्द 'तारा' हा असला पाहिजे. हा शब्द घातल्याबरोबर ही ओळ अशी होईल—

ताराही असतील त्यापरि किती लोकात रम्या अहा !

आणि या ओळीच्या वरची ओळ अशी होईल—

आनदे भरले असे जग तसे आताहि तारे ! पहा !

या ओळी उलट्या करून वाचल्या म्हणजे मुळातील पांच व सहा या दोन ओळी अशा होतील—

आनदे भरले असे जग तसे आताहि तारे ! पहा !
ताराही असतील त्यापरि किती लोकान रम्या अहा !

'तारा' या शब्दाचे गडकऱ्याना कसलें विलक्षण चमत्कारिक वेड होतें हें मागे एका प्रकरणात स्पष्ट करून दाखविलेच आहे. तारकेचे त्याचें हें अमर्याद वेड 'तारा' या विशेषनामांतून तर निघालें नसेल ना ? मला तशी दाट शंका येते. 'तारा' हा शब्द गडकऱ्यांनी कारण नसतांना सुद्धा इतक्या वेळां वापरला आहे की अशी शंका येणें अपरिहार्य आहे. कोठून तरी त्या शब्दाच्या उच्चारामुळे होणारा आनंद त्याच्या अंतरंगाला उपभोगा-वयाचा होता असें दिसतें. उदाहरणार्थ हृदयशारदेस या कवितेंतील पुढील ओळी पाहा.

अनंत तारा, अखंड वारा, नच माझ्या कामीं !
माझी तारा, माझा वारा, तुझ्या प्रेमधामीं !

दुसऱ्या ओळींतील ‘ माझी तारा ’ हे शब्द निःसंशय शंकास्पद आहेत. आणखीहि उदाहरणें देतां येतील. त्याच तारकेस याचना हे मागचें प्रकरण यासाठी पुन्हा एकदा वाचावे लागेल. मानसशास्त्रज्ञांनी या ‘प्रकरणा’चा अवश्य विचार करावा व त्यांत काही मतलब असल्यास तो आम्हास अवश्य विशद करून सांगावा. मला वाटतें, आपल्या मनांत हरप्रयत्नाने कोंडून ठेवलेल्या भावना गडकऱ्यांच्या अंतर्मनांतून त्याना नकळत उफाळून आल्या व तारा या शब्दांतून त्या प्रकट झाल्या, व अशा रीतीने त्यांच्या भावनाचे ‘ सब्लिमेशन् ’ झाले. परतु प्रत्यक्ष कवितेत तें नाव लिहिण्याचा प्रसग आल्याबरोबर त्यांचा धीर खचला. तरी सुद्धा त्याना अगदी नकळत एका ओळींत त्याच्या अतर्मनाचा व्यापार प्रकट झालाच आहे !

“ दुसऱ्याला फसविताना मनुष्याचें मन जी सावधगिरी वापरीत असते तीपेक्षा स्वताचीच फसवणूक करण्यासाठीं केलेले मनाचे डावपेच कितीतरी खोल असतात ! ”

हे पुण्यप्रभावांतील ईश्वराचे उद्‌गार गडकऱ्यांनाहि पूर्णपणें लागू आहेत असें वाटतें.

गडकऱ्यांच्या एका कवितेत जिचा सबंध आला आहे व जिच्या नावाची जागा गडकऱ्यानी फुल्या ( या फुल्या म्हणजे तारकेचीच आकृति नसते का ? इंग्रजींत अशा फुलीला asterisk—star—तारका—अशीच संज्ञा आहे ! ) देऊन मोकळी सोडली आहे या साध्या गोष्टीचा इतका प्रपंच करून काय फायदा होणार अशी शका पुष्कळांच्या मनांत येईल हें मला चांगले माहीत आहे. हें नांव मुळीच कळले नाही म्हणून गडकऱ्यांच्या कवितांच्या रसग्रहणात कांहीहि बाध येणार नाही हेंहि मला चांगले माहीत आहे. तथापि, ज्या कवीच्या कवितांचा सूक्ष्म अभ्यास करावयाची प्रतिज्ञा आपण केली आहे, व त्या कवितात व त्याच्या नाटकांत आविष्कृत झालेल्या त्याच्या भावनांच्या

परिशीलनाच्या द्वारें त्याच्या अंतरंगाचा ठाव घेण्याची लालसा आपल्या चित्तांत प्रबळ झाली आहे, त्याच्या अंतर्मनाचे काही अतर्क्य, गूढ व अनिर्वचनीय व्यापार समजावून घेता येणे जर शक्य झाले तर ते का सोडावे या एकाच विचाराने प्रेरित होऊन मीं वर या विषयाचा इतका विस्तार केला आहे.

पूर्ववयात एखाद्या मुलीशीं गडकऱ्याचा बराच परिचय होऊन त्या परिचयाला प्रेमभावनेचे स्वरूप जर खरोखरच आलें असेल तर प्रेम-संन्यासांतील जयताच्या अनेक उद्गारांची सगति सहज लावतां येईल. जिच्या बाबतींत प्रेमाचा उद्भव झाला होता अशा लीलेच्या प्राप्तीची आशा भग्न झाल्यावर मग मनोरमेशीं विवाहामुळे सबध आला आणि आपला अपेक्षाभग झाला अशी तक्रार जयत करीत आहे. जिच्यावर प्रेम बसले होते अशा मुलीची प्राप्ती न होऊ शकल्यामुळे निराश झालेल्या गडकऱ्यांचाहि विवाहामुळे जयताप्रमाणेच अपेक्षाभंग झाला असला पाहिजे. या अपेक्षाभगाचा धक्का त्याच्यासारख्या आत्यंतिक माणसाला असह्य वाटला असला पाहिजे यांत शका नाही. पहिल्या प्रेमाच्या निराशेनतर वैवाहिक जीवनात त्याना जर समाधान मिळाले असते तर कदाचित् मनोभगाची व्यथा विसरून ते नवीन जीवनाशीं समरस झाले सुद्धा असते. पण दुर्दैवाने गडकऱ्याना वैवाहिक जीवनात समाधानाची तिरीपहि लाभली नाही. यामुळे अपेक्षाभगाच्या दारुण यातनाचा अनुभव घेत असता त्या पहिल्या प्रेमाच्या स्मृतीभोवती त्याचे काव्यात्म, भावनाप्रधान मन सतत घोटाळत राहिले असले पाहिजे. पहिल्या प्रेमाची ही स्मृति त्याच्या मनात जीवनाच्या अताप्र्यंत प्रबळ होती हें वर उल्लेखिलेल्या कविताच्या लेखनकालावरून स्पष्ट होत आहे. लॉर्ड बायरन् अवघा पंधरा वर्षांचा असतानाच मेरी चॅवर्थ नावाच्या मुलीवर प्रेम करू लागलेला होता. या प्रेमाचे साफल्य होऊं शकलें नाही. तथापि अगदी मरेपर्यंत मेरीची स्मृति बायरन्च्या चित्तात प्रबळ होती, तो तिला कधीच विसरूं शकला नाही असे अनेकांनी नमूद करून ठेवले आहे.[४] या मेरीलाच उद्देशून बायरन्ने अनेक उत्कृष्ट भावगीतें लिहिलीं आहेत. हीं भावगीतें इग्रजी भाषेत नाणावलेलीं आहेत. पहिल्या

प्रेमाची स्मृति बायरन्च्या मनांत जशी शेवटपर्यंत जागृत होती तशीच गडकऱ्यांच्या मनांतहि ती शेवटपर्यंत जागृत असली पाहिजे. पहिल्या प्रेमाची सर पुनर्जात प्रेमाला येणार नाही असें बायरन्चें मत होतें. गडकऱ्यांनाहि तसेंच वाटत असावें हें 'सर्व कांहीं पहिलें म्हणजे पहिलेंच !' या त्यांच्या उद्‌गारावरून दिसतें. *Don Juan* या काव्यांत पहिल्या प्रेमाची महती बायरन्ने पुढीलप्रमाणे वर्णिली आहे —

> But sweeter still than this, than these, than all,
> Is first and passionate love—it stands alone,
> Like Adam's recollection of his fall... .

'कल्पनेच्या काव्यानंदात रंगलेला' गडकऱ्याचा 'प्रेमात्मा' वस्तुस्थितीच्या वणव्यात पार होरपळून गेल्यामुळे त्यांच्या अंतर्मनांत दडलेल्या भावनांना प्रेमसंन्यासांत लीला आणि जयंत यांच्या प्रेमकहाणींत वाचा प्राप्त झाली. आपल्यासारख्याच काव्यात्म वृत्तीच्या भावनावश तरुणीवर प्रणयाची वृष्टि करण्यासाठी आसुसलेलें त्यांचे मन लीलेमध्ये तल्लीन झाले, आणि अपूर्ण राहिलेल्या आकांक्षा अशा रीतीने त्यांनी रमणीय काव्यसृष्टींत पूर्ण करून घेतल्या. या प्रकरणाच्या सुरवातीस स्पष्ट केल्याप्रमाणें त्यांचे मन आदर्शभूत प्रणयजीवनाच्या स्वप्नसृष्टींत ज्या काळात विहार करीत होते त्याच काळात त्यांनीं प्रेमसंन्यास लिहिले. यामुळे शुद्ध, दिव्य, उदात्त प्रेमाचे-थोडक्यांत, सर्व प्रकारे 'आय्डियल' या सदरात पडेल अशा प्रेमाचे चित्र त्यांनी या नाटकांत रंगविले आहे. प्लेटॉनिक लव्हर्ची काही वैशिष्ट्यें या काळात त्यांच्या मनात घोटाळत असलीं पाहिजेत. आणि याच वैशिष्ट्यांचा त्यांनीं प्रेमसंन्यासांत आविष्कार केला आहे. बालपणीं जिच्या प्रेमाचा पहाटवारा अंगावरून वाहत गेला होता, व जिच्याशीं लग्न होईल अशी अपेक्षा निर्माण झालेली होती ती लीला वैधव्यावस्थेत पुन्हां सहवासांत आल्यानंतर विवाहित जयंताचें तिच्याशीं कोणते नाते राहावें हा एक विचित्र व तापदायक प्रश्न आहे. तिच्या प्रेमाची स्मृति जयंताच्या मनांत अगदी ताजी आहे हें त्याच्या पुढील नैराश्यपूर्ण उद्‌गारावरून स्पष्ट होईल.

"परमेश्वरा, मीं बाळपणींच काढलेल्या आशेच्या चित्रावर—

काव्याच्या आत्म्यानें कल्पनासृष्टींत जवळ जवळ सजीव खेळणाऱ्या भावी चित्रावर—असे निराशेचे काळे डाग टाकून मूळच्या मनोहर स्मृतीमुळें तें अधिक भयंकर केलेंस, त्यापेक्षा बाळपणींच तो चित्रपट फाडून का टाकला नाहींस ? ”

पण आता लीलेचे ते तसलें पूर्वींचें प्रेम आपल्यासाठी नाही, आतां तिचा विचार ‘ बंधुप्रेमाच्या दृष्टीनेंच ’ केला पाहिजे, कारण ‘ प्रेम आणि लीला याची कल्पनेतली जोडीसुद्धा जगाच्या दृष्टीनें पापमय ठरेल ’ अशी त्याला एकसारखी भीति वाटत आहे. आपण लीलेशीं ‘ निष्काम बुद्धीनें ’ बोलत असतों अशी तो आपल्या मनाची समजूत घालीत आहे व मनोरमेची तशीच समजूत व्हावी अशी त्याची अपेक्षा आहे. जयंत आणि लीला याचा सहवास आजूबाजूच्या चौकस लोकाच्या डोळ्यांवर येऊ लागून तिच्या वडिलानी दोघाना परस्पराना भेटण्याची बंदी केल्यानंतर तीं दोघे पहाटेच्या वेळीं चोरून एकमेकास भेटतात. कोणत्या विचित्र बंधनाने त्याना पहाटेच्या वेळीं बागेच्या एकांतात असे खेचून आणले ? त्याचे तिच्याविषयींचें जे बंधुप्रेम होते, व तिचे त्याच्याविषयींचे जे भागिनीप्रेम होते त्यामुळे त्याची परस्परास भलत्या वेळीं चोरून भेटण्याची प्रवृत्ति झाली ! दोघेहि आपल्या मनाची विचित्र फसवणूक करीत आहेत यात कसलीच शंका नाही. आपली भेट अगदी ‘ निर्दोष ’ आहे अशी तो ग्वाही देत आहे, आणि आपल्या ‘ निष्पाप बुद्धी ’ ची तीहि खात्री देत आहे. जयंत म्हणतो—

“आजपर्यंत कित्येकदा तरी दिवसच्या दिवस आपण एकमेकाशीं बोलल्यावाचून काढले असतील; पण स्वाधीनच्या गोष्टीमुळें त्याचें आपल्याला काहींच वाटलें नाहीं ! तेंच आता पहा ! ही बंदी केल्याबरोबर कारण नसताही आपल्याला एकमेकाच्या सहवासावाचून एक क्षणभरही रहावेनासें झालें आहे ! आणि अगदी निर्दोष भेटीसाठींसुद्धां अशी पहांटेची चोरटी वेळ ठरवून ठेवणें भाग पडलें आहे ! ” ( अंक २ प्र. ५ )

आत्मवंचनेचा हा एक उत्कृष्ट नमुना आहे! जयंत आपल्या वेड्या मनाची समजूत घालण्याची कसली धडपड करीत आहे ही! शेवटीं लीलेच्या मनाची खात्री त्याला पटते. "माझ्या प्रेमाचे पति--माझ्या जिवाचा विसावा--" असें लीला त्याचें वर्णन करते. आपल्या मनातील साऱ्या दडलेल्या प्रणयभावनाचा इतक्या मोकळेपणाने, अगदी स्पष्टपणे आविष्कार केल्यानंतर आपल्या 'निष्काम' प्रेमाचा बाडिवार लीलेला कसा माजविता येणार हें एक कोडेंच आहे. आणि जयत? लीलेचे आपल्यावर पूर्वीप्रमाणेच अनिवार प्रेम आहे याचा पुरावा प्रत्यक्ष तिच्याच तोंडून मिळाल्यावर त्याच्या शुद्ध, निष्पाप, निष्काम, प्रेमाची चलबिचल झाल्याशिवाय कशी राहणार? भावनावेग अनावर होऊन तो तिचा हात धरतो. लीलेलाहि त्या स्पर्शाचा मोह सोडवत नाही. "या माझ्या देहाला आपल्या उष्ण श्वासाचा विसावा सोडावासा वाटत नाहीं.. या हाताचा आधार सोडवत नाहीं!" असें ती म्हणते. आणि लगेच जयताला आपल्या बंधुप्रेमाची वंचना झाल्याचे समजते व तो म्हणतो—

> "मन पापी आहे तसेच ते अनावरही आहे! अशा स्थितींत शुद्ध भगिनीप्रेमाचा लोप झाल्यावाचून कसा राहील? हा निर्मल बंधुप्रेमाचा ओघ आहे असे मी माझ्या मनाला सागण्याचा प्रयत्न करीत आहे, पण त्याची साक्ष अगदीं निराळी पडते आहे!"

जगांतील साऱ्या प्लेटॉनिक प्रेमिकाची जी आत्मवचना नेहमी होत असते तीच आत्मवचना जयतहि करून घेत होता याचे हे पुरावे अगदी बिनतोड आहेत.

तथापि गडकऱ्याच्या मनाला शुद्ध, निष्पाप, निरभिलाष प्रेमाच्या मृगजळाची जी विलक्षण ओढ होती ती **प्रेमसंन्यास** लिहिल्यानतरहि बरेच दिवस कायम राहिली असावी असे दिसते. 'निराशेत सात्त्विक प्रेम करुणावृत्तीच रूप घेतं' या भगीरथाच्या उद्गारात गडकऱ्याच्या प्लेटॉनिक प्रेमाचे स्वरूप व्यक्त झालें आहे. निराश झालेलें सात्त्विक प्रेम प्रणय-विषयाच्या बाबतींत कधीच तिरस्कार बाळगीत नाही, इतकेंच नव्हे तर,

प्रिय व्यक्तीविषयींच्या त्याच्या आदराला भक्तिभावाचें उत्कट स्वरूप येतें, असेंच गडकऱ्यांना वाटत होतें. जें प्रेम निरभिलाष असेल, ज्याला कसलीहि आशा नसेल तेच प्रेम ' दिव्य ' या संज्ञेस पात्र होईल हें प्लेटॉनिक प्रेमाचें तत्त्वज्ञान पुष्कळच विस्ताराने, फुलवून, त्यानी दिव्य प्रेमाची जाति या कवितेंत माडलें आहे. निष्काम, शुद्ध प्रेमाच्या ध्येयवादाचे स्वरूप या कवितेत यथार्थपणे आविष्कृत झालेले असल्यामुळे अभ्यासकाच्या दृष्टीने तिचे महत्त्व थोर आहे. ही कविता १९१४ मध्ये, म्हणजे प्रेमसंन्यासा-नतर सुमारे दोन वर्षानी गडकऱ्यानी लिहिली आहे. दिव्य प्रेमाची जात विलक्षण असून सामान्य व्यावहारिक प्रेमापेक्षा ती अगदी निराळी असते हें गडकऱ्याना आवर्जून सागावयाचें आहे. या प्रेमाला स्थलकालांची मर्यादा नसते किंवा शक्याशक्यतेची आडकाठी नसते. तारका फार दूर, अनत योजने दूर असलेल्या आकाशात चमकत असते; पण पृथ्वीवर राहून त्या अस्मानातील दिव्य तारकेवर प्रेम करणें, तिच्या प्राप्तीची कसलीहि आशा नसता तिच्यात साऱ्या भावना केंद्रित करणें ही दिव्य प्रीति होय.

तारा गगनी
परि भूवरुनी,
बघना नयनीं
जी सचरते हृदयीं, ती
दिव्य प्रेमाची जाति '

यातून निरभिलाष प्रेमाच्या कल्पनेचा गडकऱ्यानी विस्तार केला आहे. आकाशांतील तारकेवर प्रेम करणे म्हणजेच जें दुष्प्राप्य आहे, आपल्या सामर्थ्याच्या अगदी पलीकडे आहे त्यावर प्रेम करणें होय. व्यावहारिक जगातील लौकिक प्रेमाला प्रेमविषय झालेल्या व्यक्तीकडून प्रत्युत्तराची अपेक्षा असते. परंतु कसलीहि अपेक्षाच जे करीत नाही ते अलौकिक, दिव्य प्रेम होय. भक्त परमेश्वराच्या ठायीं आपल्या सर्व प्रेमळ भावना केंद्रित करतो व त्यावर आपल्या प्रेमाचा वर्षाव करतो. हें प्रेम भक्तीच्या उदात्त स्वरूपात परिणत होत असतें. भक्ताच्या भक्तीला ज्याप्रमाणें परमेश्वराकडून मोबदल्याची अपेक्षा नसते त्याप्रमाणें दिव्य प्रेमांत तन्मय

झालेल्या प्रेमिकाला प्रेयसीकडून प्रातिशब्द मिळण्याची आकांक्षा नसते. किंबहुना प्रेसयलिा या प्रेमाची जाणीव झाली नाही तरी त्याची त्याला खत वाटत नाही. पृथ्वीवरील मानव आपल्यावर उत्कट प्रेम करीत असतील याची तारकेला पुसट तरी कल्पना असू शकेल काय? तरी सुद्धा त्या तारकेचा एखादा किरण लाभला तरी आपल्या भावनाचे साफल्य झाले असे वाटावयास हरकत नसावी. तात्पर्य, असलें हे प्रेम आशाच करीत नसल्यामुळे नैराश्याचें भय त्याला वाटण्याचे कारण नाही.

न मिळे अवसर अभिलाषा ।
' दे घे ' ची नाहीं भाषा ॥
भाव आमचा थरारला ।
तरि दादहि त्याची न तिला ॥
एखाद्या किरणापुरता ।
प्रेमबंध होतो पुरता ॥
जिच्या जिवाला
निठ मोबदला
नकोच कमला
निराश जन्मापासुनि ती
दिव्य प्रेमाची जाति ॥

आपल्या अंतःकरणात भावनाचा उन्माद ओसडून वाहू लागला, आपल्या चित्तवृत्ति थरारल्या तरी या बेभान अवस्थेची जिला यत्किंचित् जाणीव नसते आणि तरी सुद्धा जिची मोहिनी आपल्या चित्तात एक प्रकारची गोड धुंदी निर्माण करावयास समर्थ असते अशा या दिव्य प्रीतीचा साक्षात्कार निसर्गात होऊ शकेल. चद्र आकाशात विहरत असतो आणि त्याच्या किरणांनी नाहून निघाल्याबरोबर आपल्या मिटलेल्या पाकळ्या मोकळ्या करून सौंदर्याचा डौलदार दिमाख मिरविणारी कुमुदिनी तर खाली दूर दूर पृथ्वीवर मद वाऱ्याच्या कोवळ्या झुळकीबरोबर डुलत असते. आपल्या आगमनाबरोबर कुमुदिनीच्या जीवनांत होणारी ही आनंदाची उन्मत्त पखरण चद्राला माहीत असते काय? नाजूक लतिकावर झुलणारीं

इवलालीं गोंडस फुलें सूर्याकडे हर्षभराने पाहून आपल्या रुचिर स्मिताने सारें वातावरण उजळतात--पण सूर्याला याची जाणीव असूं शकेल काय ?

प्राण चंद्र ज्या कुमुदाना,
काय जाणतो तो त्याना ?
फुले हसति पाहुनि रविला,
कळे न परि त्याचे त्याला !
चंद्रकांत मणि पाझरती
चंद्र फिरे वरच्यावरती !

निसर्गातील या मोहक घटनाप्रमाणे असलेल्या घटना मानवी जीवनांत कां घडू नयेत ? एखाद्या व्यक्तिमुळे आपल्या चित्तवृत्ति थरारतात, मन मोहरून जातें, केवळ तिच्या स्मृतीने सुद्धा भावना फुलकित होतात, आपल्या साऱ्या चित्तवृत्तींचा लय तिच्या ठायीं होतो. वीज तळपून जावी आणि तिच्या त्या उन्मेषाने अंधाराचा भेद करून आकाश उजळून टाकावें, त्याप्रमाणे त्या व्यक्तीच्या केवळ अस्तित्वाच्या जाणिवेने आपल्या हृदयांत लक्ष ज्योति उजळतात, आणि नसानसातून चैतन्याच्या गोड लहरी हेलावू लागतात. हा अनुभव कधी तरी येण्याचें भाग्य ज्याला लाभले त्याचे जीवन सफलतेने समृद्ध झाले, त्याच्या हृदयाच्या अंगणात प्राजक्ताच्या फुलाचा सडा पडला ! ज्या व्यक्तीमुळे या मंदिर भावना आपल्या अंतः-करणांत गोड उन्मादाची असह्य धुंदी निर्माण करतात त्या व्यक्तीला त्याची जाणीव असली तर प्रतिशब्दाच्या अपेक्षेने ती धुंदी अधिकच गहिरी होईल यात शंका नाही. पण अशी जाणीव त्या व्यक्तीला नसली तरी ज्या रसरसलेल्या भावना तिच्यामुळे निर्माण झालेल्या असतात त्यांची प्रतीति येत असल्यामुळे त्या आभासात्मक कशा मानाव्या ? त्या खऱ्याच असतात आणि त्यांच्या आंदोलनामुळे आपलें शरीर व मन हीं दोन्ही पुलकित होतात हेंहि खरें असतें. कुमुदिनीच्या जीवनांत घडून येणारे अत्यंत मोहक फरक चंद्राला माहीत नसले तरी त्या फरकांमुळे तिचें जीवन खरोखरच सौंदर्याच्या समृद्धीने भारावतें. त्याप्रमाणेंच आपल्या थरारणाऱ्या चित्तवृत्तींची व धडधड-त्या हुरहुरीची त्या व्यक्तीला जाणीव नसली तरी आपल्या जीवनांतील या

गोड घटना काही खोट्या ठरत नाहीत. त्या खऱ्याच असतात; कारण त्यांची जाणीव चित्तात सतत तरळत असते. आपल्या साऱ्या कोमल भावना आपल्याला नकळत, किंवा आपल्या इच्छेविरुद्ध, भुलवून हिरावून घेणाऱ्या व आपल्याला असहाय करून टाकणाऱ्या व्यक्तीला आपल्या या मनोव्यापाराची थोडीसुद्धा जाणीव नसली तरी सुद्धा तिच्याठायीं चित्ताचा लय करून टाकण्याची लालसा बाळगणारी व त्या तन्मयतेत अलौकिक समाधान प्राप्त करून घेण्यासाठी आसावलेली मानवी प्रीति ही दिव्य प्रीति होय असें गडकऱ्याना चंद्र व कुमुदिनी आणि सूर्य व फुलें याच्या उदाहरणावरून सुचवावयाचें आहे हें स्पष्ट आहे.

सौंदर्याच्या अवलोकनात वृत्ति तन्मय होणे हा मानवी मनाचा धर्म आहे. पण हे अवलोकनसुद्धा अभिलाषेने रहित, निरागस असूं शकते असेंहि गडकऱ्याना सुचवावयाचें आहे. 'सौंदर्याचा उत्कर्ष, कुठें असे तरि दे हर्ष.' पण जें सौंदर्य दुर्लभ आहे, आपल्या सामर्थ्याच्या पलीकडे आहे, ते प्राप्त होऊं न शकल्यामुळे होणारी वंचना टाळण्यासाठी त्या सौंदर्यात होणारी तन्मयता शुद्ध, निरागस, राहणे शक्य झालें तर त्यायोगे मनाचा विकास होऊन त्याला दिव्य समाधान लाभेल. पुण्यप्रभावांतील ईश्वर वसुंधरेला म्हणतो—

> " उच्चपदीं विराजणाऱ्या सौंदर्याबद्दल दुर्लभतेमुळें अभिलाषबुद्धीऐवजीं आदरभाव उत्पन्न होतो; हातालगतचीं फुललेलीं फुलें खुडून घेण्याची इच्छा होते, पण आकाशात बसून हंसणाऱ्या तेजस्वी फुलांकडे आपण विस्मयपूर्ण आदरदृष्टीनें पाहत असतों. "

दुर्लभ सौंदर्याची प्राप्ति झाली नाही म्हणजे जो खिन्नपणा येतो त्याने आपलें मन कलुषित होते; आणि वृत्ति एकदा कलुषित झाली की त्या सौदर्याच्या दर्शनाने उत्कट आनंद होण्याऐवजीं त्याच्या दुष्प्राप्यतेच्या जाणिवेने औदासीन्य मात्र निर्माण होते. हें होऊं नये यासाठी सौंदर्यात होणारी तन्मयता निरभिलाष ठेवता येण्याचा प्रयत्न करण्याशिवाय गत्यतर नाही, असे गडकऱ्यांना म्हणावयाचें आहे.

सौदर्याचा उत्कर्ष
कुठे असे तरि दे हर्ष ।
दिशाकाल होउनि सान्त
त्या वृत्तित विरघळतात ।
दर्शन—किंवा स्मरण पुरे
तन्मगता देही पसरे !

सौदर्याच्या दर्शनाने वृत्ति तदाकार झाली तरी ही उदात्त तन्मयता आहे, तिच्यांत स्वार्थाचा, हीन विचाराचा, कामुक अभिलाषाचा लेशहि नाही अशी आपली खात्री झाली तरच सौदर्यावलोकनाचे साफल्य झाले असें म्हणतां येईल. सौंदर्य नेहमीच कसल्या तरी अलौकिक दिव्यत्वाने भारलेले असतें. त्याच्या या दिव्यत्वाला आपल्या हीन अभिलाषेने कलुषित करणें युक्त ठरेल का ?

सौदर्याच्या ज्या श्रेणि
तीं देवाघरची लेणीं।
उदात्त वृत्तीचा प्रसर
स्वार्थाचा पाडी विसर ।

सौदर्याच्या सानिध्यात आपल्या वृत्तींतील हिणकसपणा व कलुषितपणा याचा निरास होऊन त्याच्याऐवजीं कौतुक, विस्मय, आदर इत्यादि भावनाचा उदय झाला पाहिजे. “ दिव्य सौदर्याच्या सानिध्याने मनोवृत्ति निवळतील, कीं गढूळ होतील ? ” असा जो प्रश्न ईश्वराने विचारला आहे त्यांतील मर्म हेच आहे.

प्रेमविषय अपरंपार
सूक्ष्म–रूप, भव्याकार ।
निरभिलाष तन्मयता ती
दिव्य प्रेमाची जाति ।
कौतुक, विस्मय, आश्चर्य,
शून्यवृत्ति किंवा सभय ।
अनेक परिची
त्या प्रेमाची
रूपें साचीं

आविष्करणीं जाणविती
दिव्य प्रेमाची जाति !

दिव्य सौंदर्याच्या अवलोकनाने उद्‌भवणाऱ्या या दिव्य प्रेमाला कसलीहि आशा नसते, तें जन्मापासून निराश असतें, त्याला मोबदल्याची तिळमात्र अभिलाषा नसते, ही ' निरभिलाष तन्मयता ' असते, किंबहुना अभिलाषेची ओझरती लहर जरी मनात तरळून गेली तरी त्या प्रेमाचा उदात्तपणा कलुषित होईल—असें हें गडकऱ्यांचें दिव्य, उदात्त, प्रेमाचे तत्त्वज्ञान आहे. सौंदर्याच्या दर्शनाने मनात पावित्र्याच्या भावना उद्‌भूत होतात—किंवा व्हावयास पाहिजेत—हा विचार गडकऱ्यांच्या मनात या काळात सतत घोळत असला पाहिजे. ' जें पावन, जें विशुद्ध, त्याची तू मंगलमूर्ति ' असे एका सुंदर बालिकेचे वर्णन करून ' पावित्र्याची उषा काय, की, कळी पूर्णतेची ! ' असा आपल्या मनाचा संभ्रम गडकऱ्यानी एका कवितेत आविष्कृत केला आहे.

हे दिव्य, निष्काम प्रेमाचे काय प्रकरण आहे ? असले प्रेम मानवी जीवनांत असूं शकेल काय ? आणि असल्यास या प्रकारच्या प्रेमात धुंद झालेल्या माणसाला समाधान मिळू शकेल काय ? इत्यादि अनेक प्रश्नानी मन बेचैन होते. आकाशांतील तारकेच्या सौंदर्याने आपल्या मनात ज्या भावना निर्माण होतात किंवा निसर्गातील विविध रमणीय दृश्याच्या अवलोकनाने ज्या संवेदना थरारतात त्यांचे स्वरूप आणि एखाद्या रमणीच्या उन्मादक (किंवा सात्त्विक) सौंदर्याच्या दर्शनाने पाहणाराच्या मनात खळाळणाऱ्या भावना याचे स्वरूप एकच असू शकेल काय ? स्त्रीचें सौंदर्य कितीहि सात्त्विक असले तरी त्याच्या सानिध्यात येणाऱ्या मनुष्याच्या मनात नेहमी शुद्ध, सात्त्विक, उदात्त विचारच तेवढे प्रादुर्भूत होतील, एकहि अनुदात्त विचार जागृत होणें शक्य नाही, अभिलाषेची ओझरती तिरीपहि निर्माण होणार नाही, उन्मादाची एवढीसुद्धा छटा तरळून जाणार नाही, हें मानवी मनोधर्माच्या बाबतींत सर्वस्वीं अशक्य आहे स्त्रीसौंदर्य म्हणजे निसर्गातील सौंदर्य नव्हे हे आपण कधीहि विसरता कामा नये. निसर्गातील सुंदर सुंदर दृश्यें पाहिल्यावर चित्तांतील कलुषित भावनांचा निरास होऊन तें उदात्त व सात्त्विक होईल हे शक्य आहे. निसर्गसौंदर्याच्या बाबतींत कोणती हीन

अभिलाषा, कोणती कामुकता निर्माण होऊं शकेल ? तथापि निसर्गातील अत्यंत रमणीय व भावनाना उदात्त बनविणारीं दृश्यें पाहूनहि त्या दृश्यांनी सूचित होणारीं काही कामुक दृश्यें डोळ्यासमोरून तरळून जातात ही अनेक कवींची साक्षात् प्रतीति आहे. मग शारीर अभिलाषा किंवा वैषयिक अभिलाषा पूर्ण होण्याची ज्याच्या बाबतींत सुतराम् शक्यता नाही अशा निसर्गसौंदर्याने जेथे अनेकाच्या मनात अभिलाषाचीं सूचित विलसितें काहूर करतात तेथे चैतन्याने रसरसलेल्या व भावनांनी मुसमुसलेल्या स्त्रीच्या आकर्षक सौंदर्याच्या अवलोकनाने पाहणाराच्या चित्तात शारीरिक अभिलाषेची ओझरती झुळुक देखील वाहणार नाही हें फक्त कवींच्या काव्यात्म कल्पनेने निर्मिलेल्या स्वप्नसृष्टींतच शक्य आहे–सवेदनानी व भावनांनी हेलावणाऱ्या मानवाच्या जगात हे शक्य नाही.

हा सारा प्रकार पुढीलप्रमाणे घडत असतो. एखाद्या स्त्रीच्या दर्शनाने पाहणाराच्या मनात ज्या सवेदनाची निर्मिति होते त्या सवेदना शारीरिक अभिलाषेशीं सलग्न असतात यांत कोणतीहि शका नाही. आणि असे झाले तरी त्यात काही भयकर, अस्वाभाविक किंवा अनैसर्गिक आहे असे मुळीच नाही. मानवी मनाच्या सहज वृत्तींचा हा आविष्कार असतो. या सहज प्रवृत्ति जो कोणी मानव आहे त्याच्या ठायीं असणारच. या प्रवृत्तींचा आविष्कार मात्र स्थळ, काळ, व्यक्ति, परिस्थिति इत्यादि बाह्य गोष्टींनी नेहमी मर्यादित झालेला असतो. आणि या गोष्टी प्रतिकूल असतील तर हा आविष्कार होणारहि नाही. पण भावनाचा हा आविष्कार अनेक कारणामुळे व्यक्तीला करता आला नाही तरी त्या भावना मुळात उद्भूतच होत नाहीत असे घडत नाही. त्या भावनांची निर्मिति होतच असते; फक्त त्यांना आवर घालून त्या उद्दाम होऊं नयेत व त्याचा आविष्कार होऊं नये अशी खबरदारी हरप्रयत्नाने मनुष्य घेत असतो. वासनाचा किंवा अभिलाषांचा हा निरोध (repression) करणें अनेक वेळा अत्यत आवश्यक असतें. पण या वासनानिरोधामुळे मनात खळबळणाऱ्या भावनांचा उद्रेक बाहेर उफाळून आला नाही तरी त्या वासना निर्माणच झाल्या नाहीत असे मानणे ही प्रतारणा आहे, आत्मवचना आहे. त्या

भावनाचें फार तर उदात्तीकरण (sublimation) होईल व त्यामुळे खळाळणाऱ्या भावनाचा क्षोभ किंचित् सुसह्य होईल इतकेंच. कित्येक वेळां तर या वासनानिरोधाचा वाईट परिणाम होतो, आणि विलक्षण प्रयत्नानी दडपून टाकलेल्या भावनाचा बाध केंव्हा तरी फुटून त्या सैरावरा धावू लागतात. स्वत: गडकऱ्यानीच पुनर्जात प्रेमास या कवितेत या वासनानिरोधाच्या पायीं निर्माण होणाऱ्या वचनेचे स्वरूप प्रकट केलें आहे.

प्रेमा ! ऊठ—चल उघड, झाकली मूठ !
तुंबळ सागर नव खळबळला,
हृदयीं तटवू त्यास कशाला ?
जगभर लाटा उधळायाला
दिली तुज सूट—चल उघड, झाकली मूठ !
कोठुनि असला सागर धरिला,
माझा मूर्खपणा मज कळला

तात्पर्य, प्रयत्नाची कितीहि शिकस्त केली तरी सौंदर्याच्या दर्शनाने कसलीच संवेदना चित्तांत निर्माण होणार नाही अथवा झाली तरी ती फक्त सात्त्विक, उदात्त, दिव्य, निरागसच असेल अशी व्यवस्था हृदय ज्याला आहे अशा माणसाला करता येणार नाही. फार तर तो आपल्या उद्भूत झालेल्या भावनाना आवर घालून त्याचा बाहेर आविष्कार होऊं नये अशी धडपड करील व एखाद्या वेळीं त्यात यशस्वीहि होईल. म्हणून

जिच्या जिवाला
तिळ मोबदला
नकोच कमला
निराश जन्मापासुनि ती
दिव्य प्रेमाची जाति !

ही कल्पना कितीहि आकर्षक वाटली तरी तिला वस्तुस्थितींतील प्रतीतीचा कांहीहि आधार नाही, कवीचें तें एक वेडें स्वप्न आहे, वाऱ्यावर तरंगणारें परंतु गुंगारा देऊन क्षणात अदृश्य होणारें तें एक फूलपाखरू आहे. हातात कसें येणार तें ?

त्याचें असे होते की, जिच्या आकर्षणाचा प्रभाव जाणवू लागलेला असतो, किंबहुना त्या आकर्षणाची धुंदी मनाला उन्मत्त करू लागलेली असते, जिच्या ठायीं साऱ्या चित्तवृत्ति केंद्रित झालेल्या असतात, अशा एखाद्या स्त्रीने उलट प्रतिशब्द देऊन आपल्या जीवनाचें साफल्य करावे व ते समृद्ध बनवावें अशी आकांक्षा अमर्याद झाल्यावर ती आकाक्षा व्यवहारात सफळ होण्याची शक्यता नसल्यामुळे शेवटी आपल्या भावनाचें उदात्तीकरण करण्याशिवाय दुसरा मार्ग सत्प्रवृत्त माणसाला उरतच नाही. त्याच्या भावनाची जाणीव असूनहि तिने उलट जबाब दिला नसेल, किंवा तशी जाणीव तिला मुळीच नसून प्रेमिक मात्र तिच्याशीं तन्मय झाला असेल, त्याच्या साऱ्या भावना तिच्याच पायाभोवती घोटाळत राहिलेल्या असतील. मेटरलिंकच्या मोना व्हॅना या नाटकातील प्रिंझिव्हेलला मोना व्हॅनाविषयीं जें प्रेम वाटते त्याचें स्वरूप असेच आहे. तिचा विवाह झाला आहे आणि बाळपणापासून तिच्याविषयीं त्याला जे अमर्याद प्रेम वाटत होते त्या प्रेमाची निराशा झालेली आहे. तथापि तें प्रेम मुळीच कमी झालेले नाही. उलट त्याची तीव्रता शतपटींनी वाढलेलीच आहे. तथापि तिची प्राप्ती होण्याची आशा नसल्यामुळे आपल्या साऱ्या अभिलाषाचे उदात्तीकरण त्याने केले आहे. पण हे उदात्तीकरण सहज झालेले आहे असे नसून त्यासाठी त्याला विलक्षण किंमत द्यावी लागलेली आहे, अनेक वेळा त्याचे हृदय पिळवटून निघालें आहे. प्रेमभावनाची विस्मृति व्हावी अशी तीव्र धडपड त्याच्या मनाने केली, पण त्याची स्मृति त्याच्या हृदयातून एक क्षणहि दूर झाली नाही. बाह्यात्कारीं प्रेमाचा त्याग करण्यावाचून त्याला गत्यतरच नव्हते, कारण त्याची प्रेयसी आता दुसऱ्याच्या मालकीची झालेली होती. यामुळे आपल्या भावना दडपून टाकण्याचें हें दिव्य आपल्या अगदी मनाविरुद्ध त्याला करणें भाग पडले.

> "Destiny seemed to demand the sacrifice I grudgingly made to my love"[५]

या प्रिंझिव्हेलच्या उद्‌गारांतील grudgingly हा शब्द फार महत्त्वाचा आहे. व्हॅना ही त्याच्या दृष्टीने दूरच्या आकाशांतील दुष्प्राप्य तारका ठरली.

पण या तारकेवरच त्याचें सारें लक्ष खिळलेलें होतें, हें त्याच्या जीवनाचं सोनेरी स्वप्न बनलें होतें. प्रत्यक्षात व्हॅनाची प्राप्ति होणें शक्य नाही हें चागलं माहीत असतांहि त्याच्या भावना तिच्याच पायांभोवती घोटाळत होत्या

"A poor wretch, who for one single instant wistfully gazes at what has been the aim of his life, an unhappy man who asks nothing ."

निराश झालेल्या प्रेमाचें कधी कधी सात्त्विक करुणावृत्तींत असे रूपांतर होत असतें. व्हॅना प्रत्यक्ष भेटल्यावर तिजविषयींच्या आपल्या साऱ्या उदात्त भावनांचे आविष्करण करीत असतांच त्याच्या दडपून टाकलेल्या भावना उफाळून येतात आणि तिच्या स्पर्शासाठी तो तळमळू लागतो. प्रेमभावनाचें उदात्तीकरण पूर्ण झाल्यानतरची ही आसावलेली तळमळ आहे हें लक्षांत ठेवले पाहिजे. हाच प्रकार लीला आणि जयंत यांच्याहि बाबतीत झाला हे मागे दाखविलेंच आहे. ' निराश जन्मापासुनि ती ' असें दिव्य प्रीतीचें कितीहि गोड गोड वर्णन केले तरी जिच्या पायांभोवती आपल्या साऱ्या मृदु भावना घोटाळत आहेत तिच्या निकट सहवासाची, तिच्या उन्मादक स्पर्शाची इच्छा सुद्धा मनांत निर्माण होणें शक्य नाही असें कवींनी वाटलें तर मानावे ! कविकल्पना या दिव्य प्रेमाच्या अभिलाषेत चकली नसली तरी तिच्या निर्माणात खास चकली आहे. पुण्यप्रभावांतील ईश्वर वसुंधरेवर प्रेम करीत असतो. परंतु तिचे भूपालाशीं लग्न झाल्यावर आपल्या निराश भावनाचे तो उदात्तीकरण करण्याची तीव्र धडपड करतो. वसुधरेची आठवण नाहीशी व्हावी म्हणून तो दूर दूर भटकतो. पण त्याचे अतर्मन त्याला नकळत वसुधरेकडे खेचून आणते व वसुधरेच्याच गावीं तो येतो. आपण थारेपालट करण्यासाठी आलों असें तो वसुंधरेला सागतो. जिला टाळावयास पाहिजे तिच्याच गावीं जाणें म्हणजे रोग बळावल्यावर कुपथ्य करण्यासारखेंच आहे हे तो विसरतो. त्याच्या हे लक्षांत आले नाही तरी अशिक्षितपटुत्वाबद्दल प्रसिद्ध असलेल्या स्त्रीच्या लक्षांत ते आलेंच पाहिजे. वसुंधरा त्याला म्हणते- " अशी थारेपालट करण्यासाठी आमच्या गांवींच येण्यांत तुमची थोडीशी चूक झाली नाहीं का ? माझ्यामुळें उत्पन्न झालेली तुमची विषण्णवृत्ति

माझ्यासमोर राहून उणी होणार कीं दुणावणार ? तुमच्या हृद्रोगाला माझी तर आठवणसुद्धा अगदीं कुपथ्यांतलें कुपथ्य ! " आता ईश्वराने वसुंधरे-विषयींच्या आपल्या अभिलाषाचें उदात्तीकरण कसे चालविलें आहे पाहा.

" आजपर्यंतच्या माझ्या मनांतल्या विचारांत वावरणारी तुझी मूर्ति एका कुमारिकेची होती आणि कुमारिकेबद्दलच्या निर्दोष अभि-लाषदृष्टीनेच मी तिच्याकडे पाहत आलो. ( वर उल्लेखिलेली ' निर-भिलाष तन्मयता ' ती हीच ! ईश्वर स्वतःच्या मनाची कसली विलक्षण फसवणूक करून घेत आहे ! ) तिच्या हानीबद्दलचे माझे निःश्वासही याच कारणामुळे क्षम्य होते; आज इथें आल्याबरोबर तुझ्या ठिकाणीं नाममात्रानेही अचिंत्य अशी परस्त्री दिसत आहे. तुझ्या बदललेल्या स्थितीची कल्पना एकदां बसली म्हणजे कुमारि-केबद्दलच्या शुद्ध प्रीतीचें, पत्नीपदारूढ झालेल्या पतिव्रतेविषयींच्या उज्ज्वल भक्तींत संक्रमण होईल. ही निर्लोभ दृष्टि एकदा झाली म्हणजे झालें ! "

आणि यानंतर लगेच मागे उद्धृत केलेले वाक्य तो उच्चारतो.

" उच्चपदीं विराजणाऱ्या सौंदर्याबद्दल दुर्लभतेमुळे अभिलाषबुद्धी-ऐवजीं आदरभाव उत्पन्न होतो, हातालगतची फुललेलीं फुले खुडून घेण्याची इच्छा होते, पण आकाशात बसून हसणाऱ्या तेजस्वी फुला-कडे आपण विस्मयपूर्ण आदरदृष्टीने पाहत असतो... दिव्य सौंदर्याच्या सानिध्यानें मनोवृत्ति निवळतील, कीं गढूळ होतील?" (अंक १, प्र. १)

हा उतारा बराच मोठा झाला आहे हें खरे. तथापि निरभिलाष प्रेमाचें ध्येयवादी स्वप्न सत्यसृष्टींत उतरवू इच्छिणाऱ्या माणसाच्या मनातील परस्पर-विरोधी भावनांच्या संघर्षाचे स्वरूप स्पष्ट होण्याच्या दृष्टीने त्याची उपयुक्तता मोठी आहे. ईश्वराची मनोवृत्ति खरोखरच वसुंधरेविषयीं शुद्ध, निर्दोष व निर-भिलाष झाली असती तर वसुंधरेचें लग्न भूपालाशी झालें या गोष्टीचा त्याला खेद वाटावयाचे काहीच कारण नव्हतें. पण त्याला तसा खेद अगदी तीव्रतेने वाटत आहे. आपल्या खऱ्या सुखाची निराशा झाली आहे असें तोच

कबूल करीत आहे, आणि मर्यादित सुखप्राप्तीपेक्षा सर्वस्वाचा सत्यानाश सुद्धा त्याला अधिक स्पृहणीय वाटत आहे. वसुधरेच्या आयुष्याच्या नाटकातल्या पहिल्या प्रवेशात आपल्याला जेवढें काम मिळाले तेवढे पुढे केव्हाच मिळावयाचें नाही याचा त्याला विषाद वाटत आहे. या साऱ्या प्रकाराचा अर्थ अगदी स्पष्ट आहे. जे सौंदर्य व जे प्रेम प्राप्त होण्याची आशा पूर्णपणे लयाला गेली त्या सौंदर्याविषयी व त्या प्रेमाविषयीं उदात्त भावना चित्तात रुजाव्या यासाठी चाललेली ही विलक्षण धडपड आहे. पण ही तन्मयता खऱ्या अर्थाने निरभिलाष होण्याची कधीच शक्यता नाही, हें प्रेम जन्मापासून निराश होते हेहि म्हणणे खोटे आहे —— त्या प्रेमाला अमर्याद आशा आहे; आणि त्या आशेचा चक्काचूर झाल्यावर प्रिय व्यक्तीविषयीं वाटणाऱ्या आत्यंतिक प्रेमभावनेमुळे त्या आशेचें, त्या अभिलाषेचे, स्वरूप सोज्ज्वळ करण्याचा हा प्रयत्न आहे असें मानले तर ते सत्याच्या बरेचसे जवळ येईल.

तथापि, गडकरी ज्या निरभिलाष तन्मयतेचें व कशाचीहि आशा न करणाऱ्या प्रेमाचें ‘ दिव्य प्रेम ’ या शब्दानी वर्णन करीत आहेत ते दिव्य प्रेम केवळ स्वप्नसृष्टींतील रुचिर भासाप्रमाणें असलें, व सत्यसृष्टींत तें अवतीर्ण होणें अशक्य असले तरी एक गोष्ट मात्र सत्यसृष्टींत अनेक वेळां घडत असते. ज्या व्यक्तीवर आपण आपल्या कोमल भावनाची वृष्टि करीत असतों तिला त्याची जाणीव नसली तरी आपल्या भावनाच्या उत्कटतेंत काहीहि उणीव निर्माण होत नाही. अर्थात् आपल्या भावना त्या व्यक्तीला कळाव्यात व तिच्याकडून आपल्या हृदयाला साद मिळावी व आपल्या प्रीतीचे साफल्य व्हावे ही आकाक्षा तेथे असतेच असते. ही तन्मयता निरभिलाष नसून अभिलाषेने, आकाक्षांनी, आशांनी परिपूर्ण असते. शार्लट् ब्रॉंटेच्या जेन आयरच्या रॉचेस्टरविषयीं ज्या प्रेमभावना होत्या त्यांची त्याला कित्येक दिवस जाणीवहि नव्हती, आणि आपले हृदय त्याला कळत नाही याची तिलाहि कल्पना होती. तथापि आपल्या भावनाना आवर घालणें तिला शक्य नव्हतें. पण हें निरभिलाष प्रेम नसून अभिलाषेने अगदी रसरसलेलें प्रेम असले तरी त्याची योग्यता कोणत्याहि प्रकारें कमी नाही हें लक्षात ठेवले पाहिजे. आपल्या भावनांचा आविष्कार होऊं नये

म्हणून माणसाने कितीहि धडपड केली तरी साभिलाष भावनांचें अस्तित्वच अमान्य करणें हें चमत्कारिक आहे. आपल्या भावना अमर्याद होऊ नयेत म्हणून कमालीची धडपड करणाऱ्या मनाचे बंध केव्हा तरी गळून जाणार, भावना स्वैर होणार, व त्याचा आवेग अनावर होणार हे निसर्गाला धरून आहे. जागेपणीं त्या भावना अनावर झाल्या नाहीत तरी स्वप्नसृष्टींत त्या अनावर झाल्याशिवाय राहत नाहीत. " जाग्रदवस्थेत जिकलेल्या मनोवृत्तींनीं स्वप्नसृष्टींत अखेर माझा पुरा, पुरा पाडाव केला " हे वृंदावनाचे उद्‌गार दाबून टाकलेल्या व म्हणूनच स्वप्नसृष्टींत उफाळून येणाऱ्या प्रेमभावनांच्या बाबतींतहि अगदी खरे आहेत. प्रिय व्यक्तीविषयीं वाटणाऱ्या अभिलाषेला प्रयत्नाने आवर घालणें व तिचा आविष्कार होऊ नये यासाठी विलक्षण धडपड करणें, आणि अभिलाषाच नसणे व केवळ निरभिलाष, शुद्ध, प्रेम असणे या दोन्ही गोष्टी परस्परापासून अत्यंत भिन्न आहेत. पहिल्या गोष्टीला अनुभवाचा, प्रतीतीचा आधार आहे म्हणूनच तो खरी आहे, परंतु दुसरी केवळ कल्पनासृष्टीतच भासरूपाने असणारी, आणि म्हणूनच खोटी व असंभाव्य आहे! प्रिय व्यक्तीत झालेली तन्मयता आशेने, अभिलाषेने, हिणकस ठरते हेच मुळी खोटें आहे. साभिलाष तन्मयतेचाहि प्रकर्ष अनेक वेळां उदात्त भक्तीइतकाच स्पृहणीय होऊ शकतो. भक्तीमध्ये जीं वैशिष्ट्ये सामावलेलीं असतात असे आपण मानतो तीं सारीं वैशिष्ट्ये साभिलाष तन्मयतेंत सुद्धा किती तरी वेळा प्रकट झालेलीं दिसतात, भक्तींतील साऱ्या उदात्ततेची अशा साभिलाष तन्मयतेला मोहक झालर लागलेली दिसून येते. असे झाले म्हणजे प्रिय व्यक्तीविषयींची अभिलाषा उत्कट होऊन देखील तिच्या सुखाला जपण्याची धडपड, तिच्या हिताची तळमळ, तिच्या मनाला इतकी सुद्धा व्यथा होता कामा नये यासाठी घेतलेली खबरदारी, आणि तिच्यावरील प्रेमाचा आविष्कार तिच्या सुखाला, स्वास्थ्याला व हिताला बाधक होण्याची शक्यता असेल तर भावनांना आवर घालून तो आविष्कार तिला दिसूं नये यासाठी घेतलेली दक्षता—थोडक्यात, साऱ्या उत्कट भावनांना तिच्या सुखासाठी दडपून टाकण्याची तयारी—या गोष्टींची आत्मार्पणात, आत्मत्यागांत जमा होणार नाही काय? भक्तीच्या उत्कटतेंत व या उत्कट-

तेंत काय फरक आहे ? केवळ शारीर वासना पुरवूं पाहणारी हीन अभिलाषा ही पशुवृत्ति होय. असली हीन अभिलाषा आणि वर वर्णिलेली उदात्ततेंत व त्यागात पर्यवसान पावणारी अभिलाषा, यात महदंतर आहे. उद्दाम शारीर वासनेने प्रेरित झालेली अभिलाषा पुरी होऊं शकली नाही तर अनेक वेळां सूडाच्या भावनेत तिचें रूपातर होते. पण प्रिय व्यक्तीच्या हितासाठीच व सुखासाठीच सदैव तळमळणारी उत्कट अभिलाषा तिच्यासाठी वाटेल तो त्याग करावयास तयार होईल, आणि साऱ्या आशा तिच्या पायाभोवती घोटाळत असताना सुद्धा आपल्या उत्कट भावनाचा आविष्कार तिच्या नजरेस पडू नये यासाठी मनुष्य प्रयत्नाची शिकस्त करील. ही उदात्त भक्तीच नव्हे का एक प्रकारची ?

The desire of the moth for the star

या शेलीच्या ओळींत desire म्हणजे 'अभिलाषा' हा शब्द असला तरी त्या अभिलाषेचे भक्तीशीं अधिक जवळचे नातें आहे हें लगेच आलेल्या

The devotion to something afar

या ओळींतील devotion या शब्दावरून स्पष्ट आहे. वसुधरेची प्राप्ति झाली नाही म्हणून वैतागलेला वृंदावन सूडाच्या भावनेने रात्रंदिवस तळमळत आहे, इतकेच नव्हे तर, तिला जबरदस्तीने भ्रष्ट करण्याचे विचार त्याच्या मनात थैमान घालीत आहेत, आणि उलट त्याच वसुंधरेच्या प्रेमाची प्राप्ति न होऊ शकल्यामुळे खिन्न झालेला ईश्वर आपल्यामुळे तिच्या सुखात कसलाहि बिघाड येऊं नये यासाठी अनावर दक्षता घेत आहे, या दोन चित्राकडे पाहिले म्हणजे तन्मयता साभिलाष असून सुद्धा तिचें भक्तींत, अगदी उत्कट भक्तींत, कसें रूपातर होऊ शकतें याचा प्रत्यय येईल. या प्रकारच्या उत्कट परतु त्यागलालस अभिलाषेचा प्रत्यय मेटरलिंकच्या प्रिंझिव्हेलच्या पुढील उद्‌गारांत येईल. जिच्या प्राप्तीची पूर्ण निराशा झालेली आहे व जिच्याविषयींची उत्कट अभिलाषा क्षणभरहि कमी झालेली नाही अशी आपली एका वेळची प्रेयसी पराकाष्ठेची सुखी असावी या एकाच भावनेने सदैव तळमळणाऱ्या अत्यंत पराक्रमी पुरुषाच्या कोमल हृदयाचा हा आविष्कार आहे.

"Ah, how often have I wandered around the walls of this city, and clung to the chains of the gate, in my fear lest my longing to see you should become too overpowering, should induce me to disturb the love and happiness that you had found !"[६]

इतकी उदात्त भावना ज्याची झाली आहे व प्रियतमेच्या सुखासाठी वाटेल तो त्याग करावयास व स्वतःच्या स्पृहणीय सुखावर पाणी सोडावयास जो तयार झाला आहे त्याच्याहि मनात तिच्या भेटीची, तिच्या सहवासात मिळणाऱ्या सुखाच्या क्षणमात्राची, इतकी विलक्षण अभिलाषा निर्माण झाली आहे की त्या एका क्षणासाठी, जीवनांतील आनंदाच्या त्या एकाच परमोच्च क्षणासाठी, तो वाटेल ती किंमत द्यावयास तयार झाला आहे. हा सारा प्रेयसीवरील आत्यंतिक प्रेमाचा प्रभाव, अभिलाषेने युक्त असलेल्या तन्मयतेचा प्रभाव ! त्या क्षणाची प्राप्ति ! जीवितातील सर्वोत्कृष्ट क्षणाची प्राप्ति ! त्या क्षणानंतर सर्वस्वाचा नाश झाला तरी त्याला त्याची काडीइतकी फिकीर नाही. उत्कट भावना ही काय चीज असते हेच ज्यांना माहीत नाही अशा नीरस व्यवहारी लोकाना या तळमळीची कल्पना कशी येणार ? ' जगीं सागती प्रीत पतगाची खरी । झड घालुनि प्राण देतो दीपकाचे वरी ' या होनाजी बाळाच्या ओळींत असल्या उत्कट प्रीतीचें प्रत्यंतर येईल. प्रिझिव्हेल म्हणतो—

"There is an ecstacy too great for man, and it crushes him who achieves it !"

प्रियकराविषयींच्या अत्यंत उत्कट अभिलाषाचा आणि उत्कट भावनाचा आविष्कार होऊं नये यासाठी असामान्य प्रयत्न करणाऱ्या एका भावनावश मुलीच्या मनाची सारी तळमळ अलाइस मेनेल या कवयित्रीच्या *Renouncement* या अप्रतिम सुनीतांत प्रकट झालेली आहे. आपल्या भावना दडपून टाकण्याची तिची धडपड आणि त्या भावनांचा तिला अगदी नकळत झालेला आविष्कार यांचें हें चित्र अत्यंत हृद्य वठलें आहे.

अलाइस मेनेलच्या या सुनीतांतील प्रीतीच्या आविष्कारांत उत्कट अभिलाषा आहे, अगदी रसरसलेली अनावर अभिलाषा आहे. तरी त्यायोगाने तिची स्पृहणीयता किंचित् सुद्धा कमी झालेली नसून उलट ती वाढलेलीच आहे असे मला वाटतें. आणि कसलीच आशा न बाळगणाऱ्या निर्जीव, नेभळ्या, प्रीतीपेक्षा ही साभिलाष तन्मयता लाख पटींनी अधिक चांगली !

आणि गडकऱ्यांना सुद्धा या हृद्य व स्पृहणीय सत्याचा साक्षात्कार लवकरच झाला असला पाहिजे. ' जिच्या जिवाला, तिळ मोबदला, नकोच कसला, निराश जन्मापासुनि ती '—असे दिव्य प्रीतीचें स्वरूप सांगणाऱ्या गडकऱ्यानी ती कोण ? या नावाचें एक अत्यंत सुंदर सुनीत लिहिले आहे. हें सुनीत १९१४ ऑगस्टच्या मनोरंजनांत प्रसिद्ध झाले. दिव्य प्रेमाची जाति ही कविता लिहिल्यानंतर थोड्याच दिवसांनी हे सुनीत लिहिलेलें आहे. जिला कसलीच आशा वाटत नाही, जिला कसलीहि अभिलाषा नसते, तीच प्रीति दिव्य होय असे आग्रहाने प्रतिपादन करणारे गडकरी या सुनीतात आशा अविनाशी आहे, अनंत आहे, हा विचार प्रभावीपणे सांगत आहेत. जिच्यावर प्रेमाची वृष्टि करता येईल अशी कोणी तरी व्यक्ति जगात असली, आणि तिच्यात तन्मयता झाली तरच मानवी जीवनाचें साफल्य झाले असे म्हणता येईल; साफल्याच्या या आशेतच जीवितसर्वस्व सामावले आहे; ती आशा जोंपर्यंत चित्तात काहूर करीत नाही तोपर्यंत जीवनाला फुलोरा आला असे म्हणता येणार नाही, आणि आपल्या भावना कोठे तरी केंद्रित करण्याची, कोणावर तरी भावनांची बरसात करण्याची, आणि ती व्यक्ति कधी तरी भेटेल या उत्कंठित आशेने तळमळण्याची लालसा मानवी मनाला नेहमीच सुखाची समृद्धि प्राप्त करून देते हे गडकऱ्यांना या सुनीताच्या द्वारे प्रकट करावयाचे आहे.

> दूरस्था जलधीकडे स्वहृदया नेते नदी वाहुनी,
> शोधाया रसिकास नित्य कविता हिंडे, न आशा तुटे
> भूलोकावर राहते कुमुदिनी चंद्राकडे पाहुनी,
> रात्रीमागुनि धावतो दिवसही, की भेट व्हावी कुठे ?

सरिता विसावा न घेता सागराची कधी तरी भेट होईल या आशेने

रानोमाळ धावत असते; आणि केव्हा तरी तिच्या हृदयाला दिलासा मिळतो; तिचा प्रियकर तिला भेटतो. पण तो भेटेपर्यंत तिची आशा सारखी वाढतच जाते. या आशेवरच सारें जग चाललें आहे. प्रत्येक व्यक्तीच्या मनांत प्रेमसाफल्याच्या आशेचें स्फुरण केव्हा तरी होत असतें; आणि प्रिय व्यक्तीची केवळ स्मृति, तिच्या भेटीची दुबळी आशा, तिच्या प्राप्तीसाठी धडधडणारी आतुर, सभय उत्कंठा, या गोष्टींमुळे त्या मनांत सुखद विचाराची लुसलुशीत हिरवळ बहरते.

जीवाचे जगणे असेच असते सापेक्ष प्रेमावरी !
डोळेभेट दुरून, भाव अथवा आशाहि त्याला पुरे !

एकाकी व प्रणयशून्य जीवनाचा ओसाडपणा जाणवूं लागला म्हणजे कसली तरी अलौकिक, अनिर्वचनीय, आशेची लहर मनात तरळूं लागते आणि जीव बेभानपणात विरून जातो. या आर्त आशेच्या हुंकारांतच मानवी जीवनाचे साफल्य समृद्ध होत असते, यानेच मानवी जीवनावर परिपूर्णतेचा मोहर दाटतो. या आशेतील धडपडहि सुखद असते; आणि ती धडपड ज्या सवेदना निर्माण करते त्यांमुळे चित्तवृत्ति रसरसलेल्या चैतन्याने भारल्या जातात. या संवेदनाच निर्माण झाल्या नाहीत तर त्या जीवनात हृद्य व स्पृहणीय असे काहीहि उरणार नाही. या सवेदनांची प्रतीति व्हावी म्हणून तळमळणाऱ्या कवीच्या हृदयाचें करुण आक्रदन काळजाला भेदून जाते.

मी हें पाहुनि जीवबधन असें शोकार्त होतों परी,
वाकी या मम लक्ष्यशून्य हृदयी काहीं न आशा स्फुरे !
ओठाशी भिडते रहस्य मनिंचे—सागू कुणाला परी ?
अश्रू हे नयनींहि—माळ करुनी घालू कुणाच्या गळा ?
आले हे भरुनी रिते हृदयही—देऊ कुणाच्या करीं ?
आला दाटुनि कंठ–हाय ! रडुनी कोठे करूं मोकळा ?

'निराश जन्मापासुनि ती, दिव्य प्रेमाची जाति' असे उद्गार काढणाऱ्या कवीच्या मनांतील सभय उत्कंठेचें, थरथरणाऱ्या आशेचें हें केविलवाणें आक्रंदन म्हणजे साऱ्या मानवजातीच्या उत्कट भावनांचें

आक्रंदन होय. प्रत्येक भावनावश माणसाच्या– जीवनसाफल्याचा तो क्षण केव्हा येईल म्हणून भिरभिरत्या डोळ्यानी आणि धडधडत्या हृदयाने जगाचा ठाव घेऊ पाहणाऱ्या माणसाच्या– आकांक्षाचें प्रतिबिंब त्यांत पडलें आहे. या भावनेतील धुंदीचे, थरारणाऱ्या तल्लीनतेचे, चढते वैभव या सुनीताच्या शेवटच्या दोन ओळींत विकसित झाले आहे.

> जी माझ्यास्तव, मी जिचे सकलही आधार जी जीवनीं
> देवा ! भेटवि–दाखवी तरि मला ती कोण दवीं जनीं ?

ही निरभिलाष तन्मयता नाही ! आपल्या प्रीतीच्या भावनाचा जिच्या ठायीं लय करून टाकता येईल व मनात ज्यायोगे पुनवेचे चादणे फुलेल असा प्रतिशब्द जिच्याकडून मिळेल व जिच्या हळुवार भावनाचा आपल्या ठायीं पूर्ण लय होईल अशा प्रेयसीच्या पावलाची प्रत्यक्ष चाहूल लागली पाहिजे, तिच्या आगमनाबरोबर आकांक्षापूर्तीचा, साफल्याच्या समृद्धीचा पहाटवारा आपल्या अगावरून वाहत गेला पाहिजे, असख्य लोलक लावलेलीं झुंबरे हृदयात उजळली पाहिजेत ! अशी प्रीतिदेवता प्रत्यक्ष भेटणे हे जीवन-सर्वस्व होय. पण आपलीच भाग्यदेवता कंगाल असली तर निदान ती दुरून दिसावी एवढीच कवीची इच्छा आहे. 'डोळेभेट दुरून-- !' अमर्याद इच्छा करणाऱ्या हळुवार मनाची ही साधी आकाक्षा तरी पूर्ण करणारा परमेश्वर कोठे असेल का ?

अगदी रसरसलेल्या भावनाचा इतका उत्कट व भारून टाकणारा आविष्कार मराठींत अन्यत्र कोठे झाला असेल असे वाटत नाही. उत्कट भावना म्हणजे काय हे ज्याला माहीत नसेल त्याने गडकऱ्याच्या या अलौकिक सौंदर्याने भारावलेल्या सुनीतातील तन्मयता आत्मसात् करून घेण्याची प्रथम खटपट करावी, आणि भारून जाणें हा प्रकार काय असतो त्याची प्रत्यक्ष प्रतीति घ्यावी. आत्यंतिक उत्कटतेमुळेच गडकऱ्याच्या या सुनीताला असली शोभा प्राप्त झाली आहे. उत्कट भावनाचा तितकाच उत्कट आविष्कार हें प्रत्येक कलेचे सर्वस्व होय असें कीट्स म्हणत असे. 'The excellence of every art is its intensity' या कीट्सच्या उद्गारातील मर्म गडकऱ्यांचें हें सुनीत वाचून उकलेल असे वाटते.

सौंदर्यांतील पावित्र्य, उदात्त भावना जागृत करण्याचें सौंदर्याचें सामर्थ्य, त्याची दिव्यता, या गोष्टी गडकऱ्यांनी मान्य केल्या असल्या तरी सौंदर्याच्या फसवेपणाची प्रतीतीहि त्याना जाणवलेली आहे. प्रीतीच्या भावनेचा लेशहि नसलेलें नुसतें दिखाऊ बाह्य सौंदर्य व्यर्थ आहे असें ते म्हणतात. **मोरपिसावरचा डोळा** या मागे उल्लेखिलेल्या कवितेंत सौंदर्याचा हा फसवेपणा व्यक्त झाला आहे.

> सजीवतेचे निर्जिव फूल । नुसती सौंदर्याची भूल ॥ . .
> क्षणमात्राची मोहकता ही। चञ्चलतेने चमकत राही ।
> प्रेमाचे मुळिं पाणी नाही । .
> शोभा प्रेमावाचुनि फोल ।

वरील उद्‌गार कवीच्या मनातील भावना व्यक्त करणारे आहेत, ते त्याच्या आत्मनिष्ठेचे (subjectivity) द्योतक आहेत असे मानले तरच त्यातील आशय यथार्थपणें प्रकट होईल. वस्तुनिष्ठ दृष्टीने (objectively) त्याचा विचार केला तर ते असत्य आहेत हे कबूल करावे लागेल. जगतातलें यच्चयावत् सौंदर्य फसवें असते काय ? प्रेम आणि सौंदर्य याची संगति कोठेच नसते काय ? सर्वच सुदर डोळे भुरळ घालून प्रतारणा करण्यासाठीच टपलेले असतात काय ? असे मुळीच नाही. ज्या सौंदर्याकडून प्रेमाच्या प्रत्युत्तराची अपेक्षा असते त्याच्याकडून ती अपेक्षा सफळ न झाल्यामुळे वैतागाच्या भरांत सौंदर्य हे फसवे असतें असा सिद्धात सांगण्याचा मोह होतो. असाच मोह या ठिकाणीं कवीला झालेला आहे. हे त्याचे वैयक्तिक उद्‌गार असून सापेक्षतेने खरे आहेत, म्हणजे त्याचे सत्य त्याच्या स्वतःच्या वैयक्तिक अनुभूतींपुरतेच मर्यादित आहे.

सौंदर्य जेव्हा स्वार्थासाठी विश्रब्ध, भोळ्या प्रेमाची प्रतारणा करतें तेव्हा सौंदर्यातील सारे रुचिरत्व नष्ट होऊन तें ' दुर्दर्शन ' बनतें असा विचार **दुर्दर्शन** या छोट्या कवितेंत आला आहे. तात्पर्य, सौंदर्य हें नेहमीच पवित्र व उदात्त असते या विचाराला धक्का बसेल असा कांही अनुभव सत्यसृष्टींत आल्याबरोबर स्वार्थी व फसवें सौंदर्य जगात असूं शकतें हें कवीला कळलें आणि तो विचार बळावल्याबरोबर त्याचा त्याने आवि-

ष्कारहि करून टाकला. हे सारे विचार कवीच्या त्या त्या वेळच्या मनः-स्थितीवर किंवा ' मूड 'वर अवलबून आहेत, ते ' सब्जेक्टिव्ह ' आहेत, हें लक्षात घेतलें म्हणजे घोटाळा होणार नाही. याच आत्मनिष्ठेच्या दृष्टि-कोनातून **निर्दय बालेस** व **हृदयास** या दोन कवितामधील सौंदर्याच्या अधिक्षेपाचा विचार करावा लागेल. खऱ्या गुणाकडे दुर्लक्ष करून ' नटव्या थाटापाठीं ' धावणाऱ्या सौंदर्याचा गडकऱ्यानी **निर्दय बालेस** या कवितेंत तीव्र धिक्कार केला आहे. ही कविता त्यानी १९१६ च्या मार्चच्या अखेर लिहिली असावी. या काळात सौंदर्याच्या वंचनाकौशल्याची प्रतीति येण्यासारखा काही प्रसग गडकऱ्याच्या जीवनांत खरोखर घडलेला असेल-काय? परंतु याहिपेक्षा कितीतरी अधिक कटु शब्दात त्यानी **हृदयास** या कवितेंत फसव्या सौंदर्याविषयींचा तिरस्कार अगदी स्पष्टपणे प्रकट केला आहे. ' बेगडी सुंदरतेच्या मोहाने ' वंचित झालेल्या आपल्या हृदयास ते म्हणतात—

> नटव्या सोंगामागे लागे जे त्या सौंदर्यासाठीं ,
> नवलाखाचे मोल देसि का ? कशास या आटाआटी ?

ज्या सौंदर्याला गुणाची चाड नाही तें खरे सौंदर्यच नसून कमअस्सल जातिचें सौंदर्य आहे, ते केवळ एक मातीचे बाहुलें आहे, रगीत खेळणे आहे, यापेक्षा त्याला अधिक किंमत देण्याचे मुळीच कारण नाही—इत्यादि कटु शब्दाचा अहेर गडकऱ्यानी सौंदर्याला केलेला आहे. निरभिलाष तन्मयतेचे मुक्तकंठाने गोडवे गाणारे आणि सौदर्ये हीं ' देवाघरची लेणीं ' आहेत असे मानणारे, सौंदर्य हें पावित्र्याचे निधान असते आणि त्या पावित्र्यामुळे पाहणाराच्या मनातील कलुषित वृत्तींचा निरास होऊन त्याचे आदरात परिवर्तन होईल" असे मानणारे गडकरी, आणि अशा प्रकारे सौंदर्याचा धिक्कार करणारे गडकरी, या दोन व्यक्ति एकच आहेत का अशी शंकाहि येणें शक्य आहे. पण ही शका व्यर्थ आहे. ज्या गडकऱ्यानी सौंदर्या-तील पावित्र्याचें स्तवन केले होतें त्याच गडकऱ्यांनी सौदर्याचा हा इतका विलक्षण धिक्कार केलेला आहे. भिन्न कालखंडांतील भिन्न परिस्थिती-मुळे, भिन्न घटनांमुळे, एकाच गोष्टीविषयीं त्यांच्या मनांत भिन्न, अथवा

परस्परविरोधी, विचार निर्माण झाले होते असा याचा सरळ अर्थ आहे. किंवा निराळ्या भाषेंत सागावयाचे झालें तर आदर्शभूत, भासात्मक, अव्यवहार्य स्वप्नसृष्टि, अथवा आत्यंतिक ध्येयवाद, आणि सत्यसृष्टींतील कठोर व्यवहारी जीवनांत येणारे विविध अनुभव यांच्यातील हा दारुण कलह असून त्यांत अखेर सत्यसृष्टीने ध्येयवादावर मात केली आहे हें स्पष्ट दिसतें.

आणि गडकऱ्याच्या मनात असल्या परस्परविरोधी भावनाचा सतत सघर्ष चाललेला होता. ध्येयवादाच्या—आत्यंतिक व अव्यवहार्य ध्येयवादाच्या-आहारीं गेल्यामुळे निरभिलाष तन्मयतेचें कौतुक करणारे गडकरी जीवितास—या कवितेंत अगदीच निराळी भावना प्रकट करताना दिसतात.

> सौंदर्याच्या दर्शनमात्रे जागृत होत्या जीवात ।
> विकल चेतना नाचे नुसती स्वस्थानीं व्हाया श्रात ।।
> जनसमर्दी अलभ्य शोभा पाहुनि, ठसवुनि मनिं वेगे ।
> एकाती तच्चिंतन करणे, दु खावेगी विस्मरणे ।।

ही निरभिलाष तन्मयता आहे असे खुद्द गडकरी तरी म्हणू शकतील काय ? सौंदर्याच्या दर्शनाने जे विकार चित्तात प्रादुर्भूत होतात त्या विकाराना समाधानाची पूर्तता प्राप्त न झाल्यामुळे, ते सौंदर्य अलभ्य आहे या कटु जाणिवेमुळे, पराकाष्ठेची खिन्नता येते व एकातात त्या सौंदर्याचे चिंतन करणें हा एकच मार्ग उरतो असा या ओळींचा आशय आहे. पुन्हा ध्येयवादावर, निराश, निरभिलाष प्रेमाच्या स्वप्नसृष्टीवर, सत्यसृष्टींत वावरणाऱ्या भावनावश माणसाच्या साभिलाष तन्मयतेची मात झाली ! आणि अशी मात होणारच ! गडकऱ्याचा त्याला काही इलाज नाही ! मानवी मनाचे जे धर्म असतात, ज्या सहज प्रवृत्ति असतात, त्याना डावलून स्वप्नसृष्टींतील मृगजळामागे धावणाऱ्या जीवाला कधीतरी आपली दारुण वचना झाली हे कळून येणारच, तें अपरिहार्य आहे ! ‘ वस्तुनाशावाचूनच तिच्या सौंदर्याचा उपभोग मनुष्यबुद्धीला का बरें घेता येऊ नये ? ’ या वसुंधरेच्या प्रश्नात तत्त्वज्ञानातील सत्य सामावलेलें असले तरी गडकऱ्यांच्याच भाषेंत बोलावयाचें झालें तर ‘ भावपूर्ण हृदयाला ’ तें पटत नाही, आणि सौंदर्याच्या प्रत्यक्ष प्राप्तीची धडपड त्या हृदयाचा सतत पाठलाग करीत

राहते. हा सौंदर्याचा प्रभाव आहे. आणि हा प्रभाव जाणवूं लागताच मला डी. जी. रॉझेटीच्या त्या ओळी आठवतात.

> This is that Lady Beauty, in whose praise
> Thy voice and hand shake still .

---

# १२. उन्माद मानसीं भरला.

प्रमोहो निद्रा वा किमु विषविसर्प किमु मद ?
तव स्पर्शे स्पर्शे मम हि परिमूढेन्द्रिगणो
विकारश्चैतन्य भ्रमयति च समीलयति च ॥

—भवभूति

Just so may love, although 'tis understood
The mere commingling of passionate breath,
Produce more than our searching witnesseth

—*Keats*

निष्काम, निरभिलाष, शुद्ध प्रेमाच्या मृगजळाच्या मागे धावणाऱ्या गडकऱ्याच्या भावनांचें आंदोलन मोठे विचित्र होतें. सौंदर्याच्या दर्शनाने पाहणाराच्या मनांत केवळ पावित्र्य व मांगल्य याचाच प्रादुर्भाव व्हावयास पाहिजे आणि त्याच्या सहवासात कलुषित भावना निवळल्या पाहिजेत, त्याच्याविषयीं अभिलाषा निर्माण न होता आदरभावच निर्माण व्हावयास पाहिजे इत्यादि रुचिर ध्येये कवटाळूं पाहणाऱ्या गडकऱ्याची मनःस्थिति प्रत्यक्ष सृष्टींत सौंदर्याच्या दर्शनाने कशी बेभान होत असे व ते सौंदर्य आपल्याला अलभ्य आहे या कटु सत्याची जाणीव तीव्रपणे झाल्याबरोबर नैराश्याच्या असंख्य इंगळ्या त्याच्या हृदयाला कशा डख करीत असत हें **जीवितास**— या कवितेत पूर्ण स्पष्ट झालें आहे. वास्तविक, जन्मापासून निराश असलेल्या निरभिलाष तन्मयतेला सौंदर्य दुष्प्राप्य आहे या जाणिवेने

असलें विचित्र औदासीन्य येण्याचे मुळीच कारण नाही. उदात्त व शुद्ध प्रेमाची कल्पना आणि अभिलाषा यामधील हा कलह गडकऱ्याच्या अनेक कवितांत पुन्हा पुन्हा प्रकट झाला आहे. या कलहाचीं वेगवेगळीं परिवर्तनें व त्याच्या अनुषगाने प्रेमविषयक कल्पनामध्ये होणारी परिवर्तनें याचें जे विलसित गडकऱ्याच्या कवितात दिसून येतें त्याचा अभ्यास करणें मनोरजक होईल.

निरभिलाष तन्मयतेच्या व शुद्ध, सात्त्विक, निष्काम प्रेमाच्या कल्पनेत रगून जाणाऱ्या गडकऱ्यानी अभिलाषेचा, अगदी शारीर अभिलाषेचा किंवा कामुकतेचा उन्माद ज्यांमध्ये ओतप्रोत भरलेला आहे अशाहि काही कविता लिहिलेल्या आहेत. ही कामुकता कधी उत्तानपणे प्रकट होते तर कधी पर्यायोक्तिचे, सूचकतेचे अवगुंठन परिधान करून प्रकट होते. कामुक अभिलाषा, स्त्रीसौंदर्याच्या उन्मादात वाहवून जाण्याची लालसा, उत्कट वासनाची गहिरी धुदी, आणि ' प्लेटॉनिक लव्ह ' मध्ये अभिप्रेत असलेली वासनारहित, निरभिलाष सात्त्विक प्रेमाची ध्येयवादी कल्पना याचा तुमुल सगर एकाच मनात आलटून पालटून, किंवा एकाच वेळीं चालू असतो याचा हा उत्कृष्ट पुरावा होय.

फेब्रुवारी १९४४ च्या **समीक्षक** मासिकाच्या गडकरी विशेषाकात गडकऱ्याच्या काही अप्रकाशित कविता प्रसिद्ध झाल्या आहेत. **झडपिला घारिने हार !** ही त्यातील एक कविता आहे. प्रियकराशीं झालेल्या पहिल्या शारीरिक मीलनाचा अनुभव एक तरुणी आपल्या मैत्रिणीजवळ कथन करीत आहे अशी या कवितेची भूमिका आहे. एक तरुण मुलगी दुसऱ्या समवयस्क मुलीजवळ हे कथन करीत आहे हे लक्षात घेतले म्हणजे शृगारिक कल्पना सूचकतेच्या, पर्यायोक्ताच्या, व्यग्यार्थाच्या अवगुठनात गुरफटून आल्या पाहिजेत हें मान्यच करावे लागेल. आणि या कवितेंत तेच झालें आहे. कल्पना कमालीच्या शृंगारिक असल्या तरी व्यग्यार्थाची ओढणी घेतल्यामुळे त्याचे लावण्य पूर्ण परिस्फुट नाही. तथापि ही ओढणी अगदी झिरझिरीत असल्यामुळे आंतील रंगाच्या छटा निरखून पाहणे सहज शक्य आहे. कालपर्यंत निरागस व अल्लड असलेली कुमारिका एका रात्रींत तरुणी झाली ! केवढा हा बदल !

विरे जळिं गार । झडपिला धारिनें हार ! [१]
गेल्या रात्रीं खेळत होती,
गालीं, नयनीं, हृदयावरती,
नाचत रोमारोमाभवतीं,
सखे, ती लाज ! कुणिकडे पळाली आज ?
रात्री होते अजाण पोर
एका रात्रित झाले थोर
माझ्या बाळपणाचे चोर
बाई फार ! नवलाचे जादूगार !

शारीरिक अभिलाषेच्या असह्य उन्मादातील तन्मयतेचे व तिच्या बाह्य परिणामाचे हे सूचक वर्णन पाहा.

ओठा ओठ लागल्या काळी,
मिटल्या नयनीं रात्र पसरली,
फुलल्या वदनी सकाळ आली,
रंगली फार, गालावर ऐन दुपार

परंतु शृंगारिक कल्पनाचे वर्णन करीत असता गडकरी सर्वत्र असल्या सूचकतेचा अवलंब करतात असे मात्र मुळीच नाही. गुलाबी कोडें या प्रसिद्ध कवितेंत शृंगाराच्या छटा पुष्कळच रंगदार व स्पष्ट झाल्या आहेत. पश्चिम दिशेला सूर्यास्ताच्या समयीं आकाशात तांबूस छटांचे शिंपण झालेले असते. पण त्याच वेळीं पूर्वेकडेहि आरक्त छटा का दिसाव्या असा अत्यंत 'गूढ' प्रश्न एका मुग्ध बालेने आपल्या प्रियकराला विचारला आहे, आणि हे 'गुलाबी कोडे' त्याने कृतीनेच सोडवून दाखविले आहे.

रविबिंबासम चुंबनबिंबचि विलसत या गालीं,
सहज तयाची छटा गुलाबी पसरे भवतालीं
चुंबनचित्र न परी उमटता या दुसऱ्या गालीं,
सांग वल्लभे ! नाचतसे का त्यावरि ही लाली ?

प्रियेच्या लोभसवाण्या शंकेचें निरसन तितक्याच लोभसवाण्या रीतीने करणें जरूर नाही काय ?

**गुलाबी कोडें** १९११ च्या सप्टेंबरच्या **मनोरंजनांत** प्रसिद्ध झालें. यानंतर एका वर्षाच्या आंतच १९१२ च्या एप्रिलमध्ये गडकऱ्यांची खूप गाजलेली **पहिलें चुंबन** ही कविता प्रसिद्ध झाली. या कवितेंत सूचकता, पर्यायोक्त, व्यंजना इत्यादींना साफ फाटा मिळालेला आहे. ही कविता लिहीत असताना कसला तरी विचित्र उन्माद गडकऱ्यांच्या मनांत संचारलेला दिसतो. चुंबनासारख्या— विशेषत: पहिल्या चुंबनासारख्या — अत्यंत उन्मादक व गहिऱ्या विषयावर तितक्याच उन्मादक व गहिऱ्या शैलीने अगदी मनमोकळेपणाने ( या मनमोकळेपणालाच काही लोक उत्तानपणा म्हणतात! ) लिहिलेली आधुनिक मराठींतील ही पहिलीच कविता असेल कदाचित्. आकर्षक शैली व शृंगारिक कल्पना या गोष्टींना मोहक चालीची जोड मिळाली असल्यामुळे या कवितेची शोभा काही विशेषच मदिर झाली आहे. या कवितेंतील एक दोन कल्पना काहींना उत्तान वाटतील हे खरे आहे. पण कालिदासाच्या मेघदूताचा ज्याना निकटचा परिचय आहे, व **शाकुन्तलां**तील ' चलापाङ्गां दृष्टिं स्पृशसि बहुशो वेपथुमतीम् ' इत्यादि श्लोकातील गहिरें वातावरण ज्यानी अनुभाविलें आहे अशा मार्मिकाना गडकऱ्याच्या या कवितेत सारें सोज्वळपणच दिसेल. The First Kiss of Love या बायरन्च्या कवितेवरून गडकऱ्याना ही कविता सुचली असावी असे काहींचें म्हणणें आहे. हें शक्य आहे. परंतु बायरन्च्या कवितेत व गडकऱ्याच्या प्रस्तुत कवितेत एक मोठा फरक आहे. पहिल्या चुंबनाच्या सरसतेचें वर्णन करून बायरन् थाबला आहे; पण चुंबनाच्या साऱ्या कृतीचे गडकऱ्यानी अगदी तपशीलवार गहिरें वर्णन केलें आहे. यामुळे बायरन्च्या कवितेपेक्षा गडकऱ्यांची कविता परिणामाच्या दृष्टीने किती तरी अधिक उन्मादक झालेली आहे, हें कोणीहि सहृदय कबूल करील असें वाटतें. उदाहरणार्थ तिसरें व चवथे हीं दोन कडवीं वाचावीं. गडकऱ्याच्या कवितेचे शेवटचे कडवे व बायरन्च्या कवितेचे शेवटचे कडवें यांमध्ये पुष्कळच कल्पनासाम्य आहे. गडकऱ्याच्या ओळी पुढीलप्रमाणे आहेत.

एकदाच अनुभव त्याचा । आरंभ अंत सौख्याचा । एकदा ।
आयुष्य न त्याला क्षणही । जन्मही पुन्हा त्या नाहीं । एकदा ॥
मनिं चटका लावायासी । पाठवी दैव जणुं त्यासी । एकदा ।

निशिदिनीं । वाटते मनीं । नित्य जन्मुनी ।।
मरण सोसावे ! परि पहिले चुंबन घ्यावे । फिरुनीहि !

आता या ओळींची बायरन्‌च्या पुढील ओळींशीं तुलना करून पाहावी.

When age chills the blood, when our pleasures are past—
For years fleet away with the wings of the dove—
The dearest remembrance will still be the last,
Our sweetest memorial the first kiss of love

उन्मत्त शृंगाराची धुंदी वर्णन करणारी कविता गडकऱ्यांनी यानंतर एकहि लिहिली नाही हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. या कवितेत इतका उन्माद जो भरलेला आहे त्याचे कारण शोधून काढणें फारसे कठिण नाही. निरभिलाष तन्मयतेच्या स्वप्नसृष्टीत विहार करणाऱ्या, परंतु सत्यसृष्टींत मात्र सौंदर्याच्या उन्मादात धुंद होऊन जाणाऱ्या व त्याच्या दुष्प्राप्यतेमुळे आतल्या आत कुढणाऱ्या गडकऱ्याच्या मनातील उफाळून येणाऱ्या वासनाचा तो आविष्कार आहे. या धुंदीचा उन्माद या प्रकारच्या मानसिक कलहाने गांगरून गेलेल्या माणसात मधून मधून दिसून आला तर त्यात अस्वाभाविक असे काहीहि नाही.

दिव्य, निरभिलाष प्रेम, व शारीरिक वासनाचा उद्रेक याच्यातील कलहामध्ये वासनाचा विजय होतो हा प्रकार गडकऱ्याच्या कवितामध्ये यापुढे स्पष्टपणे प्रकट झाला नसला तरी त्याच्या मनाची ही शरणागति ठिकठिकाणीं आविष्कृत झालेली आहे हे आपणास पुढे तपशिलाने पाहावयाचे आहे. तूर्त त्याच्या नाटकात हा प्रकार कसा दिसून येतो ते पाहू.

प्रेम हे एकाच प्रकारचें नसून अनेक प्रकारचे असते, आणि त्यांत निरभिलाष तन्मयतेपासून, निष्काम व शुद्ध प्रेमापासून, उन्मत्त वैषयिक प्रेमापर्यंत सर्व छटा आढळतात प्रेम हें नेहमी एकरूपच दिसून आले तर त्यांत स्पृहणीय असें काहीहि राहणार नाही. यक्षाच्या अलकेंत बारमहा चांदण्याने फुललेल्या रात्री असतीलहि कदाचित्. पण अक्षय चांदण्याने यक्ष फार तर संतुष्ट होतील. विविध भावनांच्या मिश्रणाने ज्यांची मनोवृत्ति अत्यंत गुंता-

गुंतीची झालेली आहे अशा आपल्यासारख्या मानवांना छायाप्रकाशाचा लपंडाव आवडत असतो, ऊनपावसाचा पाठशिवणीचा खेळ मनोहर वाटत असतो. आणि गडकऱ्यांनी कांही ठिकाणीं ज्याचें स्तवन केलें आहे तसलें निरभिलाष, दिव्य, निष्काम प्रेम जगात सदैव नांदूं लागलें तर त्यात स्पृहणीय असे काहीहि उरणार नाही. हीच कल्पना पुण्य-प्रभावातील कालिंदीच्या पुढील उद्गारांत व्यक्त झाली आहे.

> "संसाराची सारी गोडी नश्वरतेत—अगदीं अविश्वासी क्षण-भंगुरतेंत आहे ! प्रेमांत अमृतासारखें नीरस, एकरूप चिरजीवन असेल तर त्याच्या स्पर्शानें हृदयाची भिंती धडधड एकदम बंद पडेल...प्रेम अमृतमय नाहीं !"

नश्वरतेमुळे व आशानिराशाच्या लपंडावामुळे प्रेमाला मनोहर शोभाच प्राप्त होते असे सुचवून कालिंदीने प्रेमांत सामावलेल्या आत्यंतिक उन्मादाचें स्वरूप पुढीलप्रमाणें वर्णिले आहे—

> "प्रेम अमृतमय नाहीं ! मदिरेच्या बेफाम धुदींत, अफूची गुंगी आणि भांगेची थरारणारी तल्लीनता मिसळून परमेश्वराने प्रेमाचा प्याला निर्माण केला आहे."

थोडक्यात, मदिरेची धुंदी व आत्यंतिक, उत्कट, प्रेमाचा उन्माद याची जात एकच आहे असे कालिंदीला सुचवावयाचे आहे. या उन्मादाने होणारी चित्ताची कालवाकालव काही वेळा अत्यंत असह्य होत असली तरी ती पराकाष्ठेची स्पृहणीयहि पण असते. याच उन्मादाच्या पोटीं मोठमोठे कवि सुद्धा अनेक वेळा शृंगारिक प्रतिमानानी ओतप्रोत भरलेलीं, मनाच्या बेभान अवस्थेचें उत्कट स्वरूप दाखविणारीं, अत्यंत उन्मत्त व गहिरीं वर्णने करीत असतात. क्वचित् असल्या वर्णनात वैषयिकता, किंवा कामुकता यांचाहि साक्षात्कार झाल्याविना राहणार नाही. पण मानवी मनाची अतृप्त लालसा पूर्ण होण्याचें ते एक साधन आहे, ही सहज प्रवृत्ति आहे, चित्तांत दडलेल्या भावनाचा तो बाह्य आविष्कार आहे असें समजण्यावाचून गत्यंतर नाहीं. याच उन्मादक धुंदीने भारावल्यामुळे

निसर्गातील अनेक दृश्यांच्या अवलोकनाने मनांत उदात्त भावनांचें स्फुरण होण्याऐवजीं कामुकतेची झालर लावलेलीं--अगदी उत्तान कामुकतेने रसरसलेलीं-चित्रे डोळ्यासमोरून तरळून जातात. असल्या सवेदना निर्माण होऊन त्यानी मनाचा कोनाकोपरा व्यापून टाकला म्हणजे ओसडून वाहणाऱ्या भावना कामुकतेच्या साऱ्या मोहक छटाचे मोहक स्मित उचळीत प्रकट होत असतात. भूपालाचे हे भाषण पाहा.

"माझ्या चद्रकलेच्या कल्पनेने तुझ्या डोळ्यासमोर सतीचे उदात्त कल्पनाचित्र दिसू लागले आणि त्याच वेळीं, वस्त्राच्या उल्लेखावरून मला निराळाच विचार आठवत आहे. त्या पलीकडच्या डोंगरावर पाढऱ्या ढगाच्या पातळ पट्टयाशीं चद्राचीं किरणे खेळताना पाहून आपल्या हलक्या हातानीं चद्रमा भूदेवीच्या स्तनावरील हे सूक्ष्म धवल वस्त्र बाजूला सरकवीत आहे असे मला वाटलें." (पुण्यप्रभाव, अक २, प्र. २ )

माणसाच्या ठिकाणीं ज्या मूलभूत प्रवृत्ति असतात त्याचाच आविष्कार असल्या उत्कट शृगारिक कल्पनाचित्राच्या द्वारे होत असतो. कालिदासाच्या मेघदूतात असल्या उन्मादक कल्पनाचित्राची अक्षरशः पखरण झालेली आहे. हाच उन्माद भूपालाच्या पुढील भाषणात अगदी ओसडून वाहत आहे. ही द्राक्षासवाने आणलेली गुगी आहे, ही उन्मनी अवस्था आहे.

"त्या निशेच्या गोड धुंदींत हृदय उसळत्या रक्ताच्या खळखळाटात बुद्धीला बुडवीत असल्यामुळें, तिची बडबड होडीच्या दोहों बाजूस मोडत्या लाटावर चाललेल्या जलतरगाच्या मर्मरध्वनीप्रमाणें मधुर वाटत आहे; किंचित् बेसावधपणानें माझा हात गळ्यात पडताना तुझा पदर जरासा अस्ताव्यस्त झालेला आहे; पदर तेवढासा सरकल्याचीसुद्धा तुला अधुक जाणीव आहे, पण बादशाही कैफाच्या अमली आळसामुळे तो सावरून घेण्याइतकी तत्परता नाहीं; डोळ्याच्या पडद्यावर गारवा वाढत जाऊन न

कळत पापणीला पापणी लागत आहे! अशा स्थितींत सागर-संगमाच्या सीमारेषेजवळ आपली नौका डळमळत आहे! आणि ही साधी गोष्ट सांगण्यासाठींसुद्धा मी नादानें तुझ्या कानाजवळ तोंड आणीत आहें; मुखस्पर्शाच्या उष्ण चेतनेने तुझ्या देहावर रोमांच थरारून तू आपला केशपाश माझें तोंड चुकविण्यासाठीं आपल्या गालावर ठेवला आहेस, त्याच्या भिरभिरत्या रुळतीनें माझ्या सर्वांगाला नखशिखान्त गोड झिणझिण्या महिरून टाकीत आहेत, अखेरच्या हालचालीने मीं आपले ओठ तुझ्या ओठाशीं आपले आहेत ..''

स्त्रीपुरुषाच्या निकट सहवासातील शारीरिक मीलनाचा उन्माद ही काय चीज असते याचे अत्यंत उन्मादक कल्पनाचित्र वरील उताऱ्यात रंगलेले दिसून येईल. ही निरभिलाष तन्मयता आहे असे कोणीहि स्वप्नातल्या स्वप्नात सुद्धा म्हणू शकणार नाही. प्रेमाच्या अनेक जाती असतात, नव्हे असल्या पाहिजेत, असे जें वर म्हटले त्याचा प्रत्यय खुद्द गडकऱ्यानाहि आल्याशिवाय कसा राहणार?

राजसंन्यास नाटकाच्या पहिल्या अंकाच्या पहिल्याच प्रवेशात वासनाचा हा उन्माद असाच स्वैरपणे प्रकट झाला आहे. हा प्रवेश गडकऱ्यांनी १९१६ च्या नोव्हेंबरच्या पहिल्या आठवड्यात लिहिलेला आहे. म्हणजे, पुण्यप्रभावांतील वर उल्लेखिलेला प्रवेश लिहिला त्याच्या आसपास हा प्रवेश गडकऱ्यानी लिहिलेला आहे. भूपालाच्या भाषणातील बादशाही कैफ पुन्हा संभाजीच्या भाषणात ओसंडत आहे.

"साजणी, उचंबळती लाट डोक्यावरून निघून गेल्यावर, घाबरल्या हातानीं तोंडावरचे केस मागें सारताना चुकार केसाचा एखादा गोफ तसाच गालावर खेळत आहे. लाटेच्या माराला भिऊन झिरझिरीत पदर आपल्या उराशीं लपत आहे! उघडत्या पांपणीवरच्या तुषारामुळे डोळ्यांची धादलीनें उघडझांक होत आहे...... "

" गोविंदाग्रजांच्या प्रेमविषयक कल्पनेंत वैषयिक प्रेमाची छटा उमटलेली स्पष्ट दिसेल..." अशी तक्रार करून डॉ. हर्षे[२] पुढे म्हणतात—

> " शिष्ट लोक गोविंन्दाग्रजांच्या कवितेला नाकें मुरडतात त्याचें कारण तरी हेंच होय. आपल्या दयितेची ' निर्वाणीची विनवणी ' करीत असताना ' चुम्बन दे रमणी ' याच्या पलीकडे ज्याच्या हेतूची मजल जाऊं शकत नाहीं त्याच्या शुद्ध प्रेमाचा कोणाला विश्वास येणार आहे ? "

हें प्रतिपादन करीत असता डॉ. हर्षे याच्या मनात समजुतीचा काही तरी विचित्र घोटाळा झालेला दिसतो. गडकऱ्यांच्या कवितात, व नाटकांतहि काही ठिकाणीं उत्कट उन्माद भरलेला दिसतो हें मीं वर सप्रमाण दाखविलेंच आहे. मुद्दा असा आहे की, गडकऱ्याच्या प्रेमविषयक कल्पनेंत प्रेमाचें एकच रूप दिसत नसून त्यात किती तरी छटा स्पष्ट दिसत आहेत; आणि यापैकी कांही छटा तर परस्परविरोधी सुद्धा आहेत. प्रेमाचे अनेक प्रकार असूं शकतात, व त्यातहि अतर्क्य छटाचा अंतर्भाव अनेक वेळां झालेला असतो ही गोष्ट डोळ्याआड केल्यामुळे डॉ. हर्षे यांनी गडकऱ्याच्या काव्यांत आविष्कृत होणाऱ्या उन्मादाविषयीं तुच्छताबुद्धि प्रकाट केली आहे व कांही ' शिष्ट ' लोकांचा हवाला या बाबतींत दिला आहे. प्रेमात वैषयिक छटा असली म्हणजे तें सर्वथैव त्याज्य व तिरस्करणीय असतें असा समज उराशीं कवटाळून बसणाऱ्या ' शिष्ट ' लोकांची कांही तरी फसगत होत असली पाहिजे. वैषयिक छटेमुळे प्रेमाच्या कल्पनेंतील चागुलपणाला यत्किंचित् बाध येत नाही हें आवर्जून स्पष्ट केलें पाहिजे. निरभिलाष तन्मयतेचें, व शुद्ध, निष्काम, दिव्य प्रेमाचे इतके पवाडे गडकऱ्यानी गाइले, पण मूलभूत मानवी प्रवृत्तींचा सर्वंकष प्रभाव त्यांना डावलता आला नाही; आणि कोणालाच तो डावलता येणें शक्य नाही. मानवी मनात निरनिराळ्या प्रवृत्तींचा कधीहि न संपणारा जो तीव्र कलह चाललेला असतो ज्याच्याच पोटीं प्रेमविषयक निरनिराळ्या कल्पना उद्भूत होतात. ध्येयवाद– आत्यं-

तिक ध्येयवाद– सत्यसृष्टींत अवतरावा म्हणून अमर्याद इच्छा करणाऱ्या गडकऱ्यांच्या अभिलाषांचें, वासनांचें, काहूर सदैव चाललेलें होतें; आणि यांतूनच वर उल्लेखिलेलीं उन्मादक कल्पनाचित्रें निर्माण झालीं हें उघड आहे. शिवाय, वैषयिक छटेचा ज्यात मागमूस सुद्धा नाही असलें प्रेम भावनांनीं संकुल असलेल्या मानवाच्या ठायीं दिसणें शक्य नाही. परमेश्वराविषयीं जें प्रेम माणसाला वाटतें तें निरभिलाष, निष्काम, वासनारहित, असावयास हरकत नाही. पण त्याहि प्रेमात वैषयिकतेच्या छटा अनेक वेळां दिसतात—अगदी हळुवार अंतःकरणाच्या प्रेमळ भक्ताने केलेल्या परमेश्वर-स्तवनातहि दिसतात– हे अनेक सतांच्या व संतिणींच्या भक्तिभावनेच्या आविष्कारात स्पष्टपणें दिसून येईल परमेश्वर हा प्रियकर व भक्त म्हणजे प्रेयसी हें रूपक सर्वांगपरिपूर्ण रीतीने वापरलेलें संतवाङ्मयात आढळून येत नाही काय ? जेथे वैषयिक छटेची ओझरती तिरीप सुद्धा येता कामा नये अशा परमेश्वरस्तवनाच्या बाबतींतहि परमेश्वराशीं आत्यंतिक तादात्म्य पावलेल्या विरक्त भक्तांच्या प्रेमळ आवाहनात सुद्धा शृंगाराच्या —किंबहुना उत्कट शृंगाराच्या साध्या छटा नव्हत, तर अगदी भडक छटासुद्धा– दिसून येतात. मग अनेक प्रकारच्या रसरसलेल्या भावनानी व उत्कट मनोविकारांनी ओतप्रोत भरलेल्या स्त्रीहृदयाचे वर्णन करीत असता, स्त्रीहृदयावर प्रभुत्व गाजविणाऱ्या प्रेमाचें वर्णन करीत असता, किंवा प्रेयसीवर उत्कट प्रेमाची वृष्टि करण्यासाठी आतुर झालेल्या भावनावश प्रेमिकाच्या मनाच्या अवस्थेचें वर्णन करीत असतां, किंवा प्रेमिकांच्या मीलनांतील तादात्म्याचें वर्णन करीत असतां, कवि काय केवळ भक्तिरसाने ओथंबलेले अभंग गात बसणार ? भक्तिरसाने ओथंबलेले अभंग गाणारे भक्तहि वैषयिक प्रेमाच्या कल्पनेपासून अलिप्त राहूं शकत नाहीत. ( या माझ्या विधानांतील सत्य पडताळून पाहण्याची इच्छा ज्यांना झाली असेल त्यांनी " अध्यात्माला शृंगाराची पुरवणी " हा माझा महाराष्ट्र–साहित्य–पत्रिकेंतील ज्ञानेश्वरीवर लिहिलेला विस्तृत निबंध अवश्य वाचावा ). हें जर सत्य आहे तर ' बाला पुष्पवती सलज्ज असते एकांतिंही यापरी ', किंवा ' पुष्पवतीच्या तोंडावरची छाया काय उदास ' यांसारख्या ओळी

लिहिणाऱ्या ( खरें म्हटले तर, डॉ. हर्षे यांना आक्षेपार्ह वाटणाऱ्या या ओळींतील कल्पना वाच्यार्थाने प्रकट झालेली नसून मोहक व्यंजनेच्या द्वारें प्रकट झालेली असल्यामुळे मुळीच त्याज्य नाही ! ), किंवा **गुलाबी कोडे** व **पाहिलें चुम्बन** यासारख्या कविता लिहिणाऱ्या गडकऱ्यांच्या प्रेमकल्पनेंत वैषयिक प्रेमाची छटा दिसते असें म्हणून त्यांना हिणविण्यात कोणता मतलब आहे ? या वैषयिक छटामुळे औचित्यभंग झालेला आहे, अथवा अस्थानीं व अवेळीं हीन अभिरुचीचें उत्तान प्रदर्शन झालें आहे, असे जोंपर्यंत दिसत नाही तोपर्यंत त्या छटामुळे गडकऱ्याच्या कविता अथवा त्याचीं नाटकें त्या भागापुरतीं आक्षेपार्ह ठरत नसून तीं उलट सुशोभितच झालीं आहेत असे मला वाटतें.

किंबहुना, प्रेम म्हणजे तरी काय ? स्त्री आणि पुरुष याच्यामध्ये वैषयिक अभिलाषेचा प्रादुर्भाव होऊन त्यातून ज्या भावना निर्माण होतात त्यानाच प्रेम असे नाव आहे. कदाचित् असेंहि होण्याचा संभव आहे की सहवासजन्य जिव्हाळा आणि आपुलकी या भावना प्रथम निर्माण होऊन नंतर वैषयिक भावना उद्भूत होतील. पण वैषयिक भावनाच्या छटेपासून सर्वस्वीं अलिप्त असें प्रेम स्त्रीपुरुषात असू शकत नाही, आणि असूंहि नये. वैषयिक भावनानी अगदी अलिप्त अशा प्रेमाचा वर्षाव वाटल्यास निर्गुण, निरंजन अशा परमेश्वरावर करावा, किंवा वाटल्यास निसर्गातील अनेक मनोहर दृश्यावर करावा, भावनानी उचंबळून येणाऱ्या, संवेदनानी थरारणाऱ्या व धडधडत्या उत्कंठेने हेलावणाऱ्या मानवी जगातील प्रेयसीवर असलें ‘ अमानुष ’ प्रेम कोणीहि करू नये. तें स्वर्गातील अदृश्य देवतासाठी वाटल्यास राखून ठेवावें ! अर्थात् केवळ वैषयिक अभिलाषा, उन्मत्त शारीरिक वासना, म्हणजेच प्रेम असा माझ्या वरील विवेचनाचा अर्थ आहे असा गैरसमज कोणीहि जाणता मनुष्य करणार नाही असे वाटतें. प्रेमात अनेक छटा असतात आणि वैषयिक अभिलाषा ही त्यापैकी एक छटा आहे व ती इतर स्पृहणीय छटाशीं संलग्न असल्यास मुळीच त्याज्य नाहीं, इतकेंच नव्हे तर हृद्य आहे असा माझ्या विवेचनाचा आशय आहे. उदात्त प्रेमाचें, त्यागाच्या भावनानी ओतप्रोत भरलेल्या प्रेमाचें, प्रेयसीच्या सुखाला व

हिताला जपणाऱ्या प्रेमाचें अस्तित्व अमान्य करण्याचें मुळीच कारण नाही— या साऱ्या छटा प्रेमांत अनेक वेळां आविष्कृत झालेल्या असतात. पण या छटा जितक्या खऱ्या व स्पृहणीय तितकीच शारीरिक अभिलाषेची छटाहि खरी व स्पृहणीय असते हें कदापि विसरतां यावयाचे नाही. शारीरिक अभिलाषा अत्यत उत्कट असून सुद्धा वर उल्लेखिलेल्या साऱ्या स्पृहणीय छटा प्रेमांत आविष्कृत झालेल्या दिसण्याची पूर्ण शक्यता आहे. तात्पर्य, निरभिलाष तन्मयतेचें व निष्काम प्रेमाचें ध्येयवादाने पूर्ण असलेले स्तवन करणाऱ्या गडकऱ्यांनी काही ठिकाणीं उत्कट शृंगारिक कल्पना प्रकट केल्या असल्या, अथवा काही ठिकाणीं भावनोत्कटतेने भरलेल्या प्रिय व्यक्तींच्या शारीरिक मीलनातील तादात्म्याचा अनावर उन्माद वर्णिला असला तर त्यात आक्षेपार्ह काहीच नसून गडकरी हे रसरसलेल्या भावनानी युक्त असलेले सहृदय कवि होते इतकेच फार तर त्यावरून सिद्ध होईल !

आता एक गोष्ट खरी की, स्त्रीपुरुषाच्या प्रत्यक्ष शारीरिक मीलनातील आत्यतिक उन्मादाच्या उत्कटतेची ज्याला साक्षात् प्रतीति नाही अशा अननुभवी कवीला या उन्मादाचें वर्णन करण्याचा प्रसंग आला असतां एक तर तो अजाणतेपणामुळे भलत्याच गोष्टींचें काल्पनिक वर्णन करील, किंवा त्याच्या वर्णनात अवास्तव अतिरंजितपणा तरी येईल. खरे म्हणजे या गोष्टी कविकल्पनेने जाणावयाच्या नसून त्याची प्रत्यक्ष प्रतीति घ्यावयाची असते. कालिंदीच्या मागे उल्लेखिलेल्या भाषणातील प्रणयाच्या धुदीचें वर्णन, किंवा भूपालाच्या व संभाजीच्या भाषणातील उन्मादक कल्पनाचित्राना आधारभूत असलेली मीलनाच्या उत्कटतेची प्रतीति याचा उद्‌भव प्रत्यक्ष गडकऱ्याच्या प्रतीतींतून कितपत झालेला होता हें यथार्थपणे सांगणें फार कठिण आहे. कदाचित् गडकऱ्यांचीं हीं सारीं कल्पनाचित्रेंहि असतील; आणि असे असलें तर तीं कल्पनाचित्रें सत्यसृष्टींत उतरविण्याच्या असमर्थतेमुळे त्याच्या चित्ताला होणाऱ्या वेदनाहि अत्यंत दारुण असतील ! हें लक्षांत घेतलें म्हणजे जीवितास— या कवितेंतील मागे उल्लेखिलेल्या त्या ओळींतील मर्म जाणून घेणें सुलभ होईल.

सौंदर्याच्या दर्शनमात्रें जागृत होत्या जीवांत ।
विकल चेतना नाचे नुसती स्वस्थानीं व्हाया श्रांत ॥
जनसंमर्दी अलभ्य शोभा पाहुनि, ठसवुनि मनिं घेणें ।
एकांतीं तच्चिंतन करणें दु:खावेगीं विसरणें ॥

आणि सौंदर्याच्या दुष्प्राप्यतेमुळे खिन्न झालेल्या मडकऱ्यांनी ' आणि जीविता लाभ हाच का—? ' असा प्रश्न विचारला तर त्यांत अस्वाभाविक असें काय आहे ? आणि कीट्सनेहि एकदा हीच भावना प्रकट केली नाही काय ?

Though beautiful, cold—strange—as in a dream...
All is cold beauty: pain is never done.

---

# १३. फुलें वेचिलीं पण—

Nothing in the world is single ·
All things by a law divine
In one another's being mingle,
Why not I with thine ?

— *Shelley*

ज्या सौंदर्याची आसक्ति मनांत निर्माण झाली तें सौंदर्य पूर्णपणे दुष्प्राप्य आहे याची जाणीव झाल्यावर विकलता निर्माण होऊन निराशेच्या यातना अनुभवीत मनांतल्या मनांत पिचत राहणें नशिबीं आलें तरी प्रेमाच्या भावनेचा उन्माद आपला प्रभाव गाजविल्याशिवाय कसा राहणार ! ही भावना जागृत होणारच ! मानवी जीवनाला साफल्य प्राप्त करून देणारी ती भावना आहे. वसंत ऋतूंत झाडावर पालवी जितक्या सहजपणें येते तितक्या सहजपणें मानवी मनांत प्रीतीची भावना निर्माण होत असते. निर्माण झाल्यानंतर तिला साफल्याची समृद्धि लाभेल किंवा लाभणारहि नाही. पण ती मुळी जागृतच झाली नाही असें सहसा होत नाही. या भावनेच्या अभावीं मानवी जीवित परिपूर्ण होणे अशक्य आहे. अमर्याद इच्छा करणाऱ्या गडकऱ्यांच्या मनावर या भावनेचें मोठें वर्चस्व असलें आणि त्यांनी त्याचा महिमा अनेकवार गाइला असला तर तें स्वाभाविक असेंच झालें.

हृदयशारदेस या कवितेंत मानवी जीवितांत प्रीतीचें जें अनन्यसामान्य महत्त्व असतें त्याचेंच स्तवन आहे. काव्याची मोहिनी अलौकिक असेल, त्याची जादू भुरळ पाडण्यासारखी असेल; पण प्रेयसीचा एक प्यारा

बोलहि लाख कवनांच्या जादूला फोल ठरवील. रसिकांच्या मनाचें रंजन करण्याचें सामर्थ्य कलेमध्ये भरपूर असलें तरी प्रेयसीच्या प्रेमाने येणाऱ्या धुंदीची सर कलेला कधीच येणार नाही.

तुझ्या मनाचा, तुझ्या जिवाचा एक एक बोल,
मम कवितेच्या जादूलागीं ठरवीलच फोल !
नवशब्दांचे घुंगुर बाधुनि रसवती माझी,
नाचत डोलत करि शिणलेलीं मनें पुन्हा ताजीं.
तिच्या गुणावर कुणाकुणाचे जीव गुंग कांहीं,
तरि जादूने जादूगारच काय फसुनि जाई ?

मानवी मनांत उचंबळून येणाऱ्या भावनांची अभिव्यक्ति कवि मोठ्या आकर्षकपणें करीत असेल; पण नेहमीच त्या भावनाची प्रतीति त्याला स्वतःला असते काय ? जर तशी प्रतीति त्याला नसेल तर त्याचीं कवनें कितीहि मोहक असलीं तरी प्रेमभावनेच्या प्रत्यक्ष प्रतीतीची एखादी लहर-सुद्धा कवीच्या कलेपेक्षा अधिक श्रेष्ठ मानली पाहिजे. आणि यामुळे ' नव-शब्दांचे घुंगुर ' बाधून नृत्य करणाऱ्या कविताकामिनीच्या कलेपेक्षा प्रत्य-क्षांतील कामिनीचा एखादा कटाक्ष, एखादा गोड बोल किती तरी पटींनी अधिक मधुर असतो. *The Last Ride Together* या कवितेंत रॉबर्ट ब्राउनिंगने हीच कल्पना गडकऱ्याच्यापेक्षा अधिक आकर्षकपणें व्यक्त केली आहे.

What does it all mean, poet ? Well,
Your brains beat into rhythm, you tell
What we felt only; you expressed
You hold things beautiful the best,
And pace them in rhyme so, side by side.
'Tis something, nay 'tis much: but then,
Have you yourself what's best for men ?

मानवी जीवनांतील सर्वांत स्पृहणीय अनुभवाची प्रतीति जर कवीला नसेल तर ज्याला तशी प्रतीति प्रत्यक्ष आलेली आहे त्याचें जीवन किती तरी अधिक समृद्ध मानावें लागेल—मग त्याने आयुष्यांत कवितेची एकहि

ओळ खरडली नसली तरी चालेल. कवीला जो प्रश्न ब्राउनिंगने विचारला आहे तोच प्रश्न त्याने शिल्पकाराला विचारला आहे. शिल्पकाराने व्हीनस-च्या पुतळ्यांत आपलें सारें कौशल्य आविष्कृत केलें असेल, त्याचें सौंदर्यहि अलौकिक असेल, पण मानवी जीवनातील लावण्यलतिकेच्या पदन्यासांत त्या शिल्पकृतीपेक्षा किती तरी अधिक मोहक सौंदर्य सामावलेलें असतें. प्रणयिनीच्या तरळत्या हालचालींत जो मोहकपणा असतो त्यापुढे कलाकृतीं-तील मोहकपणाची मातब्बरी काय?

> And you, great sculptor—so, you gave
> A score of years to Art, her slave,
> And that's your Venus, whence we turn
> To yonder girl that fords the burn!

याचा अर्थ अगदी स्पष्ट आहे. कलावंताच्या कलेंत आविष्कृत झालेल्या रमणीयतेपेक्षा प्रत्यक्ष जीवनातील अनुभवाची प्रतीति अधिक रमणीय असते. कारण तिची जाणीव होत असते, आणि त्या जाणिवेंतून उद्भूत होणाऱ्या संवेदना अत्यंत हृद्य असतात असें ब्राउनिंगला सुचवावयाचें आहे; किंवा निराळ्या भाषेंत बोलावयाचें झालें तरी कलेच्या कमनीयतेपेक्षा कामिनीची कमनीयता अधिक प्रभावी असते. आणि याच अर्थानें गडकरी म्हणतात—

> तुझ्या मनाचा, तुझ्या जिवाचा, एक एक बोल,
> मम कवितेच्या जादूलागीं ठरवीलच फोल !

याहिपेक्षा पुढील ओळ अधिक स्पष्ट आहे.

> हृदयभावना मूर्तिमती तूं ! कविता तव छाया !

प्रेयसीच्या प्रेमाची प्राप्ति होण्याची आशा निर्माण झाली असतां किंवा तिची प्रत्यक्ष प्राप्ति झाली असतां कवितेचें महत्त्व काय उरणार ?

> सुकला चुकला जीव आजवर तुजवांचुनि फिरतां,
> हृदयशारदे ! शब्द–शारदा नको मला आतां !

खचूं पाहणाऱ्या जीवाचा तोल संभाळणें हें काम कदाचित् कविता करूं शकेल; पण अगतिक झालेल्या, उत्कंठेने असहाय झालेल्या, आत्यंतिक

उद्विग्नता प्राप्त झालेल्या जीवाला वाचविण्याचें काम प्रणयिनीशिवाय दुसरें कोण करणार? प्रीतीच्या भावनेची ओझरती, तरळती, लकेर मनात जों-पर्यंत चमकून गेली नाही तोंपर्यंतच जीव अननुभवीपणामुळे सुखी राहील. पण एकदा ती भावना चित्तांत हेलावूं लागली म्हणजे होणारी कालवा-कालव अलौकिक असते. प्रेयसींत आपल्या साऱ्या भावना केंद्रित करून तिच्याशीं तन्मयता पावणें हेंच एक जीवनसर्वस्व बनतें. ही एकाग्रता मनाला बेभान करणारी व स्वत्वाचा पूर्ण विसर पाडणारी असते. वेडा या कवितेंत गडकरी म्हणतात—

> . . . एकाग्रता ती खरी.
> आशा, प्रीति, तसेंच वेड असलें, यानाच ती साधते!

ही एकाग्रता इतकी विलक्षण व अतर्क्य असते की, प्रेयसीशीं संबद्ध असलेली प्रत्येक गोष्ट–तिची आठवण जिच्यायोगे होईल अशी प्रत्येक गोष्ट–आकर्षक वाटूं लागते; इतकेंच नव्हे तर तिच्या ठायीं चित्ताची अगदी परिपूर्ण एकतानता होते.

> तव वसतीच्या दिशेवरी जी तारा लखलखते,
> नेत्रयुग्म हें तीवर खिळतें, नच कधिंही हलतें!
> तव हास्याचा नाद नाचला ज्या वाऱ्यावरती,
> जीव कोंडला वाचविण्याचें बळ त्याच्या हातीं.

अशा या प्रेयसीच्या पावलाची चाहूल तरी लागेल या आशेने वेडा-वून गेलेलें कविमन आपण भक्त व ती देवता अशीहि कल्पना करीत आहे. ही देवताच आपल्या भक्ताला तारावयास किंवा मारावयास समर्थ आहे; सारें कांही तिच्याच हातीं आहे. तिने आपल्याकडे कृपादृष्टीने पाहावें, आपल्याविषयीं जिव्हाळा व्यक्त करावा, आपुलकी दाखवावी, अशी लालसा कवीला असहाय बनवीत आहे. आणि तिच्याशीं झालेल्या तन्मय-तेंत, मीलनांत, आपल्या साऱ्या चित्तवृत्तींचा लय व्हावा व जीव ठायींच्या ठायीं विरून जावा हें कवीचें सर्वांत स्पृहणीय ईप्सित आहे.

> प्रितीनें रंगलीं पावलें हृत्पटिं नाचीव,
> प्रेमामृत पाजुनी, देवते! भक्ता, वाचीव!

प्रेमदृष्टिनें, प्रिये! मिळवितां डोळ्याला डोळा,
पंचप्राणहि होतिल माझे नयनीं क्षणिं गोळा.
हृदयीं जडवीं; चरणीं तुडवीं, मग त्या ओढुनियां,
सोक्षमोक्ष करिं, तार मार वा, प्रेमाची दुनिया !

थोडक्यांत, प्रेमसाफल्याच्या अनिवार अभिलाषेने कवि अत्यंत असहाय, दीन होऊन गेला आहे. प्रियेशीं पूर्ण तादात्म्य, अगदी आत्यंतिक तादात्म्य, पावण्याची त्याची इच्छा सहनशक्तीच्या मर्यादेपलीकडे गेलेली आहे. प्रियेशीं असलें आत्यंतिक तादात्म्य पावण्याची, तिच्या हृदयांत आपलें हृदय विलीन करण्याची, ही आसक्ति ' रिनेसन्स ' च्या कालखंडांत युरोपमध्ये प्रसृत झालेल्या प्लेटॉनिझम्‌मध्ये पराकोटीला गेलेली दिसून येते.

But here's the joy ; my friend and I are one.

• हें शेक्स्पियरच्या बेचाळिसाव्या सुनीतातील वचन याच आशयाचें द्योतक आहे. या तादात्म्याची परिसीमा म्हणजे प्रेयसीच्या सहवासात लाभणाऱ्या उन्मादक धुंदींत जीव विरून जावा अशी तळमळ. मागच्या प्रकरणांत भूपालाचें जें भाषण उद्धृत केलें आहे (पृ.२०७) त्यातहि हीच तळमळ व्यक्त झालेली आढळून येईल. प्रस्तुत कवितेंत गडकरी म्हणतात—

हृदयशारदे! दर्शन परि दे, हृदयीं दे स्थान,
वक्षःस्थलिं तव पडता पडता येऊं दे मरण !

प्रेयसीच्या वक्षःस्थळावर डोकें ठेवल्यावर सुखाच्या परमोच्च प्रकर्षाच्या त्या दिव्य क्षणीं मरण आलें, प्रियेशीं झालेल्या आत्यंतिक तादात्म्याच्या त्या अवस्थेंत कायमचें विलीन होऊन जाता आलें तर त्यापेक्षा अधिक भाग्य तें कोणतें ? डॉ. हर्षे यांना वरील ओळींत, विशेषतः दुसऱ्या ओळींत, वैषयिक प्रेमाच्या छटेचा साक्षात्कार होईल अशी भीति वाटते. गडकऱ्यांच्या या ओळी वाचल्यानंतर 'Bright Star ! would I were ...' या ओळीने सुरू होणाऱ्या कीट्सच्या प्रसिद्ध सॉनेटची आठवण होणें अपरिहार्य आहे विशेषतः पुढील ओळी उल्लेखनीय आहेत.

No—yet still steadfast, still unchangeable,
Pillow'd upon my fair love's ripening breast,
To feel for ever its soft fall and swell,
Awake for ever in a sweet unrest,
Still, still to hear her tender-taken breath,
And so live ever—or else swoon to death.

अर्थात् गडकऱ्यांच्या ओळींत जा संयम दिसून येतो तो कीट्सच्या सॉनेटमध्ये दिसत नाही हें स्पष्ट आहे. प्रियेच्या वक्षःस्थळावर पडल्या पडल्या मरण आलें तर फार चांगलें इतकेंच म्हणून गडकरी थांबले आहेत; पण कीट्सने या कल्पनेचा विस्तार करून एक उन्मादक कल्पनाचित्र रंग-विलें आहे. या कल्पनाचित्रांत धुंद अभिलाषेचा शिडकावा सर्वत्र झालेला दिसेल.

प्रेयसीशीं आत्यंतिक तादात्म्य पावण्याची ही लालसा प्रेमाची प्रामा-णिकता या कवितेंतहि प्रकट झालेली आहे.

हृदयार्पण जरि करणें आहे स्पष्ट दान तरि करावया
अश्रुजलासह अर्पावें या पुण्यमार्गी एकच सखया ।
स्वप्रेमातें लपवायाचा बोध तुझा लाभो तुजला,
'गोविंदाग्रज' वाहिल प्रेमा हृदयासह निज अश्रुजला ।

या तादात्म्याच्या अभिलाषेंत प्रेयसीला सर्वस्वार्पण करण्याचीहि उत्कट इच्छा दिसून येत आहे. आत्मार्पणाची ही उत्कट इच्छा अधिक स्पष्टपणें अरुण या कवितेंत गडकऱ्यानी प्रकट केली आहे. वास्त-विक, अरुणोदयाच्या वेळीं आकाशांत दिसणाऱ्या रमणीय शोभेचें वर्णन करणें हा कवीचा मूळ हेतु आहे. पण त्या वर्णनाच्या निमित्ताने आपल्या मनांत रंगलेल्या प्रेमचित्राचेंहि वर्णन त्याने केलें आहे. या वर्णनांत प्रेयसीशीं तादात्म्य पावण्याची आतुर उत्कंठा व तिला सर्वस्वार्पण करण्याची लालसा या गोष्टी आविष्कृत झालेल्या आहेत.

या रंगानें रंगवितों मी माझ्या हृदयाला,
पड्यापड्यावरी काढिलें चित्राचित्राला !

एका पडद्यावरि परि रंगे प्रेमचित्र एक
हृदयाच्या हृदयातिल माझ्या तोच शिलालेख !
त्या चित्राचा, त्या पडद्याचा, मम गाना धीर !
त्या चित्रांतिल देवीचा मी विकला शाहीर !
मरता मी, तो जपाच माझ्या हृदयाचा पडदा !
त्या देवीचा झालो अगणित जन्माचा बंदा !

'विकला शाहीर', 'अगणित जन्मांचा बंदा' हे या ओळींतील शब्द, आणि

हृदयीं जडवीं; चरणीं तुडवीं, मग त्या ओढुनियां,
सोक्षमोक्ष करिं, तार मार वा......

या हृदयशारदेस या कवितेंतील ओळींमध्ये प्रकट झालेली भावना ही शुद्ध लाचारी—अगदी केविलवाणी लाचारी—आहे असे कांही व्यवहारी लोकांना वाटण्याचा पूर्ण संभव आहे हे कबूल केलें पाहिजे. पण आत्यंतिक भावनोत्कटता हा ज्याचा उपजत मनोधर्म असतो अशा लोकांना त्या भावनाच्या आविष्करणांतील अतिरेकहि नेहमीच स्पृहणीय वाटत असतो; मर्यादेत, तोलून मापून, व्यवहारी ठाकाठिकीने बोलणें हें त्यांच्या बाबतींत सर्वथा अशक्य असतें. कोणत्याही भावनेच्या छटेची अगदी कड पोचवावयाची हें तर त्यांचें वैशिष्ट्यच बनतें. आणि यामुळेच आपण प्रियेचे बंदे गुलाम आहों, तिच्याशीं झालेल्या मीलनाच्या क्षणींच मृत्यूचें आगमन झालें तर त्यासारखी 'भाग्याची उजरी' दुसरी नाही इत्यादि कल्पना प्रादुर्भूत होत असतात. याचा अर्थ असा की, आत्यंतिक तादात्म्याच्या अवस्थेंत जी उन्मनी स्थिति येते, जी धुंदी निर्माण होते, तिच्यामुळे स्वत्वाची, व्यक्तित्वाची, सारी जाणीव विरून जाते; आणि असें झाल्यावर आपल्याकडे कमीपणा घेण्याची प्रवृत्ति सहजच निर्माण होते. प्रत्यक्षांत हें जसें होतें तसेंच या तादात्म्याचीं जीं कल्पनाचित्रें कवि रंगवीत असतो त्यांतहि होत असतें. आणि काव्य म्हणजे तरी काय? वस्तुस्थितींत गोष्टी जशा घडत असतात तशाच कल्पनाचित्रांच्या द्वारें रंगविणें, इतकेंच नव्हे तर गोष्टी जशा घडाव्यात असें मनाला वाटत असतें, तशाहि त्या रंगविणें

हेंच कवि करीत असतो. विशिष्ट परिस्थितींत, भावनांच्या आंदोलनांमुळे ज्या गोष्टी प्रेयसीजवळ स्पष्टपणें बोलाव्यात असें आपणांला पुन्हा पुन्हा वाटत असते, पण ज्या बोलण्याचा धीर अनेक कारणांनी आपल्याला होत नाही, आणि silence is eloquence असें शेलीने वर्णिल्याप्रमाणें बोलण्यासाठी आसावलेले ओठ काहीही न बोलतां नुसतेच थरथरत राहतात—त्या साऱ्या गोष्टी आपल्याच परिस्थितींत असलेल्या नाटकांतील व्यक्ति अगदी मोकळपणाने बोलून दाखवितात; आणि त्यांनी आपल्याच भावना बोलून दाखविल्या म्हणजे आपलीं मने मोहरून जात असतात. त्याचप्रमाणें ज्यांना आपण शब्दस्वरूप प्राप्त करून देऊ शकत नाही अशा आपल्या मूक, अबोल भावना कवीच्या काव्यात मुखर, बोलक्या, होत असतात. गडकऱ्यानी व्यक्त केलेली भावना शेलीनेहि आपल्या एपिसाय्किडियॉन या प्रसिद्ध कवितेच्या शेवटीं प्रकट केली आहे.

Weak Verses, go, kneel at your Sovereign's feet
And say "We are the masters of thy slave......"

या उत्कट प्रेमभावनेचा गौरव गडकऱ्यांनी ठिकठिकाणीं केलेला आहे. **प्रेमपाठ** या कवितेंत वर्णिलेला प्रेमाचा हा प्रभाव पाहा.

प्रेम नस तर जीव नको हा ! प्रेमें जग चाले !
प्रेमावाचुनि धिग् जीवन ह असे आज झालें !

*　　　*　　　*

परवा न तया; हसा, रुसा, वा निंदा, कीं वंदा,
मी प्रेमाचा बंदा ! ......

या प्रेमामुळे मनाची पुढीलप्रमाणें बेभान अवस्था होते—

देहभरी त्या निर्झरलहरी थरथरुनी भिनल्या,
वृत्तिवृत्ति त्या गायननादें प्रेममयी बनल्या !
भाव बहिरला, जीव बहिरला, बाहिरलाच आत्मा ......

याच प्रकारचा गौरव अतिरंजित भाषेंत **प्रेमाखातर** या कवितेंत आविष्कृत झाला आहे.

प्रेमापुढतीं साग कुणाचा टिकतो अभिमान ?

* * *

प्रेमें बोले, प्रेमें डोले, प्रेमें जग हाले,
प्रेमाखातर जगीं आजवर काय नाहिं झालें ?

ज्या प्रेमामुळे मानवी जीवन समृद्ध होतें, सफल होतें, त्या प्रेमाची प्राप्ति झाली नाही तर जीवन ओसाड वाटेल व आत्यंतिक औदासीन्याची अवकळा त्याच्यावर पसरेल हें उघड आहे. गडकऱ्यानी अनेक ठिकाणीं प्रेमाचा प्रभाव जसा वर्णिला आहे तसाच निष्प्रेम जीवनाचा तीव्र शब्दात धिक्कार-हि केला आहे. **फुलें वेचिलीं पण** — ही कविता म्हणजे निष्प्रेम मनाचें केविलवाणें गाणें होय. मृदु भावनाच्या आविष्काराच्या दृष्टीने ही कविता सुंदर वठली आहे. १९१४ मध्ये केव्हा तरी ही कविता गडकऱ्यांनी लिहिली आहे. पन्हाळगडावर हिंडत असता अनेक मोहक रानफुले कवीने गोळा केलीं. त्याच्या मुसमुसणाऱ्या सौंदर्याने आणि सुगधाने कवीचे हृदय हर्षोत्कट झालें. पण इतक्या सुंदर फुलाचे काय करावयाचें ? तीं कोणाला अर्पण करावयाचीं ? जिला अर्पण करावी अशी प्रेयसी कोठे आहे ? इत्यादि असंख्य प्रश्नांनी कवीचें चित्त अक्षरशः विदीर्ण झालें आहे.

फुले वेंचिलीं; पण—आता हीं द्यावीं कोणालागीं ?
राक्षसवृत्ति स्मरणदेवता क्षणात झाली जागी.
हतभागी हा जीव एकला; प्रीतिदेवता नाहीं,
मोडुनि पडलें हृन्मयमंदिर शतधा आघाताहीं !
निष्प्रेमाचें जीवन माझे रूक्ष चिंतनीं जावें,
सकल्पचि हा वरला ठरला, कां ते दैवा ठावें !

फुलें सांपडलीं; तीं मोहक आहेत, आकर्षक आहेत हेंहि खरें. पण फुलांची मालकीण कुठे दडून बसली असावी ? आणि या दुःखद विचाराने

वृत्ति बावरी झालि, आतल्या आत बिचारी रडली,
जीवाचीं नयनातुनि पुष्पें त्या पुष्पांवरि पडलीं !

*The Question* या नांवाची शेलीची एक सुंदर, भावनोत्कट कविता आहे. एका रमणीय जागीं विहार करीत असतां, अनेक मोहक

फुलें इकडे तिकडे झुलत होतीं, त्यांचा एक गुच्छ तयार केला असें स्वप्न कवीने पाहिलें—पण हा गुच्छ द्यावयाचा कुणाला ?

Methought that of these visionary flowers
I made a nosegay, bound in such a way
That the same hues, which in their natural bowers
Were mingled or opposed, the like array
Kept these imprisoned children of the Hours
Within my hand,—and then, elate and gay,
I hastened to the spot whence I had come,
That I might there present it !—Oh ! to whom ?

आणि शेलीने विचारलेला प्रश्न गडकरीहि विचारीत आहेत—

फुलें वेंचिलीं, पण—आता ही द्यावीं कोणालागीं ?

अवेळीं ओरडणाऱ्या कोकिळेस या कवितेंतहि निष्प्रेम जीवनाच्या व्यथांचा आणि त्यांतून उद्भवणाऱ्या औदासीन्याचा गडकऱ्यांनी आविष्कार केला आहे.

निष्प्रेमाची शेज सोबती
भयाण दुनिया सारी भवतीं
विषण्ण येती विचार चित्तीं,
बाह्यातर विश्वात खेळते उदासीनता एक !

हालत्या पिंपळपानास या कवितेंत निष्प्रेम जीवनांत प्रेमाची अमृतवृष्टि केव्हा होणार अशी उत्कंठा प्रकट झालेली आहे.

नवबालाहृदयीं प्रीत नवी हलतांना
तच्छिरीं हलसि तू तसाच, पिंपळपाना !
जीं हृदयकपनें सारीं मानसीं,
तीं आम्हांतें बाहेरी दाविशी !
निर्दोष मनानें भारी हालसी,
कुणि बाला जरि मज देइल असला मान,
तरि सुखेंच होइन मीही पिंपळपान !

या ओळींत व्यक्त झालेली उत्कंठा आणि हळहळ या गोष्टींमुळे ' वयं तत्त्वान्वेषान्मधुकर हतास्त्वं खलु कृती ' या शाकुन्तलांतील प्रसिद्ध ओळीची आठवण झाल्याविना राहणार नाही.

निष्प्रेम जीवन कंठण्याचें नशिबीं आल्यामुळें पिचणाऱ्या भावना-वश मनाची सारी तळमळ ती कोण ?, वेडा, व ओसाड आडांतील एकच फूल या तीन कवितामध्ये उत्कृष्टपणें आविष्कृत झालेली आहे. या तीनहि कवितांचें विस्तृत विवेचन मागे केलें असल्यामुळें येथें त्यांचा केवळ उल्लेख केला तरी पुरे. ती कोण ? या कवितेंतील कांही ओळी पुन्हा उद्धृत करीत आहें. या ओळींत प्रेमाच्या प्राप्तीसाठी सदैव तळमळणाऱ्या परंतु प्रेमसाफल्य न झाल्यामुळे हताश झालेल्या हळुवार मनाचें आर्त आक्रंदन प्रत्ययास येईल. हें आक्रंदन काळजाला घरें पाडणारेंच आहे.

> कार्कों या मम लक्ष्यशून्य हृदयीं कांही न आशा स्फुरे !
> ओठाशीं भिडते रहस्य मनिंचे—सांगूं कुणाला परी ?
> अश्रू हे नयनींहि—माळ करुनी घालूं कुणाच्या गळा ?
> आलें हें भरुनी रितें हृदयही—देऊं कुणाच्या करीं ?
> आला दाटुनि कंठ—हाय ? रडुनी कोठें करूं मोकळा ?

प्रतिशब्द कोठून तरी मिळेल या वेड्या आशेवर जगणाऱ्या प्रेमभावनेचा असाच आविष्कार वेडा या कवितेंतील पुढील ओळींत झाला आहे.

> जोडीचा महिमा असा चहुकडे, धिक् सर्व जोडीविणें!

Nothing in the world is single या शैलीच्या उद्गारांतहि हाच आशय व्यक्त झाला आहे.

तथापि निष्प्रेम जीवनाचा धिक्कार करण्याच्या ज्या लालसेने गडकऱ्यांच्या चित्तांत सदैव काहूर माजविलें आहे तिच्या उत्कट तीव्रतेचा खरा आविष्कार प्रेम आणि मरण या कवितेंतील पुढील ओळींत जसा प्रकट झाला आहे तसा अन्यत्र क्वचितच झाला असेल.

निष्प्रेम चिरंजीवन तें।
जगिं दगडालाही मिळते ॥ धिक् तया ॥
क्षण एक पुरे प्रेमाचा।
वर्षाव पडो मरणाचा

निष्प्रेम जीवनातील उदास एकलकोंडेपणाच्या दारुण व्यथा व प्रेमसाफल्याच्या एका क्षणासाठी आसावलेलें अमर्याद इच्छा करणारे मन यांवरच या कवितेंतील सारे रूपक आधारलेले आहे. या रूपकाचे पुढे आपल्याला सूक्ष्म परिशीलन करावयाचेच आहे. गडकऱ्याचे मन प्रेमसाफल्याच्या मनोहर कल्पनेंत नेहमीच कसे धुद होऊन राहिले होतें, व निष्प्रेम जीवनाशीं सबद्ध असलेल्या व्यथाचा त्याच्या चित्ताला कसा धसका बसलेला होता हे विस्ताराने पाहिल्यावर आता आपल्याला गडकऱ्याच्या भावजीवनाच्या अगदी आतल्या दालनात प्रवेश करावयाचा आहे.

# १४. प्रेम आणि मरण

"I could be martyred for my Religion—Love is my religion—I could die for that My creed is Love and you are its only tenet You have ravish'd me away by a Power I cannot resist, "
—*Keats*

"There is an ecstacy too great for man, and it crushes him who achieves it !"
—*Monna Vanna*

दिव्य प्रेम, निरभिलाष तन्मयता, निष्काम प्रेम इत्यादि कल्पनांच्या विरळ स्वप्नसृष्टीत एका काळी वावरणाऱ्या गडकऱ्यांच्या चित्तावर मानवी जीवनांतील सत्यसृष्टींत विहरणाऱ्या प्रेयसीच्या प्रेमाच्या उन्मादक कल्पनेचा केवढा प्रभाव होता, त्या प्रेमाची प्राप्ति व्हावी म्हणून अमर्याद इच्छांचें व अभिलाषांचें काहूर त्याच्या हृदयांत कसे थैमान घालीत होते, प्रेमसाफल्याच्या अभावानें ते कसे व्यथित झाले होते, आणि सौंदर्याच्या दर्शनाने पाहणाऱ्याच्या वृत्ति उदात्तच झाल्या पाहिजेत असा आग्रह धरीत असतांच त्याच्या अंतर्मनांत त्या सौंदर्याची अभिलाषा कशी निर्माण होत होती, व तें सौंदर्य दुष्प्राप्य आहे याची तीव्र जाणीव होताक्षणीच विकलतेच्या भावनेने ते कसे उदासीन होत असत — या साऱ्या आंदोलनांची कहाणी आतांपर्यंत विस्ताराने सांगितली. गडकऱ्यांची प्रणयविषयक कल्पना एकजिनसी, एकरूप, व साधी नसून ती पराकाष्ठेच्या संमिश्र स्वरूपाची होती, तिच्यात अनेक छटा होत्या—परस्परविरोधीहि छटा होत्या. या परस्परविरोधी छटांमुळे आपण

गांगरून जाण्याचें कांहीच कारण नाही. या छटा का व कशा निर्माण झाल्या याच्या कारणाची मीमांसा करणें आपल्याला शक्य झाले तर गड-कऱ्याच्या भावजीवनाचे मर्म आपणांस समजेल. हें मर्म यथायोग्य समजावून घ्यावयाचें असेल तर खुद्द गडकऱ्यांचीच मदत आपल्याला वेळोवेळीं घ्यावी लागेल. मानवी मन ही एक मोठी विचित्र व गुतागुतीची गोष्ट आहे. भोवतालीं जी अनेकविध परिस्थिति असते तिचे संस्कार त्या त्या वेळीं मनावर होत असतात, त्या वेळीं एका विशिष्ट अनुभवाची प्रतीति येत असते. परंतु हे संस्कार सर्वच काळीं शाश्वत व स्थिर राहू शकतील असे मानण्याचे मुळीच कारण नाही. ज्या परिस्थितींत, व ज्या मानसिक अवस्थेंत ते सस्कार झालेले असतील ती परिस्थिति बदलल्यावर, मनाची ती पूर्वीची अवस्था पालटल्यावर ते पहिलेच सस्कार स्थिर कसे राहणार ? ते बदलत्या परिस्थितीच्या अनुरोधाने बदलणारच. ते अपरिहार्य आहे. ही गोष्ट लक्षात घेतली म्हणजे एकाच वस्तूविषयीं निरनिराळ्या काळीं मनुष्याच्या मनात निरनिराळ्या—किंबहुना परस्परविरोधीहि –भावना कशा निर्माण होऊं शकतात या आपाततः अतर्क्य वाटणाऱ्या गूढाचे निरसन होईल. प्रेमभावनेच्या बाबतींतहि हे सारे विवेचन अगदी यथार्थ आहे. निरभिलाष, दिव्य व उदात्त प्रेमाचा पुरस्कार करणाऱ्या व्यक्तीच्या मनात उद्दाम शारीरिक अभिलाषा निर्माण होऊच शकणार नाही असे कसें सागता येईल ? परिस्थिति या गोष्टीला पूर्वी अनुकूल नसली, आणि आता ती अनुकूल झाली असली तर तिचे स्वाभाविक परिणाम मनावर होणारच; आणि प्रीतीचे साफल्य व्हावें यासाठी अनिवार धडपड करणाऱ्या मनाला अंतीं निराश होण्याचा तापदायक प्रसंग आला तर अनेक समिश्र स्वरूपाच्या भावना निर्माण होणें ही गोष्टहि अत्यत नैसर्गिक अशीच आहे. प्रणय-नैराश्याच्या पोटीं ज्या भावना निर्माण होतात त्या सुद्धा एकरूप असू शकत नाहीत. निरनिराळ्या व्यक्तींत प्रणयनैराश्यामुळे निरनिराळ्या भावना निर्माण झाल्या तर त्यात काहीच आश्चर्य नाही, पण एकाच व्यक्तीच्या मनातहि परस्परविरोधी भावनाचे काहूर अनावर होत असतें हा सार्वत्रिक अनुभव आहे. कटु निराशा भोगणें नाशिबीं आलें असता प्रेयसीविषयीं

नेहमीच द्वेष निर्माण होईल असे मुळीच नाही उलट एखाद्या वेळीं तिच्याविषयींच्या मृदु भावना अबाधित राहतील व तिच्या हिताविषयींची अभिलाषा बळावेल सुद्धा. पण निराशेची कटुता अत्यत तीव्र असेल तर द्वेषाची छटा मनात तरळून जाणारच नाही असेंहि सागता येणार नाही. ही छटा पुसट होऊन, किंवा थोड्याच वेळाने अजिबात नाहीशी होऊन पुन्हा मृदु भावनाची झुळूक गाजलेल्या मनावरून वाहूं लागेल हेंहि अगदी शक्य आहे. तात्पर्य, मानवी मन हे अशा प्रकारे सर्वस्वीं विलक्षण असल्यामुळे एकाच गोष्टीविषयीं एकाच व्यक्तीच्या मनात परस्परविरोधी भावनाचा कोलाहल कसा निर्माण होतो असली शंका न घेता त्या व्यक्तीच्या मनाचा शोध लावला तरच परस्परविरुद्ध भासणाऱ्या भावनामध्ये सगति निर्माण करता येईल. यासाठी गडकऱ्याच्या अनेक कवितामध्ये व्यक्त झालेल्या भावनाचा सूक्ष्म अभ्यास करून त्याच्या आधाराने गडकऱ्याच्या मन:स्थितीचें चित्र रेखाटणे हाच एक मार्ग उरतो.

> "To understand or glimpse their meaning we must speculate on Keats himself. *He* is the key to his own meaning. There is no other [१]

हे कीट्सच्या बाबतींत मिड्ल्टन् मरी याने काढलेले उद्गार सर्वच भावनावश, आत्मनिष्ठ, कवींच्या बाबतींत सर्वस्वीं सार्थ आहेत. शेक्स्पियरच्या बाबतींतहि जॉर्ज ब्रॅडीसने याच पद्धतीचा अवलंब केलेला आहे. स्त्रीचें प्रेम या एकाच गोष्टीविषयीं निरनिराळ्या कालखंडांत लिहिलेल्या नाटकात शेक्स्पियरच्या भावनाच्या इतक्या परस्परविरोधी छटा दिसून येतात की, त्यामुळे त्याच्या मनाचा अभ्यास करणारा गागरूनच जावा. पण निरनिराळ्या काळीं त्याने आविष्कृत केलेल्या भावना परस्परविरोधी दिसल्या तरी त्या खऱ्या आहेत, आणि त्याच्या वैयक्तिक जीवनांतील प्रतीतींतूनच त्या स्फुरलेल्या आहेत हें लक्षात घेतलें म्हणजे जूलियट् व ऑफीलिया याचीं चित्रे रेखाटणाऱ्या कवीनेच क्लिओपाट्रा व क्रेसिडा याचीं चित्रें रेखाटलीं आहेत, व त्यानतर पुन्हा मिरांडाचें भावमधुर चित्र रंगविलें आहे यांतील मर्म लक्षात येईल

गडकऱ्यानी निरनिराळ्या काळात लिहिलेल्या अनेक प्रेमगीतामधून त्याच्या वैयक्तिक भावनाचा प्रामाणिक आविष्कार झाला आहे असें मानावें काय? म्हणजेच, या गीतात त्याच्या स्वतःच्या प्रेमाची कहाणी शोधून काढण्याचा प्रयत्न करावा काय? हा प्रश्न तापदायकें असला तरी त्याचे उत्तर दिल्यावाचून सुटका नाही. भावगीतात—आणि विशेषतः प्रणयभावनेचा आविष्कार करणाऱ्या भावगीतात—कवि आत्माविष्कार करीत असतो. भावगीत हा प्रकार सपूर्णपणें आत्मनिष्ठ आहे. नाटकामध्ये अनेक कलात्मक बधनाच्या दडपणामुळे कवीला वैयक्तिक भावनांचा आविष्कार काही विशिष्ट मर्यादेतच करता येतो. तथापि नाटकातहि अनेक युक्त्याचा कौशल्याने अवलब करून कवि आपल्या भावना निरनिराळ्या पात्राच्या तोडून कधी स्पष्टपणं, तर कधी व्यजनेचा आधार घेऊन, बोलून दाखवीत असतो हे विसरून चालावयाचें नाही. या दृष्टीने पाहता कोणताहि वाङ्मयप्रकार--अगदी भारदस्त, विचारगर्भ निबध सुद्धा—पूर्ण वस्तुनिष्ठ असू शकणार नाही. नाटकात व कादबरींत लेखकाच्या व्यक्तित्वातील काही महत्त्वाचीं वैशिष्ट्ये, त्याच्या काही प्रभावी भावना प्रकट होतच असतात. काही वेळा लेखक मुद्दाम या गोष्टी करीत असतो हें खरें आहे. तथापि अनेक वेळा त्याच्या वैयक्तिक भावनाचा आविष्कार त्याला अगदी नकळत होत असतो, त्याच्या अंतर्मनांत चाललेलीं भावनाचीं आदोलने अजाणतेपणीं त्याच्या लेखनात प्रकट होत असतात, व तें लेखन म्हणजे त्याच्या भावजीवनाची एक प्रकारें कहाणीच बनन असतें. वस्तुनिष्ठ वास्तववादाचा (objective realism) आवेशाने पुरस्कार करणारा प्रसिद्ध फ्रेंच कादंबरीकार गुस्ताव्ह फ्लॉबर मदाम बोव्हारी या आपल्या कादबरीविषयीं 'Madame Bovary c'est moi' (मदाम बोव्हारी म्हणजे दुसरे तिसरे कोणी नसून स्वतः मीच आहे!) असें म्हणाल्याचे ऐकिवात आहे. सागून सवरून वस्तुनिष्ठेचा विलक्षण बडिवार माजविणाऱ्या लेखकाची ही अवस्था! मग आपल्या साऱ्या हळुवार भावनांचा आविष्कार करण्याविषयीं अत्यत उत्सुक असलेल्या कवींची गोष्ट बोलावयासच नको. भावगीतात किंवा प्रेमगीतांत कवींची आत्मनिष्ठा कळसास

पोचलेली असते. कवींची सारीं वैयक्तिक दुःखें, त्याचे मनोविकार, त्याचीं वैगुण्यें, त्याचें दौर्बल्य—किंबहुना त्याची मानसिक विकृतिसुद्धा—या सर्व गोष्टींचा भावगीतात उत्कृष्ट आविष्कार होत असतो. पहिल्या प्रतीचीं, भावनेने ओथंबलेलीं भावगीते म्हणजे कवीच्या हृदयाचे उत्कृष्ट प्रतिबिंबच होय. भावनाची आर्तता ज्याच्यामध्ये अत्यंत उत्कटतेने प्रकट झालेली दिसते अशी भावगीते म्हणजे कवींच्या हृदयाचे आक्रंदनच होय ट्रायंफ ऑफ् टाइम हे स्विन्बर्नचे प्रेमगीत इंग्रजी भाषेत भावनाच्या उत्कट व आर्त आविष्काराबद्दल गाजलेलें आहे.

I shall never be friend again with roses

ही स्विन्बर्नच्या या गीतातील ओळ त्याच्या वैयक्तिक अनुभूतींतूनच निर्माण झालेली आहे असे अनेक टीकाकाराचे म्हणणे आहे. स्विन्बर्नची दारुण प्रेमनिराशा ज्या तरुणीने केली होती तिने पहिल्या भेटीच्या प्रसंगीं त्याला गुलाबाचीं सुंदर फुले नजर केलीं होतीं, व त्याला तिने एक गाणेहि म्हणून दाखविलें होते. प्रणयभंगाचा फणकारा असह्य झाल्यामुळे त्याचा गुलाबावर इतका विलक्षण राग झाला आणि गोड गाण्याचाहि त्याला विलक्षण तिरस्कार वाटू लागला.

I shall hate sweet music my whole life long

या ओळीत मधुर संगीताविषयीं प्रकट झालेल्या तिरस्काराचे मूळ स्विन्बर्नच्या वैयक्तिक अनुभूतींत आहे असें म्हणतात. शार्लट् ब्रॉंटे या प्रसिद्ध कादंबरीलेखिकेच्या बाबतींत असेच झालें आहे. जेन आयर म्हणजे स्वतः शार्लट् ब्रॉंटेच होय, इतकेच नव्हे तर तिच्या प्रत्येक कादंबरींतील नायिका म्हणजे स्वतः तीच होय, प्रोफेसर या नावाची तिची जी कादंबरी आहे तिच्यातील प्रोफेसर म्हणजे लेखिकेचाच पुरुषवेषातील अवतार होय असें आल्बर्ट मॉर्डेलचें म्हणणे आहे. शार्लट् ब्रॉंटेने हें आत्माविष्करण जाणूनबुजून केलें असेल असें निश्चयाने कसे म्हणावें ? तिला अगदी न कळतांहि तिच्या व्यक्तित्वांतील अनेक महत्त्वाचीं वैशिष्ट्ये तिच्या नायिकाच्या व्यक्तिरेखामध्ये आविष्कृत झालीं असण्याची शक्यता आहे

असा याचा अर्थ आहे. लॉर्ड डेव्हिड सेसिल याने involuntary self-revelation असें या प्रकाराचें वर्णन केले आहे. शार्लट् ब्रॉंटेच्या कांदबऱ्यात प्रकट झालेल्या तिच्या व्यक्तित्वाविषयीं सेसिल म्हणतो—

> "All subjective novelists write about themselves. Nor was Charlotte Bronte an exception. Fundamentally her principal characters are all the same person and that is Charlotte Bronte."[२]

शार्लट् ब्रॉंटेच्या बाबतींत जे घडले आहे तेच चार्ल्स डिकन्सच्या बाबतीतहि घडले आहे असें आल्बर्ट मॉर्डेलने पुरावा देऊन दाखवून दिलें आहे.

तात्पर्य, कादंबऱ्याच्या द्वारें लेखकाच्या व्यक्तित्वाचा इतका मनमोकळा आविष्कार झालेला ज्याअर्थी दिसून येतो, त्याअर्थी केवळ आत्माविष्कार हेंच ज्याचे एकमेव प्रयोजन असते अशा भावगीतात कवीच्या भावनाचा यथातथ्य आविष्कार झालेला दिसला तर त्यात काहीच आश्चर्य नाही. आणि भावनोत्कटता हेंच ज्याच्या जीवनाचे सारसर्वस्व असते असा गडकऱ्यासारखा कवि आपल्या साऱ्या हळुवार भावनाचा अगदी निःसंकोचपणें कवनातून आविष्कार करीत असतो. असा आविष्कार झाला म्हणजेच मनातील विचित्र काहूर बरेंचसें कमी होते व भावनोद्रेक सुसह्य होतो.

> एक मनाच्या मरजीसाठीं प्रीतीचा इतिहास,
> लिहुन ठेवला...

असें गडकरी कथाशेष या खंडकाव्यात (हें काव्य गडकऱ्याच्या मृत्यूनंतर १९४४ साली समीक्षकच्या गडकरी विशेषाकात प्रसिद्ध झालें आहे.) म्हणत असले तरी कविता हे मनःक्षोभ हलका करण्याचें एकमेव प्रभावी साधन आहे हें त्याना चागलें माहीत आहे निर्दय देवीस या कवितेंतून पुढील ओळी घेतल्या आहेत.

> त्या लाटातुनि भीषणतेच्या निघती या ताना!
> झंझावातावरती त्याचा नाद असा नाचे,
> सुरामागुनी सूर उसळती माझ्या कवनाचे!

औदासीन्याच्या व्यथा असह्य झाल्या म्हणजे कवितेचें साहाय्य घेणें हा एकच उपाय कवींपुढे असतो हा विचार गडकऱ्यानी अनेक ठिकाणीं प्रकट केला आहे. भयाण एकान्त या कवितेत ते म्हणतात—

अशा भावना जीवाभवती घालितात वेढा,
कोण त्यातुनी काढिल होता ज्याचा तो वेडा?
आधीं आशा तुटता सुटले बंधन जगण्याचे
उदास हृदया वेड लागले चढत्या कवितेचे!

यासारखीच कल्पना एका बालकवीस—या कवितेतहि आली आहे.

हृदयीं जो भरला त्रास तो कविताचरणीं प्रास !

भावनोद्रेक अनावर झाल्यावर त्याला वाट करून द्यावीच लागते.

पूरोत्पीडे तडागस्य परीवाहः प्रतिक्रिया ।
शोकक्षोभे च हृदयं प्रलापैरवधार्यते ।।

या भवभूतीच्या श्लोकात[३] भावनाविष्काराची ही आवश्यकता यथार्थपणें प्रकट झाली आहे. हीच कल्पना गडकऱ्यानी हृदयशारदेस या कवितेंत किंचित् वेगळ्या प्रकाराने माडली आहे.

प्रेमाच्या जिवलगे ! जिव्हाळा करिता रसभरती
भिन्नरंगिं हृत्तरंग रंगति उचंबळुनि निघती !
शब्दचित्र परि काढूं जाता त्याचे उल्हासे,
रंग तयाचे उडुनी जाती नि श्वासासरसे ;
जनिं जे दिसते, मनिं जें वसते, हृदयीं जें सलतें,
ते बोलावें तंव हे वठते भलत्याचे सलते !

आपल्या मनात भावनाचा इतका अनावर क्षोभ झाला आहे व त्याचा आविष्कार करण्यासाठी कविता हेच एक साधन आहे; परंतु मनांतील साऱ्या भावना यथातथ्य रीतीने कवनात आविष्कृत होत नाहीत अशी या ओळींत कवि तक्रार करीत आहे. आपल्या मनातील उत्कट भावना कोणाला तरी कळाव्यात, त्याने त्या सहानुभूतीने समजावून घ्याव्यात, अशी तळमळ केव्हा तरी प्रत्येकाला लागत असते. मनांतर्ले

रहस्य ओठापर्यंत आलें आहे, पण जिला सांगावें अशी व्यक्तीच समोर नाही अशी जी तक्रार ती कोण ? या कवितेत गडकऱ्यांनी केली आहे तिच्यांत हीच भावनाविष्काराची तीव्र तळमळ दिसून येते. मनातले गुपित ज्याला सांगता येईल असें माणूस आसमतात नसलें, आणि भावनाचा आविष्कार झाला नाही तर हृदय फुटेल अशी अवस्था निर्माण झाली, म्हणजे कवनाच्या द्वारें तें आविष्करण होऊं लागते. गीत–विरक्ति या कवितेंत गडकऱ्याच्या व्यथित मनातील आविष्कृत होण्याची उत्कंठेने वाट पाहणाऱ्या मृदु भावनाची सारी आर्तता प्रकट झाली आहे. जिला आपल्या भावना कळू शकतील अशी व्यक्ति नसल्यामुळे उत्पन्न होणाऱ्या नैराश्याचा क्षोभ काव्यांत आविष्कृत करणें याशिवाय दुसरा काय इलाज आहे ?

> गीत कळावे जीस नसे ती
> दिशा शोधिल्या जारे दाही;
> 'गोविंदाग्रज' सहजचि कवने
> जाळि निराशा खर दाही !

वरील अवतरणाचा आशय स्पष्ट आहे. आपल्या मनातील खळबळणाऱ्या भावनाना बोलक्या करून त्यायोगे चित्ताची व्यथा सुसह्य करण्याचें साधन म्हणजे काव्य, ही कल्पना अनेक रोमॅंटिक कवींच्या मनात नेहमी प्रबळ असते; आणि भावनोत्कटतेचा प्रकर्ष हेच ज्याच्या भावजीवनाचें सर्वस्व असतें अशा कवीच्या मनातील विविध तरग त्याच्या कवनांतून हेलावत असतात. कल्पनेच्या काव्यानदावर तरगत राहणें व आशेच्या कुंचलीने हृत्पटलावर मनोरम कल्पनादृश्यें चितारणें हा गडकऱ्यांच्या मनोवृत्तीचा स्थायी भाव असल्यामुळे त्यांचीं भावगीतें—विशेषतः प्रेमभावनाचे उत्कट आविष्करण करणारीं भावगीते—म्हणजे त्याच्या मनातील साऱ्या स्फुट व अस्फुट भावनांचे उत्कृष्ट प्रतिबिंब उमटविणारा आरसाच असें म्हटले तर त्यात काहीहि चूक होणार नाही. सर्वच आत्मनिष्ठ कवि आपल्या कवनातून आत्माविष्कार करण्यासाठी उत्सुक असतात हे खरें असलें तरी, भावनांच्या तरंगांवर अगदी स्वैरपणें वाहत जाण्यामध्ये जी

बेभान करणारी धुंदी असते तिची प्रतीति मिळविण्यासाठी तीव्र धडपड करणे हा ज्यांचा स्वभावधर्म बनलेला असतो अशा गडकऱ्यासारख्या कवींच्या बाबतींत ते अधिकच खरे असते. आणि यामुळेच गडकऱ्याचीं प्रेमगीते म्हणजे त्याच्या वैयक्तिक भावजीवनाची अगदी प्रामाणिकपणें व उत्कटपणें सांगितलेली कहाणी होय असे मी म्हणत आहे. निराळ्या भाषेत सांगावयाचे झालें तर, प्रणयाच्या क्षेत्रात निरनिराळ्या काळीं गडकऱ्याना जे अनुभव आले, अथवा ज्या भावना त्याच्या ठायीं प्रबळ झाल्या, त्या अनुभवाचा व त्या भावनाचा इतिहास त्याच्या प्रेमगीतात आढळेल. या इतिहासातील घटना परस्पराशी पूर्णपणे सबद्ध आहेत, व त्याच्यात एक विशिष्ट सूत्र अनुस्यूत आहे हें लक्षात ठेवले म्हणजे या प्रेमगीताच्या आधाराने गडकऱ्याच्या मानसिक अवस्थातराचे व आदोलनाचे नेमके स्वरूप आपल्या ध्यानात येऊ शकेल.

अनेक इंग्रजी कवींच्या जीवनांतील कित्येक महत्त्वाच्या घटनाची आज आपल्याला सागोपाग माहिती मिळवता येण्याची शक्यता आहे. कित्येक कवींचा निरनिराळ्या काळातील खाजगी पत्रव्यवहार आता प्रसिद्ध झालेला आहे. या पत्रव्यवहारामध्ये, किंवा त्या कवीच्या रोजनिश्यामध्ये अथवा त्याच्याविषयीं समकालीन मित्रानी लिहून ठेवलेल्या वृत्तातामध्ये, त्या कवींच्या भावजीवनाचीं जीं महत्त्वाचीं वैशिष्ट्ये प्रकट झालेलीं दिसून येतात त्याच्या आधाराने त्याच्या अनेक गीतातील मर्माचे किंवा रहस्याचे आकलन सहज करून घेता येते. या माहितीच्या अभावींहि काव्याचे रसग्रहण उत्कृष्टपणें करता येणे शक्य आहे. तथापि काव्यात प्रकट झालेल्या कवीच्या व्यक्तित्वातील अनेक गोष्टींची सगति त्याच्या जीवनांतील घटनांच्या आधारे लावून दाखविता आली तर ते रसग्रहण अधिक रुचिर होणार नाही काय? आता एक गोष्ट खरी की, कवीच्या जीवनातील अगदी खाजगी गोष्टी जगापुढे येणें, त्याच्या जीवनावर काळाने टाकलेला जाड पडदा दूर होऊन त्याच्याआड दडलेल्या अनेक स्पृहणीय किंवा अस्पृहणीय गोष्टी सर्वांच्या नजरेस पडणें हें बरे नव्हे असे अनेकाना वाटणें स्वाभाविक आहे. कवीचें काव्य वाटेल तेवढ्या सूक्ष्मपणाने व चिकित्सक-

पणाने तपासून पाहावयास हरकत नाही, परतु ते समजावून घेण्यासाठी त्याच्या जीवनातील चिरविस्मृत गोष्टी उकरून काढण्याचीच आवश्यकता नाही असा त्याचा आशय असतो. कीट्सने आपली प्रेयसी फॅनी ब्रॉन् हिला वेळोवेळीं लिहिलेलीं अत्यत भावनोत्कट व हळवी पत्रे विचारात घेऊन मिड्ल्टन मरी या टीकाकाराने फॅनी ब्रॉन् हिनेच प्रणयभंगाची दारुण व्यथा देऊन कीट्सचा अकाली घात केला असे निश्चयपूर्वक मत १९२५ सालीं माडले होतें. सदर फॅनी ब्रॉन् हिने कीट्सची बहीण फॅनी कीट्स हिला जीं पत्रे लिहिलीं होतीं तीं १९३६ सालीं प्रसिद्ध झालीं, आणि दुसरी बाजू जगापुढे आली. कीट्सचीं पत्रें किंवा फॅनी ब्रॉन्चीं पत्रे जेव्हा प्रसिद्ध झालीं तेव्हा या व्यक्तींच्या अगदी खाजगी गोष्टी उघडकीला आल्या याचें अनेकांना वैषम्य वाटले होतें हे खरे आहे. तथापि, फॅनी ब्रॉन्च्या पत्रांमुळे मिड्ल्टन मरीला तिच्याविषयींचे आपले पूर्वीचें मत पूर्ण बदलावें लागलें हें त्याच्या नुकत्याच प्रसिद्ध झालेल्या *The Mystery of Keats* या पुस्तकावरून स्पष्ट होईल.

कीट्स,शेली, बायरन् इत्यादि प्रसिद्ध इग्रजी कवींच्या जीवनातील अनेक महत्त्वाच्या गोष्टींची जशी अधिकृत माहिती उपलब्ध आहे तशी अधिकृत माहिती आपल्याकडील अगदी अलीकडे होऊन गेलेल्या कवींविषयींहि उपलब्ध नाही. बालकवींच्या काव्याची चर्चा करीत असता ही उणीव मला भारी जाणवली; आणि आता गडकऱ्याच्या कवनाचें विश्लेषण करीत असता तीच गोष्ट तितक्याच तीव्रतेने मला जाणवत आहे. गडकऱ्याच्या विविध मनोव्यापारातील मर्म ज्याच्यायोगे उलगडू शकेल अशा सत्यसृष्टींतील महत्त्वाच्या घटनाची अधिकृत व यथातथ्य माहिती उपलब्धच नाही. जी माहिती त्याच्या चरित्राविषयीं उपलब्ध आहे ती अगदी वरवरची व पाल्हाळिक भाकडकथाच्या स्वरूपाचीच आहे. यामुळे प्रेमगीतात आविष्कृत झालेल्या विविध भावनांच्या उद्रेकाला प्रत्यक्ष गडकऱ्याच्या वैयक्तिक जीवनात कोणता आधार आहे हे निश्चयाने सागणें अत्यत दुर्घट होऊन बसलें आहे. पण या अडचणीमुळे स्वस्थ बसणें युक्त होणार नाही. गडकऱ्याच्या भावजीवनांतील प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टींची साधार नोंद आपल्याजवळ नसली तरी त्यांचें

काव्य हें एक फार मोठें साधन आपल्याजवळ आहे. आपल्या साऱ्या भावना अगदी निःसकोचपणें त्यानी आपल्या गीतात आविष्कृत केलेल्या आहेत. या भावनांच्या आविष्काराच्या आधाराने त्याच्या अतरंगाचें स्वरूप स्पष्ट करून सांगण्याचे काम टीकाकाराला करता येईल. आणि याच मार्गाचा अवलब करावा असें मीं ठरविले आहे. सुमारे सहा वर्षाच्या काळात गडकऱ्यांनी जीं प्रेमगीते लिहिलीं त्याची कालक्रमानुसार तपासणी करून त्यांत व्यक्त झालेल्या भावनांच्या अवस्थातराच्या साहाय्याने त्यांच्या भावजीवनाची शक्य तितकी सुसूत्र कहाणी सागण्याचा मी प्रयत्न करून पाहणार आहे. पुढे मागे गडकऱ्याच्या वैयक्तिक जीवनातील महत्त्वाच्या घटनांची अधिकृत माहिती उपलब्ध झाली तर तिच्या आधाराने या कहाणींतील महत्त्वाचे दुवे पारखून घेता येतील. मी जी कहाणी सागणार आहें ती सर्वस्वीं गडकऱ्याच्या काव्यांत प्रकट झालेल्या भावनांच्या आधारानेच सागणार असून तिच्यातील काही गोष्टी केवळ अनुमानाच्या किंवा तर्काच्या स्वरूपाच्याच राहतील हें अगदी उघड आहे. हा अनुमानाचा पाया बळकट असावा यासाठी मात्र मी भरपूर कोशीस करीन. गडकऱ्यानी इतकीं प्रेमगीते लिहिलीं आहेत व त्याच्यामधील भावनांचा आविष्कार इतका उत्कट आहे की, त्याच्या आधाराने गडकऱ्यांचे अंतरग शोधून काढणे वास्तविक फारसे कठिण नाही. शेक्स्पियरच्या नाटकांत त्याचें स्वतःचें व्यक्तित्व प्रकट झालेले नाही आणि त्याच्या चरित्रातील फारच थोड्या गोष्टी आज माहीत असल्यामुळे त्याच्या व्यक्तित्वाचें मर्म समजावून घेणें फार कठिण आहे या प्रतिपादनाला जॉर्ज ब्रँडीसने पुढीलप्रमाणे समर्पक उत्तर दिलें आहे.

> "It is the author's opinion that, given the possession of forty-five important works by any man, it is entirely our own fault if we know nothing whatever about him. The poet has incorporated his whole individuality in these writings, and there, if we can read aright, we shall find him."[१]

* * *

गडकऱ्यांच्या प्रेमभावनेचा अगदी पहिला ज्ञात आविष्कार अल्लड प्रेमास या कवितेत झालेला आहे. श्री. खाडेकरांनी दिलेल्या माहितीवरून ही कविता १९०९ साली गडकऱ्यानी लिहिलेली असावी. सारे जग फसवें असल्यामुळे प्रेमभावनेचा स्वैर आविष्कार करणे बरें नव्हे असा त्यानी आपल्या मनाला इषारा दिलेला आहे. प्रेमाला अपेक्षित प्रतिशब्द मिळाला नाही, आणि त्याची अस्थानी वृष्टि झाली तर त्या अवहेलनेची व्यथा असह्य होईल. त्यापेक्षा हृदयाविष्करण न झालेलेच बरे असे गडकऱ्याना सुचवावयाचे आहे.

कोणी तुजला मानिल खोटे,
तिरस्कारही दिमेल कोठे,
अपमानाचेंही भय मोठें,
बाग जगाची, ह्या न फुलाची, काटे जागोजाग !
टाकिल कुणि तुज धिक्काराने,
रडविल किंवा उपहासाने,
फसविल नकली को मालाने,
कोणी भटकत, उगाच रखडत, फिरविल मागोमाग !

हृदयाविष्करण करून, प्रेमभावना व्यक्त करून, शेवटीं अवहेलनेच्या यातना भोगण्यापेक्षा ती भावना मनातल्या मनात दडपून ठेवणेंच फार चागले असें वाटल्यामुळे कवि आपल्या प्रेमाला पुढीलप्रमाणे इषारा देत आहे.

म्हणुनि लाडक्या ' कुठे न जाई,
या हृदयातचि लपुनी राही ,
योग्य मित्र नच सुख तरि नाहीं !
कुसगतीहुनि, वेड्या ! मानी, फार बरा एकात !

गडकऱ्याच्या प्रणयभावनेच्या आविष्काराची ही नादी आहे असें मानावयास हरकत नाही. नाट्यवस्तूचा विकास कसकसा होत जाणार आहे, व नाटकाचा अत कोणत्या प्रकारे होणार आहे याच्या कांही स्पष्ट किंवा अस्पष्ट सूचना नादीमध्ये व प्रस्तावनेमध्ये मिळाव्या अशी संस्कृत नाट्यशास्त्राची अपेक्षा आहे. गडकऱ्याच्या प्रणयजीवनाच्या नाटकाच्या या नादींत शेवटच्या भरतवाक्याचीं, त्याच्या जीवनसंगीताच्या भैरवीचीं, बीजें सामावलेलीं आहेत असें मला वाटतें.

टाकिल कुणि तुज धिक्कारानें,
रडविल किंवा उपहासानें,
फसविल नकली कीं मालानें,
कोणी भटकत, उगाच रखडत, फिरविल मागोमाग !

या ओळी लिहीत असता, त्यात सामावलेल्या धिक्कार, उपहास, दिखाऊपणा व वंचना या गोष्टींच्या अनुभवाची प्रतीति आपल्याला प्रत्यक्षात येणार आहे या गोष्टीची १९०९ सालीं वयाच्या चोविसाव्या वर्षी गडकऱ्याना कल्पनाहि नसेल ! बरोबर सात वर्षांनी प्रणयभंगाच्या दारुण वेदना व्यक्त करणाऱ्या ज्या कविता गडकऱ्यानी लिहिल्या त्यामध्ये प्रेमाचा फसवेपणा, सौंदर्याचा बेगडीपणा व स्वार्थीपणा याच गोष्टींचा उल्लेख करणें गडकऱ्याच्या नशिबीं आलें आहे.

पण आपल्या प्रेमभावनेचा अव्हेर होईल व अती निराशा पदरात पडेल अशी भीति असल्यामुळे ती भावना व्यक्त न करता आंतल्या आत दडपून टाकावी अशी मनाची समजूत घालण्याचा कितीहि प्रयत्न केला तरी जिची समजूत पटेल अशी मन ही चीज आहे काय ? मनाचा स्वैरपणा अमर्याद आहे ! प्रतिकूल अनुभवाची भीति भेडसावीत असताहि ईप्सिताच्या मागे वेड्याप्रमाणे धावत सुटणे हाच त्याचा स्वभाव ! त्याची समजूत कोण घालणार आणि कशी घालणार ?

Love is too young to know what conscience is

असें शेक्सपियरने म्हटलेंच आहे ना !

१९११ च्या अखेरीस गडकऱ्यानी प्रेमसंन्यास नाटक पूर्ण केलें आणि लीलेची व्यक्तिरेखा निर्माण करून सत्यसृष्टींत अतृप्त राहिलेल्या आपल्या प्रणयभावनाची पूर्तता करून घेण्याचा त्यानी प्रयत्न केला. मागे स्पष्ट केल्याप्रमाणे जयंत व लीला याच्यामधील प्रेम बहुशीं निष्काम आहे असें भासविण्याची गडकऱ्यानी शिकस्त केली आहे. अर्थात् निष्काम प्रेमाचा हा प्रयोग व्यवहारांत सफळ होण्याची शक्यता नसल्यामुळे आपल्या साऱ्या अभिलाषेने ओतप्रोत भरलेल्या प्रेमभावना जयंत अगदी मनमोकळेपणाने बोलून दाखवीत आहे.

सुशीला, लीला व जयंत यांच्या सहवासाचें जें वर्णन या नाटकांत गडकऱ्यांनी केलें आहे त्याला सत्यसृष्टींत थोडाफार आधार असण्याचा संभव आहे. सत्यसृष्टींतील कमकुवत आधाराच्या जोरावर लीला व जयंत यांच्या अत्यंत रमणीय, काव्यात्म प्रेमाचीं चित्रें रगवून गडकऱ्यांनी आपल्या अमर्याद इच्छा करणाऱ्या मनाला कांहीसा विरगुळा मिळवून दिला असण्याचीहि शक्यता आहे. प्रेमसंन्यासांतील लीला ही जिची काव्यसृष्टींतील प्रतिकृति होती अशा एखाद्या तरुणीच्या सानिध्याचा लाभ या काळात गडकऱ्याना झाला असल्यास त्याचे कल्पनेच्या काव्यानंदावर सतत तरगणारें मन तिच्याकडे आकृष्ट होऊन तिच्या भोवती घोटाळत राहिलेंहि असेल. ही तरुणी कोणीहि असो, तिची प्राप्ति होण्याचा योग गडकऱ्याच्या नशिबांत मुळीच नव्हता. त्या तरुणीला गडकऱ्याच्या भावनाची जाणीव अगदी नसावी याचाच सभव जास्त आहे. परिचय बराचसा वाढून नंतर त्या परिचयातून प्रेमाचा उद्भव व्हावा व अखेर निराशाच पदरीं पडावी ही घटना असह्य असल्यामुळे परिचय फारसा न वाढू देणें हेच बरें अशा आशयाचे उद्‌गार जयंत काढतो. 'क्षणपरिचय हा अशा स्थितीहुनि फारच बरवा खरा' ही पांखरास— या कवितेतील ओळहि याच आशयाची द्योतक आहे. सहवासाच्या योगाने गडकऱ्याच्या चित्तात प्रेमभावनेचा प्रादुर्भाव झाला असला तरी त्याना प्रतिशब्द मिळाला असे वाटत नाही. ऑगस्ट १९१२ मध्ये प्रसिद्ध झालेली वेडा ही कविता याला साक्ष आहे. दुष्प्राप्य तारकेच्या मागे रानोमाळ भटकून जीव हैराण झाला तरी त्याचा उपयोग काय? कवितेंतील वेडा आकाशातील तारकेची प्राप्ति करून घेण्यासाठी धडपडत आहे; आणि गडकरीहि दुष्प्राप्य प्रेमाची प्राप्ति करून घेण्यासाठी असेच धडपडत आहेत त्याच्या ठायीं त्यांची एकाग्रता झाली आहे. म्हणूनच

> त्याचे वेड तरी कुणास मिळता द्या तें मला आणुनि
> माझ्या जी मनिं चादणी चमकते, जाईन तीमागुनी!

असे उद्‌गार गडकरी काढीत आहेत. दुष्प्राप्य तारकेची प्राप्ति करून घेण्यासाठी तळमळणारा वेडा म्हणजे दुष्प्राप्य सौंदर्याची व प्रेमाची प्राप्ति करून घेण्यासाठी तळमळणारे स्वत: गडकरीच होत ही गोष्ट मागे विस्ता-

राने स्पष्ट केली आहे. आपलें प्रेम दुष्प्राप्य आहे या कटु सत्याची जाणीव गडकऱ्याना नव्हती असे नाही. गडकऱ्याची बुद्धि, त्याची विवेकशक्ति, या गोष्टींची जाणीव त्याना सतत करून देत असली पाहिजे. परंतु आपल्या भावनेला आवर घालणें त्याच्या आटोक्याच्या बाहेर होते. विवेकशक्ति व भावना यामधील हा कलह या काळात गडकऱ्याच्या मनात कोणत्या प्रकारें चाललेला होता याचे प्रत्यतर सप्टेंबर १९१२ मध्ये प्रसिद्ध झालेल्या मुरली या कवितेला स्वतः गडकऱ्यानी जी प्रास्ताविक टीप जोडली आहे तिच्यात मिळेल. या कवितेत गडकऱ्याना प्रीति व भक्ति याचा संगम दाखवावयाचा आहे. किंबहुना प्रीतीच्या प्रकर्षातूनच भक्तीचा उदय होत असतो असेंहि गडकऱ्याना म्हणावयाचे आहे. टीपेंतील यापुढील वाक्यें सशयास्पद आहेत.

> "मनुष्याच्या आयुष्यात असा एक काळ एकदा तरी येतोच कीं, ज्या वेळीं ईश्वराचे अस्तित्व **भावपूर्ण हृदयाला पटते** आणि तेव्हा मात्र, **बुद्धिप्रधान मस्तकाचे समाधान** करण्यासाठीं तळमळणारा जीवात्मा ईश्वरी साक्षात्काराची–प्रत्युत्तराची–याचना करीत असतो. हे दैवी प्रत्युत्तर त्या योग्य वेळीं मिळाले नाहीं म्हणजे मात्र मनुष्य पुन्हा भोवऱ्यात गुरफटतो." ( जाड टाईप मुळातलाच आहे. )

या वाक्यात केवळ बुद्धि व भावना याच्यातील कलह गडकऱ्याना व्यक्त करावयाचा आहे असे मला वाटत नाही. साक्षात्काराला 'प्रत्युत्तर' हा जो प्रतिशब्द त्यानी वापरला आहे तोहि सूचक आहे. विशेषतः 'हें दैवी प्रत्युत्तर योग्य वेळीं मिळालें नाही म्हणजे मात्र मनुष्य पुन्हा भोवऱ्यात गुरफटतो' या वाक्यात फार महत्त्वाची व्यजना गुरफटलेली आहे असें मला वाटतें. मानवी जीवनात प्रेमसाफल्याचें महत्त्व असामान्य असून प्रिय व्यक्तीकडून त्या प्रेमाला प्रत्युत्तर वेळीच मिळालें नाही तर तें जीवन स्पृहणीय वाटणें शक्य नाहीं असेच गडकऱ्यांना सुचवावयाचे आहे. याविषयीं माझ्या मनात तरी कसलाच संदेह नाही. ही सारीच कविता रूपकात्मक आहे हें अगदी उघड आहे. राधिका म्हणजे भक्त आणि मुरली म्हणजे परमेश्वरी कृपेचें प्रत्युत्तर ही गोष्ट स्वतः गडकऱ्यानीच स्पष्ट केली आहे. या रूपकांत

आणखी एक व्यंजना सामावलेली आहे. राधिका म्हणजे प्रियकराची अथवा प्रेयसीची तन्मयता आणि मुरली हें त्या तन्मयतेला मिळालेलें प्रत्युत्तर. या व्यंजनेच्या आधारें गडकऱ्यांनी ज्यांच्यावर विशेष भर दिला आहे तीं कडवीं काळजीपूर्वक वाचलीं असता त्यात रसरसलेल्या, उत्कंठापूर्ण, प्रेम-भावनेच्या प्रकर्षाच्याच निरनिराळ्या अवस्था आढळतील. प्रेमभावनेंतील उत्कटता परिसीमेला गेली म्हणजे विवेकाला, बुद्धीला, तेथे मुळीच थारा नसतो; या तन्मयतेला तर्काच्या, तत्त्वज्ञानाच्या, विवेकाच्या, कसोटया लावण्यापासून कसलाहि फायदा नसतो. या ठिकाणीं भावनाच सर्वस्वीं प्रमाण होत असेंच भावपूर्ण हृदयाच्या प्रतीतीच्या उल्लेखाच्या द्वारें गडक-ऱ्याना सुचवावयाचें असलें पाहिजे.

Love is too young to know what conscience is.

हें वाक्य लिहिणाऱ्या शेक्सूपियरलाहि हेच सुचवावयाचे आहे. मीं दिलेल्या या स्पष्टीकरणाच्या आधाराने ही सर्वच कविता पुन्हा अत्यंत सूक्ष्मपणें वाचण्याची आवश्यकता आहे. अशा रीतीने तिचें वाचन केलें तर प्रेमातील उत्कटतेमुळे उत्पन्न होणारा बेभान अमर्यादपणा, प्रिय व्यक्तीचा एखादा शब्द तरी कानावर पडावा यासाठी धडपडणारी आर्त उत्कठा, प्रिय व्यक्तीशीं आत्यंतिक तादात्म्य पावण्याची — किंबहुना तिच्यात पूर्णपणें विरून जाण्याची—लालसा, हें तादात्म्य झाल्यानतर उत्पन्न होणारी उन्मनी अवस्था, आणि या अवस्थेशीं संबद्ध असलेला अतींद्रिय, दिव्य, ब्रह्मानंद —इत्यादि सर्व अवस्थाचा साक्षात्कार झाल्यावाचून राहणार नाही. परमेश्वराच्या भक्तीमध्ये अंतर्भूत झालेल्या अवस्था आणि सत्यसृष्टींतील उत्कट व रसरसलेल्या प्रणयभावनेंतील विविध अवस्था याच्यात प्रकारदृष्टया कांहीहि भेद नसतो असें तर गडकऱ्याना सुचवावयाचें नाही ना ?

भक्ति ही प्रीतीचीच पुढली पायरी असते, उत्कट प्रीतीच्या प्रकर्षाचेंच भक्तींत पर्यवसान होत असतें, आणि प्रीतीची किंवा भक्तीची शेवटची पायरी म्हणजेच आत्यंतिक तादात्म्य, स्वत्वाची पूर्ण विस्मृति, इत्यादि ज्या

कल्पना मुरली या कवितेंत गडकऱ्यांनी आविष्कृत केलेल्या आहेत त्या कल्पनांचें ' प्लेटॉनिक लव्ह ' च्या अनेक वैशिष्ट्याशीं अगदी जवळचें नातें आहे हें कोणाच्याहि तावडतोब लक्षांत येईल.

मुरली या कवितेनंतर फक्त एक महिन्याने आक्टोबर १९१२ मध्ये हृदयशारदेस ही कविता प्रसिद्ध झाली.

तू मनातला चडोल ॥ मग माझ्या मनिंचे बोल ॥
जरि हृदयीं लपले खोल ॥
तरि खोल हृदय या कालीं ...
बोल, बोल तव बिनमोल ॥ जीवाचें देइन मोल ॥
परि बोल एकदा बोल......

या मुरलींतील ओळींतील कल्पनेसारखीच कल्पना पुन्हा हृदयशारदेस या कवितेत थोड्या निराळ्या रीतीने प्रकट झाली आहे. या कवितें-तील हृदयशारदा म्हणजेच प्रेमदेवता, आणि शब्दशारदा म्हणजेच कविता. काव्याच्या जादूपेक्षा प्रेयसीचा एक शब्दहि कितीतरी अधिक मूल्यवान व आकर्षक असून प्रेमदेवतेच्या कृपाकटाक्षापुढे कवितेची कसलीहि मातब्बरी नाही असे गडकऱ्याना म्हणावयाचे आहे. याहि कवितेंत प्लेटॉनिक लव्हचीं अनेक वैशिष्ट्यें अगदी स्पष्टपणे प्रकट झालेलीं आहेत. प्रेयसीशीं आत्यंतिक तादात्म्य पावण्याची लालसा, तिच्या प्रेमात धुंद होण्याची उत्कट इच्छा, तिच्या प्रेमांतील दिव्य उदात्ततेचा साक्षात्कार, प्रेयसी ही देवता व आपण शरणागत भक्त, आणि तिच्या सानिध्यात कोणत्याहि अवस्थेंत राहण्याची तयारी, किंबहुना तिच्यात सर्वस्वीं विलीन होऊन जाण्याची—विरून जाण्याची तीव्र अभिलाषा, हीं सारीं वैशिष्ट्यें येथे दिसून येतील.

मरत्या जीवा परी वाचवी तुझा प्रणयगोल !
प्रीतीचीं पाउले उमटलीं जीं या हृदयान,
जीवस्वामिनि ! किती दिवस वद बसूं तींच गात ?
प्रणयतटिनि ! तूं दूर न राहीं—करपलाच जीव;
हृदयसाक्षिणी ! प्राणरक्षिणी ! न का येत कींव ?
तव वसतीच्या दिशेवरी जी तारा लखलखते,
नेत्रयुग्म हें तीवर खिळतें; नच कधींही हलतें !

तव हास्याचा नाद नाचला ज्या वाऱ्यावरती
जीव कोंडला वाचविण्याचे बळ त्याच्या हातीं.

* * *

ध्यास मांडिला तुझा असा हा असह्य विरहानें;
कधिं येशिल, कधिं घेशिल मजला हृदयीं प्रेमानें ?
प्रीतीने रंगलीं पावले हृत्पटि नाचीव,
प्रेमामृत पाजुनी, देवते ! भक्ता वाचीव !
प्रेमदृष्टिने, प्रिये ! मिळविता डोळ्याला डोळा,
पंचप्राणहि होतिल माझे नयनीं क्षणिं गोळा !
हृदयीं जडवी, चरणीं तुडवी, मग त्या ओढुनिया,
सौख्यमोक्ष करि, तार मार वा, प्रेमाची दुनिया !
हृदयशारदे ! दर्शन परि दे, हृदयीं दे स्थान,
वक्ष स्थलि तव पडता पडता येऊ दे मरण !
या प्रेमाचीं, तुझ्या यशाचीं गाणीं या नादीं
गाइन, जाइन गात नी तुजसह ईशपदीं !

प्रेयसी ही देवता आहे ही कल्पना **अरुण** या कवितेंतहि गडकऱ्यानी पुन्हा मांडली आहे. 'रंगवीत जा तशीं उद्याच्या देवींचीं चित्रें' असें म्हणून गडकऱ्यानी प्रेयसाशीं आत्यंतिक तादात्म्य व्हावें अशी तळमळ पुढीलप्रमाणें व्यक्त केली आहे.

त्या चित्रातिल देवीचा मी विकला शाहीर !
मरता मी तो जपाच माझ्या हृदयाचा पडदा !
त्या देवीचा झालों अगणित जन्माचा बंदा !

बालकवि ठोमरे यांची **अरुण** ही कविता १९११ च्या जुलैमध्ये प्रसिद्ध झाली. गडकऱ्यानी आपली **अरुण** ही कविता त्यानंतर केव्हा तरी, बहुधा **हृदयशारदेस** ही कविता लिहिली त्याच सुमारास, लिहिलेली असावी असे तिच्यातील प्लेटॉनिझम् वरून वाटते. मात्र ही कविता १९१४ सप्टेंबरच्या **मनोरंजनात** प्रसिद्ध झाली.

**प्रेमपाठ** ही कविता याच सुमारास लिहिलेली आहे. १९१२ च्या **मनोरंजनाच्या** खास दिवाळी अंकात ती प्रसिद्ध झाली आहे याहि कवितेंत अजून गडकरी प्लेटॉनिक लव्हच्या विरळ वातावरणातच हिंडत आहेत.

आज जगाचा लाज सोडुनी होऊं या वेडे !
प्रीतिपटाच्या खालीं दडवू जें जें मनिं तेढें !

* * *

हृदयस्था हृदयाशिं धरा कुणि, नका राहुं दूर !
जनिं कीं रानीं, जळीं स्थळी, वा गगनी पाताळीं !
जिवाजिवाला बाधा पसरनि प्रेमाचीं जाळी !

* * *

प्रेम नसे तर जीव नको हा ! प्रेमें जग चाले !
प्रेमावाचुनि धिक् जीवन हें असें आज झालें !

प्रीतीमुळे कवीच्या प्रतिभेला स्फुरण चढतें, आणि याच प्रीतीमुळे पशूचा मानव होतो, मानव देवपदाप्रत पोचतो व देवाचें देवत्व स्थिर होतें.

हृदयशारदे ! हृदयिं राहुनी करि मज प्रेमकवी !
तुझ्या प्रीतिची स्फूर्तिच मज हा प्रेमपाठ शिकवी !

प्रेमाच्या तन्मयतेमुळे धुंदी येते, व सर्व बंधनाची जाणीव विरून जाऊन एक प्रकारचा स्वैर अमर्यादपणा निर्माण होतो. प्रेमाने वेड्या झालेल्या मनाला बंधन तरी कसलें ? प्रीतिदेवतेमध्ये झालेल्या ऐकांतिक तन्मयतेचें, संपूर्ण लयाचें, आत्यंतिक तादात्म्याचें गडकऱ्यानी या कवितेंत पुन्हा एकदा वर्णन केलें आहे.

स्तुतिनिंदेचा भेदचि अवघा प्रेमजलीं जिरला,
भेदाभेदाचि, न परि जीवही प्रेमांतचि विरला !

* * *

दहभरी त्या निर्झरलहरी थरथरुनी भिनल्या,
वृत्तिवृत्ति त्या गायननादें प्रेममयी बनल्या !
भाव बहिरला, जीव बहिरला, बहिरलाच आत्मा......

१९१३ च्या सप्टेंबरमध्ये प्रसिद्ध झालेल्या **चिमुकलीच कविता** या कवितेंतहि सौंदर्यांतील पावित्र्याचें व उदात्ततेचें गडकऱ्यानी स्तवन केलें आहे.

तात्पर्य, प्लेटॉनिक लव्हच्या अनेक वैशिष्ट्यानी युक्त अशा कविता गड-कऱ्यानी १९१३ च्या अखेरपर्यंत लिहिल्या. परंतु प्लेटॉनिक लव्हचा

अत्यंत प्रभावी आविष्कार ज्या कवितेत गडकऱ्यानी केला आहे ती कविता म्हणजे **दिव्य प्रेमाची जाति**. या कवितेचा लेखनकाल मला उपलब्ध झाला नाही. तथापि १९१३ च्या अखेर किंवा १९१४ च्या सुरवातीस केंव्हा तरी त्यानी ही कविता लिहिलेली असावी. प्लेटॉनिक लव्ह या कल्पनेचा इतका उत्कृष्ट आविष्कार मराठी काव्याच्या क्षेत्रात अन्यत्र झाला असेल असें मला वाटत नाही. या कवितेचे संपूर्ण विवेचन मागे एका प्रकरणात पुष्कळच विस्ताराने केलेले आहे. यामुळे येथे तिचा केवळ उल्लेख करावयाचा आहे. दुष्प्राप्य गोष्टीवर जडणारी प्रीति, जन्मापासूनच कसलीहि प्रत्युत्तराची आशा न बाळगणारी प्रीति, निरभिलाष तन्मयता प्राप्त करून देणारी प्रीति, ही दिव्य प्रीति होय असे गडकऱ्याचें हें उदात्त, निष्काम, शुद्ध प्रेमाचें तत्त्वज्ञान आहे. **प्रेमसंन्यास** नाटक गडकऱ्यानी लिहिलें तेव्हापासून शुद्ध, निरभिलाष, निष्काम, निष्पाप प्रेमाच्या ज्या कल्पना त्याच्या मनात स्थिर झालेल्या होत्या त्या कल्पनाची ही परिसीमा होय असे म्हणावयास हरकत नाही. सत्यसृष्टींत आलेल्या विविध व विचित्र अनुभवामुळे या शुद्ध प्रेमाच्या कल्पनाना व्यवहारात वेळोवेळीं मुरड घालणें त्याना भाग पडलें असले तरी १९१६ मध्ये त्यानी **पुण्यप्रभाव** नाटक लिहिलें तोपर्यंत ही कल्पना त्याच्या मनात आंदोलत होती.

शुद्ध, निष्काम, निरभिलाष प्रेमाच्या कल्पनेचा वर उल्लेखिलेल्या कवितेंत जो आविष्कार झालेला आहे त्याबाबतींत एक महत्त्वाची गोष्ट येथें स्पष्ट केली पाहिजे. गडकऱ्याच्या मनात प्लेटॉनिक लव्हची जीं जीं वैशिष्ट्यें काहूर करीत असत त्या सर्वानाच हे विवेचन लागू आहे असें समजावें. प्रेमाचें विलक्षण महत्त्व व प्रेयसीशीं आत्यंतिक तादात्म्य या गोष्टींवर वरील कवितामध्ये फार मोठा भर दिलेला आहे. परंतु प्रेयसीशीं प्रत्यक्ष झालेलें हें तादात्म्य नसून प्रेयसीशीं आत्यंतिक तादात्म्य व्हावें या कल्पनेशीं गडकऱ्याचें झालेलें तादात्म्य होय! आणि ज्या प्रेमाची वरील कवितामध्ये इतकी विलक्षण महती त्यानीं गायिली आहे तें प्रेमहि प्रत्यक्षांतील प्रेम नसून ती प्रेमाची नुसती कल्पना होय. थोडक्यात हें अमूर्त ( abstract ) प्रेम आहे; आणि प्रेयसीशीं होणारें तादात्म्यहि काल्पनिकच आहे. हें सारें अनेकांना

फार चमत्कारिक वाटेल. पण ही वस्तुस्थिति आहे. इंग्रजींत ज्याला ' आयूडिअल लव्ह ' अशी सज्ञा आहे त्या प्रकारच्या प्रेमाच्या कल्पने-भोवती निदान या विशिष्ट कालखडात तरी गडकऱ्याचे मन घुटमळत होतें हें अगदी स्पष्ट आहे. हें प्रत्यक्ष प्रेम नसून प्रेमाची केवळ कल्पना आहे; आणि जिच्यामध्ये आपण पूर्णपणे विरून जावे, जिच्याशीं तादात्म्य पावावें अशी उत्कट इच्छा हृदयशारदेस या कवितेंत गडकऱ्यांनी घोळून घोळून प्रकट केली आहे ती प्रेयसीसुद्धा सत्यसृष्टींतील प्रेयसी नसून प्रेयसीची केवळ कल्पना आहे हे लक्षात ठेवणे जरूर आहे. या दृष्टीने हृदयशारदेस ही सर्वच कविता पुन्हा एकदा वाचावी. मीं जी हीं अनुमानें बाधलीं आहेत तीं मुळीच निराधार नाहीत. दिव्य प्रेमाची जाति या कवितेतील प्रत्येक ओळीचे काळजीपूर्वक वाचन करून व ती कविता सारखी समोर ठेवून बाकीच्या कविता वाचल्या असता मी म्हणतों या गोष्टीचा प्रत्यय आल्यावाचून राहणार नाही. १९१४ पर्यंत गडकरी अमूर्त प्रेमाच्या विरळ वातावरणातच घोटाळत होते हें कधींहि विसरू नये.

शेलीच्या बाबतीत असलाच प्रकार झालेला होता, हे अनेक टीका-कारानी दाखवून दिलें आहे. या बाबतीत शेलीचा चरित्रकार ए. क्लटन–ब्रॉक् याने केलेलें विवेचन उद्बोधक असल्यामुळे व गडकऱ्याचे अतरग जाणून घेण्याच्या बाबतींत त्याचें बरेचसे साहाय्य होण्यासारखें असल्यामुळे येथे उद्धृत करीत आहे.

> 'Shelley always kept the idea of love as a state of mind to be cultivated for its own sake and almost independent of its object Love, as he conceived it, did not mean action, but ecstacy It was like the religion of eremites but unfortunately not so free of material results as that religion "[६]

प्रेम म्हणजे ब्रह्मानंद, आणि ब्रह्मानद ही तर अत्यंत अमूर्त गोष्ट. निष्काम कर्मयोग आचरणारे विरक्त साधुपुरुष ज्या तन्मयतेचा अनुभव घेतात तशा प्रकारचीच ही तन्मयता असली तरी त्या दोहोंत एक महत्त्वाचा फरक आहे. शेलीची तन्मयता सर्वस्वीं उच्च व उदात्त वातावरणांत नेहमी विहरत

राहणेच शक्य नव्हतें, जड सृष्टींतील अनेकविध घटनांशीं तिचा साक्षात् संबंध येणें अपरिहार्य होते; आणि या संबधामुळे तिचे उद्दिष्ट असलेलें जें अमूर्त प्रेम त्यांतहि मूर्त, प्रत्यक्ष, गोष्टींचा शिरकाव होणे व तें कलुषित होणें हेंहि अपरिहार्य होते. गडकऱ्याच्या बाबतींत नेमकें हेंच झाले, आणि निरभिलाष तन्मयतेत केंद्रित झालेलें, व प्रेमाच्या कल्पनेवर प्रेम करणारे त्यांचें मन सत्यसृष्टींतील मूर्त प्रेमाकडे व मूर्त प्रेयसीकडे धाव घेण्यासाठी तळमळूं लागले. अमूर्त प्रेमाच्या विरळ वातावरणात विहार करणारे मन केव्हा तरी व्यवहारी जगात, सत्यसृष्टींत उतरणारच. त्याप्रमाणें गडकऱ्यांचें मनहि अस्मानांत भराऱ्या मारून थकल्यावर पुन्हा पृथ्वीवर येण्यासाठी धडपडूं लागले. चित्तात अभिलाषाचें काहूर चाललें असताहि त्यावर विचित्र अवगुठनें घालून आपल्या भावनाचे उदात्तीकरण चाललें आहे असा भास शेलीला काही काळ निर्माण करता येत असे, पण तो काही काळच ! क्लटन्-ब्रॉक्‌ने शेलीच्या अंतरगात चाललेले काहूर ज्यायोगें स्पष्ट होईल असा खुद्द त्याचाच एक उतारा उद्धृत केला आहे.

> "The question is, what do I love? It is almost unnecessary to answer Do I love the person, the embodied identity, if I may be allowed the expression? No. I love what is superior, what is excellent, or what I conceive to be so"

यावर क्लटन-ब्रॉक्‌चे भाष्य पुढीलप्रमाणें आहे.

> "That was always the trouble with Shelley He was apt to love people, not for themselves, but for perfections which he imagined in them, and so his love was precarious In the case of women, unconscious desire, which always went to his head, disguised itself as a recognition of intellectual and moral perfections."[७]

तात्पर्य, दिव्य प्रेमाची जाति या कवितेंत ज्या प्रेमाची महती गडकऱ्यांनी गायिलेली आहे तें दिव्य व अमूर्त प्रेम असून त्यांना अभिप्रेत

असलेलें सौंदर्य सुद्धा दिव्य, अमूर्त व विश्वात्मक सौदर्य (universal beauty) आहे. 'सौंदर्याच्या श्रेणी, तीं देवाघरचीं लेणीं' या ओळींत ही कल्पना उत्कृष्टपणें व्यक्त झालेली आहे. सुंदर वस्तूच्या दर्शनाने आत्म्यांतील व विचारांतील सौंदर्याची प्रतीति होऊं लागते, आणि यातूनच विश्वात्मक सौंदर्याची प्रतीति होत असते; या सौंदर्यात अपूर्णतेचा लेशहि नसतो व तें नेहमी अविकृत असतें, आणि त्याचा विनाश होण्याचें कालत्रयींहि भय नाही असें विवेचन प्लेटोच्या सिंपोझियममध्ये डायोटिमाच्या भाषणांत आलें आहे. असल्या परमोच्च सौंदर्याविषयीं वाटणारें जें प्रेम तेंहि अर्थात् तितकेंच अमूर्त असलें पाहिजे हें उघड आहे. असल्या सौंदर्याचा साक्षात्कार हे मानवी जीवनाचें स्पृहणीय सर्वस्व होय असा प्लेटोच्या प्रतिपादनाचा आशय आहे. या प्रकारच्या विश्वात्मक सौंदर्याविषयीं वाटणाऱ्या अमूर्त प्रेमाचे वर्णन स्वतः शेलीनेच *Hymn to Intellectual Beauty* या कवितेंत केलें आहे.

शेलीच्या या कवितेंतील

— O aweful LOVELINESS,
Wouldst give whate'er these words cannot express.

या ओळींतील LOVELINESS म्हणजेच विश्वात्मक सौंदर्य. या विश्वात्मक सौंदर्याचा साक्षात्कार ही गोष्ट आत्म्याच्या दृष्टीने जगतांतील सर्वांत उत्कृष्ट निधान होय असें शेलीचें मत आहे. या सौंदर्याच्या साक्षात्काराची लालसा मानवी मनांतील कलुषित प्रवृत्तींचा निरास करते व त्याला उदात्त बनविते असा शेलीचा आशय आहे. अर्थात् असला साक्षात्कार होणें ही गोष्ट भारी कठिण आहे याची शेलीला चागली जाणीव होती; आणि या जाणिवेंतून जी विकलता निर्माण होणें अपरिहार्य आहे तीच विकलता त्याच्या या गीतात सर्वत्र प्रतीत होत आहे.

उच्च, उदात्त, दिव्य व अतींद्रिय विश्वात्मक सौंदर्याच्या साक्षात्काराची लालसा कितीहि आकर्षक वाटली, व या सौंदर्यामुळे निर्माण होणारें निराभिलाष प्रेमहि भारी मोहक भासलें, तरी सत्यसृष्टींत वावरणाऱ्या

भावनापूर्ण मानवाच्या मनांत नेहमी जागृत असणाऱ्या अभिलाषा या प्रेमांतून सर्वस्वीं नष्ट होणें कधीहि शक्य नाही हें शेलीला व त्याच्या समानधर्मी कवींना मधूनमधून उमजतें. परंतु ध्येयवादाच्या रमणीय स्वप्नसृष्टीची भुरळ कांही विलक्षण असते. तथापि, केव्हा तरी ही आत्मवंचना आहे याची जाणीव झालीच पाहिजे. ही जाणीव शेलीला झाली, आणि गडकऱ्यानाहि झालेली आहे ! मागे स्पष्ट केल्याप्रमाणें ध्येयवादाची स्वप्नसृष्टि व या भौतिक जगांतील अभिलाषा याचा हा विचित्र संघर्ष आहे; आणि या संघर्षाची प्रतीति शेलीच्या अनेक कवनातून जशी येते तशीच गडकऱ्याच्याहि कवनातून येते. हा संघर्ष बहुतेक साऱ्या भावनावश कवींच्या ठायीं दिसून येतो आणि तारुण्याच्या ऐन उमेदींत तर तो भारीच बलवत्तर असतो. कालेंकरून ध्येयवादाच्या स्वप्नसृष्टीच्या विरळ वातावरणातून व्यावहारिक जगतातील अनुभवाच्या योगाने शहाणे होण्याचा प्रकार काही कवींत दिसतो आणि जीवितार्चे वास्तव रूप जाणून घेणें त्याना शक्य होतें. कांही मात्र या काचनमृगाच्या मागे धावत बसण्यातच जीवितसर्वस्व मानतात आणि अर्ती त्याची असह्य वचना होते !

अभिलाषा बलवत्तर होणें व त्यानी सारें मन भारलें जाणें ही गोष्ट केव्हा तरी घडणें अपरिहार्य असतें. काही अपवाद सोडून दिले तर ही गोष्ट सार्वत्रिक आहे असें म्हणावयास हरकत नाही. विश्वात्मक सौंदर्य, अमूर्त व दिव्य प्रेम, इत्यादि कल्पनात आकर्षकपणा आहे असें मानलें तरी त्याने मानवी मनाचें फार काळ खरें समाधान होणेंच शक्य नाही. अभि-लाषा उफाळून येत असतात आणि त्याचें उदात्तीकरण चालू असतें. या प्रकारातहि काही विचित्र समाधान कित्येकाना लाभत असेल. तथापि हें समाधान अत्यत चंचल असते; आणि दिव्य सौंदर्याचा साक्षात्कार व त्यासाठी धडपडणारे दिव्य प्रेम या तत्त्वाचा लाभ होणें अशक्य ठरल्यामुळे मनांत एक प्रकारचा हताश ओसाडपणा निर्माण होणें अपरिहार्य ठरतें. पण मानवी मन असें मोकळें, ओसाड राहणें ही गोष्ट भयानक असते. दिव्य सौंदर्याच्या दुष्प्राप्यतेमुळे व अतींद्रिय प्रेमाच्या असफलतेमुळे निर्माण झालेल्या पोकळींत कोणत्या तरी भावना उद्भूत होणारच; आणि

प्रेम करणें हा मानवाचा धर्म असल्यामुळे अतींद्रिय, दिव्य तत्त्वांत गुरफटलेलें प्रेम अखेर सत्यसृष्टींतील एखाद्या व्यक्तीभोवती घोटाळूं लागतें. आणि हा सारा प्रकार अगदी स्वाभाविक असाच आहे.

स्त्रीविषयीं शारीरिक अभिलाषाचा उद्भव होणे हें मूलभूत मानवी प्रवृत्तींना सर्वस्वीं अनुसरूनच आहे. यात अनैसर्गिक असे काहींहि नाही. किंबहुना अशी अभिलाषा उत्पन्न न होणे हेच अनैसर्गिक आहे या स्वाभाविक प्रवृत्तींचा प्रभाव गडकऱ्यांच्या भावजीवनांत केव्हा तरी दिसून येणें अपरिहार्य होतें. वैवाहिक जीवनात अतृप्ततेच्या, असमाधानाच्या, दारुण व्यथेनें नेहमींच तळमळणाऱ्या गडकऱ्यानी आपल्या भावनांचे उदात्तीकरण करून त्या दिव्य, अतींद्रिय, निरभिलाष प्रेमात परिणत करण्याची विलक्षण धडपड काही वर्षे तरी चालविली होती हें निश्चित. असल्या विचित्र धडपडीचा परिणामहि कधी कधी फार वाईट होतो. भावनांचा ताण असह्य झाल्यामुळे कधी कधी विचित्र प्रतिक्रिया होते, आणि उफाळून आलेल्या भावना अगदी स्वैर व बेबंद होतात. इतका अतिरेक जरी झाला नाही तरी शारीरिक अभिलाषाचा पगडा मात्र मनावर बसू लागतो व निरभिलाष तन्मयतेच्या कल्पनेंत बळेंच कोंडून ठेवलेलें मन आकाशातील दूरच्या अलभ्य तारकेकडून सत्यसृष्टींतील मानवी तारकेकडे वळते व तिच्या पायाशीं घोटाळूं लागतें. प्रत्यक्षात अशी एखादी तारका नेहमीच भेटते असे नाही. तथापि कल्पनासृष्टींतील प्रेयसी ही जणू खरीच प्रेयसी आहे अशी समजूत करून घेऊन सत्यसृष्टींतील उत्कटतेने तिच्यावर आपल्या भावनांचा वर्षाव करून कृत्रिम समाधान मिळविणें कलावताला शक्य होतें. प्रसिद्ध फ्रेंच लेखक रूसो याच्या बाबतींत हें घडले होते असे सांगतात. प्रत्यक्षात रूसोचा प्रणयभंग झाला होता असे ऐकिवात आहे. जें सुख प्रत्यक्षांत प्राप्त करून घेणें रूसोला जमले नाहीं ते सुख कल्पनासृष्टींत प्रवेश करून त्याने आपल्या प्रणयकथेच्या द्वारे प्राप्त करून घेतलें. या प्रणयकथेचें नाव *Nouvelle Heloise* खरे प्रेम ही चीज आपल्याला कधीच प्राप्त झाली नाही असे स्वत: रूसोनेच कबूल केले आहे. ही त्याची कबुली पाहा—

"The impossibility of attaining real beings threw me into the regions of chimera, and seeing nothing in

> existence worthy of delirium, I sought food for it in the ideal world, which my imagination quickly peopled with beings after my own heart"[८]

सत्यसृष्टींत प्रेमाची विफलता चित्ताचा दाह करूं लागल्यामुळे कल्पना-शक्तीच्या साहाय्याने रूसोने गंधर्वनगर निर्मिलें आणि या गंधर्वनगरात प्रेमसाफल्याचे कृत्रिम समाधान त्याला लाभले. या गंधर्वनगरात आपली अतृप्त आशा तृप्त झाली असा खुद्द रूसोचाच कबुलीजबाब आहे हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.

> "Recollecting everything I had felt during my youth, this, in some measure gave me an object to that desire of loving which I had never been able to satisfy, and by which I felt myself consumed"

या प्रकारच्या स्वप्नरंजनाचें आणखी एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे गएटेची सॉरोज ऑफ् यंग वेर्टर ही जगप्रसिद्ध कादबरी. रूसो व गएटे याच्या बाबतींत जो प्रकार झाला त्यासारखा प्रकार अनेक रोमॅंटिक कवींच्या आयुष्यात कधी तरी होत असतो. गडकऱ्याच्या बाबतींत तसेंच झाले असल्यास त्यात काहीच आश्चर्य नाही. सत्यसृष्टीतील आपल्या अभिलाषा त्यांनी प्रेमसंन्यासांतील लीलेची व्यक्तिरेखा निर्माण करून थोड्याफार तृप्त करून घेतल्या, आणि कवितेच्या क्षेत्रांत हृदयशारदा ही काल्पनिक प्रेयसी निर्माण करून तसलेंच कृत्रिम व अपुरें समाधान त्यानी मिळविलें असलें पाहिजे. निरभिलाष तन्मयतेच्या कल्पनेभोवती कांही दिवस त्याचें मन घोटाळत राहिलें असलें तरी अभिलाषा केव्हा तरी उन्मत्त होणार हें ठरलेलेंच होते. आणि काल्पनिक प्रेयसीवर प्रेमाची वृष्टि करण्यामुळे होणारें समाधान हे अगदीच अपुरें व कृत्रिम असल्यामुळे सत्यसृष्टींतील खऱ्या प्रेयसीचा शोध करण्यासाठी त्याचें भावनावश मन तळमळू लागलें असलें पाहिजे असा याचा साधा व सरळ अर्थ आहे.

> "The inordinate demand of unavailing spiritual love on the man's nature creates a void in the total being that craves replenishment in love of a woman."

मिड्लूटन मरीनें कीट्सच्या बाबतींत केलेलें हें विधान[१] गडकरी व त्याचे भावनावश भाईबंद याच्याहि बाबतींत अगदी खरें आहे.

काल्पनिक प्रेयसीवर प्रेमाची वृष्टि करून तिच्या द्वारें कसलें तरी विचित्र समाधान मिळविणें, अथवा उच्च, दिव्य, अतींद्रिय, निरभिलाष प्रेमाच्या मृगजळाच्या मागे लागून आत्मवचना करून घेणें व त्यांतहि एक प्रकारचें चमत्कारिक समाधान मिळविणें, या दोनहि गोष्टींचा लोभ कमी झाल्यावर सत्यसृष्टीतील खऱ्याखऱ्या प्रेयसीची प्राप्ति करून घेण्याची तळमळ गडकऱ्याच्या मनात काहूर करूं लागली, व ती प्रेयसी न आढळल्यामुळे त्याच्या मनात वेदनेचें शल्य बोचूं लागलें. काल्पनिक प्रेयसीवर प्रेम करण्यापासून दुहेरी फायदा होत असतो. प्रेम करण्याचें समाधान होते व ती काल्पनिक प्रेयसी अगदी आपल्या मर्जीप्रमाणेंच वागत असल्यामुळे निराशेचा प्रश्नच उद्भवत नाही. आणि दिव्य निरभिलाष प्रेमात आशेचा लेशहि नसतो, यामुळे निराशा होण्याचेंहि भय नसतें. पण सत्यसृष्टींतील प्रेयसीची गोष्टच निराळी. तिच्या प्राप्तीची उत्कंठा केव्हा आणि कशी अनावर होईल आणि तिची प्राप्ति न झाल्यामुळे होणारी निराशा किती दारुण असेल हें नेमकें कसें सागतां येणार?

ती कोण? ही कविता १९१४ च्या ऑगस्टमध्ये प्रसिद्ध झाली. या कवितेत प्रथमच गडकऱ्यानी तळमळणाऱ्या आशेचें वर्णन केलें आहे. या कवितेंतील चंद्राकडे पाहत समाधान मानणाऱ्या भूलोकावरील कुमुदिनीचा उल्लेख दिव्य प्रेमाची जाति या कवितेंतील 'प्राण चंद्र ज्या कुमुदाना, काय जाणतो तो त्यांना?' या ओळीची आठवण करून देईल. त्याचप्रमाणें रसिकास शोधणाऱ्या कवितेचा उल्लेख त्याच कवितेंतील 'कवि कोठेंतरि, ते कविता परि, फिरे दिगंतरि' या ओळीची आठवण करून देईल. पण या दोन कवितामधील कल्पनाच्या आविष्कारात एक महत्वाचा फरक सूक्ष्मपणे पाहिल्यास दिसून येईल. कुमुदिनी पृथ्वीवर राहते आणि चंद्रामुळे तिचें जीवन उजळतें; परतु चंद्राला या गोष्टीची जाणीव असत नाही—ही कल्पना दोन्ही कवितांत आलेली आहे. या कल्पनेंत निरभिलाष, निराश तन्मयतेचे वर्णन असलें तरी रसरसलेल्या आशेने

ओतप्रोत भरलेल्या तीन कल्पना ती कोण ? या कवितेंत आलेल्या आहेत, आणि प्रिय व्यक्तीच्या प्राप्तीची अनावर तळमळ त्यातून व्यक्त झालेली आहे; इतकेंच नव्हे तर त्या प्राप्तीसाठी सैरावरा धावण्याचीहि अनावर लालसा प्रकट झाली आहे. नदी सागराला भेटण्यासाठी शेकडो मैल धावत जाते, रसिकाच्या मागोमाग कविता हिंडत असते, आणि दिवस रात्रीमागून धावत असतो. आपले ईप्सित प्राप्त करून घेण्याची ही तीव्र धडपड आहे आणि ते सफल होईपर्यंत आशा तळमळत असते. आशेने भारलेलें मन प्रिय व्यक्तीच्या पायाभोवती कसे घोटाळत राहते व त्या व्यक्तीची प्राप्ति होईपर्यंत सैरावैरा धावणे हें त्याचे सर्वस्व कसें बनतें हे गडकऱ्यानी या कवितेत प्रथमच इतक्या प्रभावीपणें स्पष्ट केलें आहे. हृदयशारदेस व दिव्य प्रेमाची जाति या कवितामध्ये सत्यसृष्टीतील प्रेयसीच्या प्राप्तीची लालसा प्रकट झाली नसून काल्पनिक प्रेयसीभोवती गडकऱ्याचें मन गुंगत असलेलें दिसते. ती कोण ? या कवितेंत मात्र सत्य-सृष्टींतील प्रेयसी शोधण्याची व तिच्यावर साऱ्या मृदु भावनाची वृष्टि करण्याची अनावर लालसा दिसून येते. गडकऱ्याच्या मनोवृत्तींतील हा फरक जाणवण्यासारखाच आहे. ध्येयवादी उदात्त प्रेमाकडून त्याचे मन वस्तुस्थितींतील उत्कट व सत्य प्रेमाकडे वळलें याचा हा पुरावा आहे. निरभिलाष तन्मयतेतून आता साभिलाष तन्मयता निर्माण झाली आहे. मनात खळबळणाऱ्या भावना जिच्याजवळ व्यक्त करता येतील, जिच्यासाठी अश्रू ढाळण्यातहि धन्यता वाटेल, जिच्या हातीं आपलें भावपूर्ण हृदय अगदी विश्वासाने देतां येईल, जिच्या सानिध्यात मुक्तकंठाने विलाप कर-ताना कसलाहि सकोच वाटणार नाही अशी प्रेयसी शोधून काढण्याची व तिच्या जीवनात आपलें जीवन विरवून टाकण्याची विलक्षण आसक्ति या कवितेंत प्रकट झाली आहे; आणि प्रत्यक्षांत असली प्रेयसी अद्यापि भेट-लेली नसल्यामुळे उत्पन्न झालेली आर्त उत्कंठाहि गडकऱ्यानी अगदी मनमोकळेपणाने आविष्कृत केली आहे. ही प्रेयसी कोण हें अजून गड-कऱ्यानाहि माहीत नाही. कोणी तरी प्रेयसी असावी आणि तिने आपल्या थरारणाऱ्या भावनांना प्रतिशब्द द्यावा एवढेंच या अभिलाषेचें स्वरूप

आहे. तथापि अत्यंत तीव्र उत्कटतेने ती अभिलाषा निथळत आहे हें विसरता यावयाचें नाही. आणि काल्पनिक, स्वप्नसृष्टींतील उदात्त प्रेमाचा नाद सोडून मानवी जगतांतील प्रेयसीचा ध्यास लागल्याशिवाय असली विलक्षण भावनोत्कटता दिसणेंच शक्य नाही.

> "The inordinate demand of unavailing spiritual love on the man's nature creates a void in the total being that craves replenishment in love of a woman."

हे मागे उद्धृत केलेले मिड्ल्टन् मरींचे उद्गार आता अगदी यथार्थ वाटतील.

प्रत्यक्षातील प्रेयसीची भेट न झाल्यामुळे एखादी काल्पनिक मूर्ति निर्माण करून तिच्यावर आपल्या प्रेमभावनेची वृष्टि करणें व त्यापासून थोडेसे समाधान मिळवून घेणे हा प्रकार कलावताच्या बाबतींत कसा होतो हें मागे रूसोच्या स्वप्नरंजनाचा जो वृत्तात दिला आहे त्यावरून स्पष्ट होईल. १९१४ च्या सप्टेंबरमध्ये प्रसिद्ध झालेल्या अरुण या कवितेंतहि हृत्पटलावर आशेच्या कुचलीने चितारलेल्या प्रेमचित्राचेंच गुणगान करणें गडकऱ्याना भाग पडले आहे. प्रेयसीकडून प्रतिशब्द न मिळाल्यामुळे तळमळणारें मन आपल्या साऱ्या प्रेमभावनाचा अध्यारोप प्रेयसीवर करू लागतें. प्रेयसीविषयीं आपल्या ज्या भावना आहेत तशाच भावना उलट प्रेयसीच्याहि आपल्याविषयीं असल्या पाहिजेत अशा रमणीय कल्पनेंत धुंद राहून मन कसले तरी विचित्र समाधान मिळवूं लागते. बाह्य परिस्थितींतलि अनेक प्रतिकूल गोष्टींकडे बळेंच दुर्लक्ष करून प्रेयसीच्या वागणुकींतील प्रत्येक छटेचा अर्थ सर्वस्वीं आपल्याला अनुकूल असा लावण्याकडेच मनाचा कल होऊं लागतो. मागे ज्याचें पुष्कळच विस्ताराने वर्णन केलें आहे तो हा 'प्रॉजेक्शन्'चा प्रकार ओसाड आडातील एकच फूल या कवितेंत अगदी स्पष्टपणे दिसून येतो. ही कविता १९१४ च्या नोव्हेंबरमध्ये प्रसिद्ध झाली आहे. आपल्याच कल्पनेने तयार झालेल्या रमणीय चित्रात होणारी भावनाप्रधान मनाची तन्मयता, आपल्या मनांतील भाव प्रेयसीला पूर्णपणें

समजले आहेत अशी खोटीच समजूत, व त्या समजुतीच्या पायीं डोळ्यात सारे प्राण गोळा करून प्रेयसीच्या आगमनाची प्रतीक्षा, इत्यादि साऱ्या गोष्टी फुलाच्या रूपकातून व्यक्त झालेल्या आहेत. आपल्या इच्छा सफळ न झाल्यामुळे त्या फुलाची जशी निराशा झाली तशीच निराशा सत्य-सृष्टींतहि प्रेयसीने प्रतिशब्द न दिल्यामुळे अनेकाची होत असते आणि गड-कऱ्याच्याहि मनाची अवस्था या काळात याच प्रकारची असली पाहिजे.

गडकऱ्यांचें मन या सर्व कविता लिहीत असताना निष्प्रेम जीवनाच्या अगणित व्यथामुळे तळमळत होतें. **ती कोण? व ओसाड आडांतील एकच फूल** या कविता गडकऱ्यानी ज्या काळात लिहिल्या त्याच्याच आसपास केव्हा तरी **अवेळीं ओरडणाऱ्या कोकिळेस** ही कविता त्यानी लिहिली असावी. श्री. खाडेकर या कवितेचे साल १९१४ हेंच देत आहेत. या कवितेंत व्यक्त झालेली गडकऱ्याची विषण्णता इतर अनेक कारणामुळे निर्माण झाली असल्याची शक्यता असली तरी निष्प्रेम जीवनामुळे निर्माण होणारी असह्य व्यथा हें तिचें एक महत्त्वाचे कारण असलें पाहिजे. या कालखंडात गडकऱ्यानी ज्या इतर कविता लिहिल्या आहेत त्यात व्यक्त झालेल्या भावनावरून या तर्काला पुष्टीच मिळते.

निष्प्रेमाची शेज संोबती
भयाण दुनिया सारी भंवती

या ओळींमध्ये ही व्यथा स्पष्टपणें प्रकट झाली आहे. स्त्रीच्या प्रेमाची, स्त्रीच्या सहानुभूतीची प्रत्येकालाच तळमळ लागलेली असते. प्रेयसीच्या प्रेमाची, प्रेयसीने दाखविलेल्या सहानुभूतीची सर तारुण्यात तरी मातेच्या अथवा भगिनीच्या प्रेमाला येणे शक्य नाही. पण प्रेयसीच्या प्रेमाची पाखर असंभाव्य वाटल्यामुळे निदान मातेचें किंवा भगिनीचें तरी प्रेम प्राप्त व्हावें अशी आर्त तळमळ अगदी केविलवाणेपणाने गडकऱ्यानी या कवितेंत व्यक्त केली आहे.

पाहुनि ही तव दयाशीलता
द्रवेल कोणी भगिनी, माता,
शांत कराया हताश चित्ता—

रूक्ष जगावर स्त्रीहृदयांतिल टाकिल अश्रू एक ?!
त्या अश्रूच्या शीतलतेनें
भोवतालची आग जाळणे .....

ओसाड आडांतील एकच फूल ही कविता लिहिली त्याच सुमारास म्हणजे १९१४ च्या अखेरीस केव्हा तरी, गडकऱ्यांनी फुलें वेचिलीं पण- ही कविता लिहिली असावी. निष्प्रेम जीवनाच्या दारुण व्यथेचा याहि कवितेंत गडकऱ्यांना आविष्कार करणें भाग पडलें आहे.

हतभागी हा जीव एकला, प्रीतिदेवता नाहीं
मोडुनि पडलें हृन्मयमंदिर शतधा आघातांहीं !
निष्प्रेमाचे जीवन माझें रूक्ष चिंतनीं जावे,
सकलचि हा वरला ठरला, का ते दैवा ठावें !

*The Question* या शेलीच्या कवितेतील मध्यवर्ती कल्पनेवरून गडकऱ्यांना ही कविता लिहिण्याचें सुचलें असणें शक्य आहे हे मागे स्पष्ट केलेंच आहे. तथापि ' फुलें वेंचिलीं; पण आता तीं द्यावीं कोणालागीं ? ' यासारखी भावना या काळात गडकऱ्याच्या चित्तांत काहूर करीत असल्या- शिवाय शेलीच्या वर उल्लेखिलेल्या कवितेवरून आपली कविता लिहिण्याचा मोह त्याना होणेंच शक्य नाही. शेलीच्या कवनात प्रकट झालेल्या व्यथेची साक्षात् प्रतीति घेण्याचे नशिबीं आलें असले तर शेलीच्या भावनाशीं समरस होऊन गडकऱ्यानी आपल्या मनातील विफलतेची भावना या कवितेत स्पष्ट केली असावी असें मानावयास मुळीच हरकत नाही. शिवाय, शेलीची कविता गडकऱ्याच्या अवलोकनातहि आली नसेल अशीहि शक्यता आहे. आपण तयार केलेला फुलांचा झेला जिच्या हातात प्रेमाने द्यावा अशी प्रेयसीच नाही या जाणिवेने शेलीचें मन ( अर्थात् स्वप्नांत ! ) जसें व्यथित झालें तसेंच गडकऱ्याचें मनहि असल्याच जाणिवेने व्यथित झालें असण्याचा भरपूर संभव आहे. तें कांहीहि असो, प्रेयसीची प्राप्ति व्हावी या भावनेने सतत तळमळणाऱ्या गडकऱ्याच्या प्रेमहीन जीवनाची कहाणी १९१४ च्या अखेरीस लिहिलेल्या या कवितेंत पुन्हा एकदा उत्कटत्वाने प्रकट झाली आहे एवढें मात्र खरें.

निष्प्रेम जीवनाच्या जाणिवेंतून निर्माण होणारें तीव्र दु:ख पुनर्विकसन या कवितेंतहि प्रकट झालें आहे असें मला वाटते. ही कविता १९१४ च्या डिसेंबरमध्ये प्रसिद्ध झाली. यावरून फुलें वेंचिलीं पण—या कवितेच्या आसपास केव्हा तरी गडकऱ्यांनी ही कविता लिहिली असावी. विरहामुळे—चिरविरहामुळे—आपण तप्त झालों आहोंत अशी सुरवातीसच गडकऱ्यानी कबुली दिली आहे. प्रेयसीची प्राप्ति झाल्यानंतर झालेला हा विरह नसून तिची प्राप्ति होण्यापूर्वींचा जो विरह असतो तो गडकऱ्याना अभिप्रेत असावा. भावबन्धनांतील महेश्वर ज्याचें ‘ प्रारंभविरह ’ असे वर्णन करतो त्या प्रकारचा हा विरह असावा. सृष्टींत सर्वत्र नवविकसन दिसते, वस्तुमात्राचा विनाश ही अपरिहार्य गोष्ट असली तरी त्या विनाशातूनच नवीन चैतन्याचे अंकुर फुटत असतात, सूर्य अस्ताला जातो खरा, पण त्याचा पुन्हा उदय होणार असतो, अमावास्येला लुप्त झालेला चंद्र पौर्णिमेच्या रात्रीं पुन्हा परिपूर्ण व्हावयाचा असतो, वर्षाऋतूंत विद्युल्लतेचें आगमन होणारच, आणि वसंतऋतूंत झाडावर लुसलुशीत पालवी झुलूं लागणारच. सृष्टीमध्ये सर्वत्र अशा प्रकारें पुनर्विकसन दिसतें.

If Winter comes, can Spring be far behind ?

या शेलीच्या प्रसिद्ध ओळींत हीच पुनर्विकसनाची उत्कट आशा प्रकट झाली आहे. सृष्टींत सर्वत्र पुनार्विकसन दिसतें, मग आपल्याच जीवनात तें का नसावें असा केविलवाणा प्रश्न गडकरी विचारीत आहेत.

पाहुनि हे नवविकसन । सुप्रसन्न होइ मन,
पारे विचारि दीनवदन । बालक हा नेणता !
या मदीय चिरनिराश । जीवन्मृत मानसास
पुनरपि उमलावयास । काल दिला कोणता ?

या ओळींतील ‘ जीवन्मृत ’ हा शब्द ओसाड आडांतील एकच फूल या कवितेंतहि आला आहे हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

हालत्या पिंपळपानास ही कविता याच सुमारास, म्हणजे १९१४ च्या डिसेंबरमध्येच प्रसिद्ध झाली. पिंपळाच्या फांदीवर वाऱ्याच्या झुळकी-

सरशी झुलणाऱ्या पानाला थरथरणाऱ्या अनुरागाची कांही कल्पना असेल काय? पिंपळपानाचें स्पंदन प्रेमाच्या कसल्या तरी गूढ भावनेने होत असेल काय?

या झुळझुळत्या वाऱ्यानें नाचसी,
कोवळ्या सूर्यतापाने तळपसी,
आपल्या मिश्र रंगानें झळकसी,
तुजकडेच माझें लक्ष सारखे लागे,
बांधिले तयाला गूढ काहिं अनुरागे !
जी गूढ अप्सरागीतें नभि पाझरती,
तीं वाहत येती खालीं वाऱ्यावरती !
ऐकुनी तयाचे सूर मुके नवलाचे,
या हृदयकपनें जीव काय तव नाचे ?

पिंपळपान कोणत्या कारणामुळे असें थरथरत आहे याचें नेमकें उत्तर कवीला मिळालें नाही तरी एका अत्यंत महत्त्वाच्या कारणामुळे तो त्या पानावर भारी संतुष्ट आहे. प्रीतीचें चांदणें जिच्या हृदयांत फुललें आहे अशा तरुणीच्या केशपाशात पिंपळपानाला स्थान मिळतें, हा त्याचा केवढा अलौकिक मान, हें त्याचें केवढें अलौकिक भाग्य! असला मान मिळत असेल, असलें भाग्य लाभत असेल तर कवीहि पिंपळपानांत रूपांतर पावावयास अगदी उत्सुक आहे.

संबंध असो वा नसो आपणामाजी,
मी एक कारणासाठी तुजवर राजी,
नवबालाहृदयीं प्रीति नवी हलताना
तच्छिरीं हलसि तूं तसाच पिंपळपाना !
जी हृदयकंपने सारीं मानसीं,
ती आम्हातें बाहेरी दाविशी !
निर्दोष मनानें भारी हालसी,
कुणि बाला जरि मज देइल असला मान,
तरि सुखेंच होइन मीही पिंपळपान !

तरुणीच्या प्रेमाच्या प्राप्तीसाठी गडकऱ्यांचें मन किती विलक्षण आसावलें होतें, व त्या संवेदनेमुळे उत्पन्न होणाऱ्या हृदयाच्या स्पंदनातील थरथरणारी उत्सुकता अनुभवावयास सापडावी यासाठी ते किती तळमळत होते याचे प्रत्यतर या हालत्या पिंपळपानांत मिळेल.

१९१४ च्या सुरवातीपासून अखेरीपर्यंत गडकऱ्यांनी जीं प्रेमगीतें लिहिलीं त्यामध्ये निरभिलाष तन्मयतेची, उदात्त व निष्काम प्रेमाची लालसा मुळीच दिसून येत नाही. उलट सत्यसृष्टींतील एखाद्या तरुणीचें प्रत्यक्ष प्रेम प्राप्त व्हावें यासाठी त्याचे मन तळमळतांना दिसतें. आणि अशा प्रेमाचें साफल्य न झाल्यामुळे भोगाव्या लागणाऱ्या निष्प्रेम जीवनाच्या दारुण व्यथाचा आविष्कार करणे हाच या सालातील प्रेमगीतांचा उद्देश स्पष्टपणें दिसतो. प्रेमसाफल्याच्या आशेचा पूर्ण अभाव ही या साऱ्या प्रेमगीतातील उत्कटत्वाने प्रतीत होणारी गोष्ट आहे.

यानंतरच्या काळात, म्हणजे १९१५ च्या सुरवातीस, त्याची आशा पल्लवित होण्यासारखी एखादी घटना घडली असेल काय? आकांक्षांच्या साफल्याच्या आशेची तरळती चाहूल त्याना लागली असेल काय? सुखसंवेदनेची कोवळी झुळूक त्याच्या हृदयावरून वाहत गेली असेल काय? त्यांच्या अंतःकरणाच्या वठलेल्या वेलीवर आशेची लुसलुशीत हिरवीगारपालवी झुलूं लागली असेल काय? हलत्या पिंपळपानास ही कविता लिहिल्यानंतर पाचसहा महिन्यानी लिहिलेली हा क्षण ही कविता वाचल्यावर आपल्या मनात ही शंका चोरट्या पावलानी शिरूं लागल्यास त्यांत कांही नवल नाही. ही कविता १९१५ जुलैच्या मनोरंजनांत प्रसिद्ध झाली आहे. कलाकुसरीच्या दृष्टीने ही कविता अप्रतिम उतरली आहे.

रमणि! स्मरणी आमरणाचि या हृदयपटावर ठसा<br>
सदाचा ठेविला हा क्षण असा!<br>
भूतभविष्यामधें तरलतर वर्तमान ज्यापरी—<br>
चवल सीमारेषा धरी,<br>
गतदुःखाच्या, भावि सुखाच्या मधे तसा सुंदरी!<br>
क्षण हा संशयरेषेपरी!

गतकालाच्या दुःखाचे हे पळते पाऊल !
सुखाची येत्या चाहूल !
जरि संशय माझ्या क्षणास या दूषवी,
तरि आयुष्याते अवघ्या क्षण भूषवी,
करि दुर्भग जीवननदास दे गति नवी,
अनंत सौख्याचा हा होइल आदिकालची तरी,
नातर अंत तरी सुदरी !

ही प्रेमसाफल्याच्या आशेने निर्मिलेली हुरहूर आहे, चित्ताला लागलेली ही चुटपूट आहे, हृदय संशयाने धडधडत आहे, पण हा भाग्याचा क्षण आहे यात शंका नाही. त्याच्यातील रुचिरता संशयामुळे किंचित् उणी झालेली असली तरी सर्व जीवन त्यामुळे उजळले आहे. त्यामुळे अनंत सौख्याचे उद्यान तरी फुलेल - नाहीतर, संशयाचे धुके विरळ होत जाऊन भाग्याची उजरी होण्याऐवजी, ते दाट दाट होऊन सुखाची तारका त्या धुक्यात अधुक होत जाईल. प्रेमसंन्यासाच्या शेवटच्या प्रवेशातील जयताच्या एका वाक्यात थोडा फेरफार करून म्हणता येईल की, या सुखाच्या क्षणामुळे एकतर स्वर्ग तरी हातीं येईल, नाहीतर पाताळात तरी पडावे लागेल. इंग्रजींत ज्याला love's suspense म्हणतात तसल्या संशयाने गडकऱ्यांचें भावजीवन यापुढे सतत भारावलेले दिसणार आहे. या संशयातहि एक प्रकारचे सौख्य सामावलेले असते, त्यायोगे उत्पन्न होणारी धडधडती हुरहूर आणि सभय उत्कंठा या गोष्टींतहि उन्माद साठविलेला असतो हें सारें खरे. तथापि संशयाची ही रात्र केव्हा तरी विरून जाईल, आणि साफल्याची, इच्छापूर्तीची सुरम्य प्रभात आनंदाची उधळण करीत येईल या आशेची भुरळ अनिवार असल्यामुळेच मनुष्य ही संशयाच्या धुक्याने धूसर झालेली पौषातील वद्य अष्टमीची रात्र रमणीय मानीत असतो, व ते धुकें केव्हा विरून जातें याची वाट पाहत बसतो

या संशयग्रस्ततेचा प्रभाव यानंतर एक महिन्याच्या काळांत लिहिलेल्या दोन कवितांत स्पष्टपणें दिसून येतो. मागें पाहणें ही कविता गडकऱ्यांनी ३० जुलै १९१५ रोजीं लिहिली. या कवितेवर एक प्रकारच्या औदासीन्याची छाया पसरलेली आहे हा क्षण ही यापूर्वी थोडेच दिवस

अगोदर लिहिलेली कविता पुन्हा वाचली असता ज्या संशयाने ती भाराव-लेली आहे त्याच सशयाचा अतिरेक झाल्यामुळे हें औदासीन्य आलें असलें पाहिजे असा तर्क करावयास काही हरकत नाही.

जिकडे मज मार्ग फुटे। न कळत मी फिरत सुटे।
नच कसलीही माया। पायबद्ध बाधाया।।
मागुनि मज शोकवशा। पाहीना कुणि आशा।
मग मागे वळुनी का पाहणे तरी ?

अगदी याच सुमारास गडकऱ्यानी मनांतली दिवसरात्र ही कविता लिहिली. १९१५ ऑगस्टच्या मनोरंजनांत ती प्रसिद्ध झाली आहे. आपल्या मनात चाललेला आशानिराशेचा लपडाव या कवितेंत गडकऱ्यानी वर्णिला आहे. एका क्षणाला मनात आशेचा प्रादुर्भाव व्हावा आणि लगेच दुसऱ्याच क्षणाला निराशेचा काळोख दाटावा अशी विचित्र स्थिति झाली आहे. 'बालकवीं'नी वर्णिल्याप्रमाणे 'क्षणात येतें सरसर शिरवें क्षणांत फिरुनी ऊन पडे' अशी गडकऱ्याच्या मनातील भावनाच्या हेलकाव्याची अवस्था झाली आहे. ही पूर्ण निराशा नाही हें लक्षात ठेवलें पाहिजे. चित्तांत निराशेचें थैमान चाललें असलें तरी त्या निराशेची व्यथा नष्ट करून उत्साह प्राप्त करून देणारी आशाहि तेथे तरळत आहे. आणि या तरळत्या आशेच्या चोरट्या हालचालीनेहि भावनाना फुलोरा प्राप्त होत आहे. पण या फुलाच्या पाकळ्याचे सौदर्य कोमेजून जाईल आणि तें निर्माल्य होईल ही भीति मनात सारखी घर करून राहिली आहे. हा लपंडाव सपणार तरी केव्हा ?

मनात उगवे तसीं क्षणि नवीन आशारवि,
प्रफुल्ल—तर कल्पनेप्रति नवीन ये पालवी ! ... .
तशीच मान सारखी वरिवरीच आशा चढे,
गमे क्षणच जाहली सफल, तोच खाली पडे। ...
विषण्ण हृदयीं तशी भयकरा निराशा जडे,
तमोमय रसा गिळी मन मनी बिचारें रडे।

आणि असला नैराश्याचा भयाण अंधार भोवताली दाटला असता त्या

काळोखाचा भेद करून तेजाची शलाका फेकणारी तारका दूर कोठे तरी लकाकतांना दिसते, आणि पुन्हा नसानसातून चैतन्य हेलावूं लागतें.

तशात गगनामधे दिसत दूर तारा परी—
मनातहि सहस्रधा फिरत कल्पना बावरी !
पुन्हा उगवतो रवि प्रभवतो प्रकाशा नव,
निराश मनिंही पुन्हा करि तशीच आशा रव !
असे सतत चालते जनिं नसे मनी सारखे;
असे हृदयिं आज जे गमत ते उद्या पारखे !

पण ही संशयाची रात्र कायमची विरून जाऊन आशेची प्रभात जीवनांत स्थिर राहणार नाही का ? हृदयातील भावनाचा हा लपंडाव थाबणार नाही का ?

नको दिवसरात्र ही न सरती कधीं जी पहा,
सरेल कधिं तो सरो हृदयिंचा लपडाव हा !

१९१५ नोव्हेंबरच्या मनोरंजनांत प्रसिद्ध झालेलें गीत-विरक्ति हें गीत गडकऱ्यांच्या भावजीवनातील आंदोलनाच्या आविष्काराच्या दृष्टीने फार महत्त्वाचें आहे. या गीतात संदेहाचें गूढरम्य वातावरण नसून निराशेची चाहूल कसली तरी हुरहूर कवीच्या मनात निर्माण करीत आहे असें दिसतें.

देवी दर्शनदुर्लभ झाली,
आशालेशहि नच काही
संसाराची होउनि भाषा
जीवनकवनातुनि वाहीं !
प्रतिवस्तूचा शब्दचि उरला
भावमया जगतीं राही,
त्या शब्दाचा अर्थ कुणाते
वस्तुज्ञानाविण नाही !
गूढार्थचि तो अलिखित मार्गी
मत्कवनीं भरुनी जाई,
नसतां परि संकेत जिवाचा

उमगेना तें कवणाही !
गीत कळावे जीस, नसे ती
दिशा शोधिल्या जरि दाही,
'गोविंदाग्रज' सहजचि कवने
जाळि निराशा खर दाहीं !

या कवितेंत संदेहाचें वातावरण नाही असें वर म्हटलेंच आहे; त्याच-प्रमाणें 'निराश जन्मापासुनि तीं' असल्या निरभिलाष तन्मयतेचीहि तिच्यांत छटा नाहीं. आशेचा उद्भव होऊन मग त्या आशेचा भंग झाल्यामुळे उत्पन्न होणारें औदासीन्य मात्र या कवितेंत ओतप्रोत भरलें आहे. थोड-क्यात ही प्रेमनैराश्याची व्यथा आहे, आणि ती अगदी प्रथमच या गीतांत प्रकट झालेली आहे. प्रेयसी भेटूं शकत नाही, आणि ती भेटेल अशी आशाहि नाही असें कवीने स्पष्टपणें म्हटलें आहे.

देवी शर्दनदुर्लभ झाली
आशालेशहि नच कांही

या ओळींवरून कांही काळ जिचें दर्शन सुलभ होतें अशी प्रेयसी आता दुर्लभ झाली असेंच गडकऱ्याना म्हणावयाचे आहे हें स्पष्ट दिसते. प्रेयसीची भेट होण्याची थोडीहि आशा उरली नाही या दारुण विचाराने त्यांच्या मनाची जी तळमळ चाललेली आहे ती दुसऱ्या ओळींत उत्कट-त्वाने प्रकट झाली आहे. याच्या पुढच्या दोन ओळी तर भारीच संशया-स्पद आहेत.

संसाराची होउनि भाषा
जीवनकवनातुनि वाही !

१९१५ च्या एप्रिलच्या सुमारास एखाद्या मुलीशीं गडकऱ्यांचा बराच परिचय झाला असेल काय ? तिने त्यांच्या प्रेमभावनाना प्रतिशब्दहि दिला असेल काय ? हा क्षण ही कविता या वर्षाच्या मेमध्ये किंवा जूनमध्ये लिहिलेली आहे हे नक्की. या कवितेंत प्रेमाची आशा निर्माण झाली अस-ल्याचा अगदी स्पष्ट उल्लेख आहे. ही आशा बलवत्तर नसली तरी मन सुखद विचारांनी भारून टाकण्याइतपत तिचा प्रभाव आहे संशयाचें धुकें तेथें आहे. हें खरें असलें तरी आशेच्या

या क्षणाने आपलें सारें आयुष्य उजळून टाकलें आहे असें गडकरी या कवितेंत म्हणत आहेत. यानंतर लगेच लिहिलेल्या **मनांतील दिवसरात्र** या कवितेंत आशानिराशाच्या लपंडावाचें वर्णन आहे. ही कविता ऑगस्टमध्ये प्रसिद्ध झाली. ही कविता गडकऱ्यानी लिहिल्यानंतर अगदी थोड्याच दिवसांत संशयाचें धुकें नाहींसें होऊन आशेची पहाट होण्याऐवजीं निराशेची अवकळा पसरणे हे भारीच दुःखद आहे यांत शंका नाही. पण गडकऱ्याना असाच अनुभव या काळात आला असला पाहिजे. २५ नोव्हेंबर रोजी त्यानी **सुभाषित** नांवाची एक छोटी कविता लिहिली. या कवितेवरून हा संशय चांगलाच दृढ होतो. **गीत–विरक्ति** लिहिल्यानंतर लगेच ही कविता लिहिलेली आहे. हें सुभाषित पुढीलप्रमाणे आहे.

> जे जे रोग मनास होति, हृदया संताप जो जाळतो,
> जे जे घाव जिवास लागुनि जगा जो नित्य कटाळतो;
> त्या त्या विस्मृति हेच औषध खरें आहे गमे एक ते,
> जे लोकी नसते तरी मग कुणी जीवंत ना राहते !

गतकालांतील सुखद स्मृतींमध्ये दंग होऊन जाण्याची प्रवृत्ति गडकऱ्यांच्या ठायीं फार प्रबळ होती हें आपण मागे एका प्रकरणात पाहिलें आहे. असें असता विस्मृति झाल्यास ते फार चांगलें अशी विलक्षण तळमळ याच सुमारास गडकऱ्याना का लागलेली आहे? माझ्या मते कारण अगदी स्पष्ट आहे. जिची विस्मृति व्हावयास पाहिजे अशीच घटना या सुमारास झाली असली पाहिजे.

> To know the change and feel it,
> When there is none to heal it,
> Nor numbed sense to steal it......

या कीट्सच्या ओळींत वर्णिलेली अवस्था गडकऱ्यांचीहि झालेली असावी. त्याशिवाय विस्मृतीची इतकी लालसा लागण्याचें कारणच काय? आतां गीत-विरक्ति या कवितेंतील मागे उद्‌धृत केलेल्या ओळी पुन्हा वाचणें जरूर आहे.

> संसाराची होउनि भाषा
> जीवनकवनातुनि वाही !

या ओळी संशयास्पद आहेत असें मागे म्हटले होते त्यातील मर्म आता स्पष्ट करतों. संसाराची भाषा होऊन ती जीवनकवनातून वाहू लागली असें गडकऱ्याचें म्हणणें आहे. याचा नेमका अर्थ कोणता? गडकऱ्याचा व त्या मुलीचा परिचय पुष्कळच वाढून त्यानी तिला आपल्या मनातील इच्छा स्पष्ट शब्दांत बोलून दाखविली व तिनेहि उलट त्याच्या त्या इच्छेला प्रतिशब्द दिला असें झालें असेल काय? आणि या प्रतिशब्दामुळे तिच्या प्राप्तीची आशा बलवत्तर झाल्यानंतर मग तिने आपला शब्द फिरविला असेल काय? किंवा तिने प्रत्यक्ष नकार दिलेला नसताहि तिच्या वागणुकींत काही अस्थिरपणा, अनिश्चितपणा त्याना दिसला असेल, आणि लहरी स्वभावामुळे गडकऱ्यानी त्या वागणुकीचा विपरीत अर्थ करून घेतला असेल अशीहि शक्यता आहे. अनेक भावनाप्रधान माणसाचा असा स्वभाव असतो. प्रेमाचा शब्द आतां केवळ भावमय जगतात उरला आहे असे गडकरी म्हणत आहेत. म्हणजे प्रेम आता केवळ कल्पनासृष्टींत राहिलें आहे, तें सत्यसृष्टींत अवतीर्ण होण्याची शक्यता नाही असा याचा अर्थ आहे.

प्रतिवस्तूचा शब्दचि उरला
भावमया जगतीं राही

पण मूळ वस्तूच्या अभावीं नुसता शब्दच आता उरला असल्यामुळे, म्हणजे प्रेम संपलें व 'प्रेम' हा केवळ शब्दच उरल्यामुळे, त्या शब्दाचें खरें मर्म कळणें कठिण झालें आहे.—' सारेंच आतां पराकाष्ठेचे गूढ झालें आहे.

त्या शब्दाचा अर्थ कुणातें
वस्तुज्ञानाविण नाहीं !

ज्याचा अर्थ कोणालाहि कळणें शक्य नाही असल्या गूढ गोष्टी आपल्या कवनातून आविष्कृत होत आहेत; परतु या गोष्टींमागची भावना माहीत नसल्यामुळे, कवीचें मन माहीत नसल्यामुळे, त्याच्या अंतरंगांत चाललेलें काहूर माहीत नसल्यामुळे, इतराना त्या कळणें शक्यच नाहीत असें गडकरी म्हणत आहेत.

गूढार्थचि तो अलिखित भागीं
मत्कवनीं भरुनी जाई,
नसता परि संकेत जिवाचा
उमगेना तें कवणाही !

बरें, जिला आपल्या मनातील साऱ्या भावना सांगाव्या, जिच्यापुढे हृदय मोकळें करावें, जिला उद्देशून गीत लिहावें आणि जिला तें कळावें, तीच आतां उरली नाही. आपला भावनाविष्कार जिला समजावा अशी कवीची इच्छा आहे तीच समोर नसल्यामुळे भावनोद्रेकाला वाट करून देण्यासाठी कवनाची मदत घेणे कवीला भाग पडलें आहे. कवनाच्या द्वारें आपली तीव्र निराशा दग्ध करून टाकल्याशिवाय आता गत्यतर नाही.

गीत कळावें जीस, नसे ती
दिशा शोधिल्या जरि दाहीं;
'गोविंदाग्रज' सहजचि कवने
जाळि निराशा खर दाहीं !

गीत-विरक्ति या कवितेंतील भावनोत्कटतेचा आविष्कार इतका प्रामाणिक वाटतो की, शेवटच्या ओळींत ज्या निराशेचा उल्लेख आला आहे ती निराशा स्वतः गडकऱ्यांना अनुभवावी लागली असली पाहिजे यात मला शंका वाटत नाही. ज्या मुलीवर गडकऱ्यांच्या प्रेमभावना केंद्रित झाल्या होत्या ती मुलगी सुंदर असली पाहिजे (——नव्हे, ती तशी होती !) हें सौंदर्य वास्तविक दुष्प्राप्य असलें तरी त्याच्या प्राप्तीची आशा निर्माण व्हावी व ती पल्लवित व्हावी अशी परिस्थिति होती हे नक्की. ज्या गीतामध्ये रसरसलेल्या उत्कट भावनाचा आविष्कार झालेला आहे त्यातील घटना सत्यसृष्टींतील आहेत असें मानावयास हरकत नाही. आणि आपल्या भावनांचा अगदी उत्कट असा आविष्कार करणें हा गडकऱ्यांचा मनोधर्मच आहे हे नेहमी लक्षात ठेवलें पाहिजे. यामुळे गीत-विरक्ति या कवितेंतील भावनाविष्करण अनुभवाच्या प्रतीतीवर आधारलेलें आहे अशी माझी खात्री झालेली आहे. हा माझा तर्क बलवत्तर अंतर्गत पुराव्यावर आधारलेला आहे हें मी लवकरच दाखवून देणार आहें.

गीत–विरक्ति ही कविता लिहिल्यानंतर थोड्याच दिवसांनी, म्हणजे २ डिसेंबर १९१५ रोजीं, गडकऱ्यानी दुर्दर्शन ही छोटी कविता लिहिली. मोठ्या विश्वासाने आपल्या साऱ्या मृदु भावना सौदर्याच्या अधीन कराव्या, आणि त्या भावनाची सौंदर्याने प्रतारणा करावी यासारखी तापदायक गोष्ट जगात दुसरी कोणतीहि नाही असे या कवितेत गडकरी म्हणत आहेत.

नाना रोग, जुगुप्सिता व्यसनिता, विच्छिन्न प्रेतावली,
भूकपादि अनर्थ, दैवघटितें ही सर्वही पाहिलीं,
त्याही खिन्न न चित्त होत, परि ते होने तदा ज्यापरी
विश्रब्ध प्रणयास वचिन यदा सौंदर्य स्वार्थास्तव !

स्वार्थासाठी विश्रब्ध प्रेमाची वंचना करणाऱ्या सौंदर्याचा धिक्कार करणारी वरील कविता लिहिल्यानंतर एका महिन्याच्या आत त्याच तारकेस याचना ही नितातरमणीय कविता गडकऱ्यांनी लिहिली. प्रेयसीच्या वागणुकींतील काही अतर्क्य गोष्टीमुळे व्यथित झालेल्या मनाच्या कटु भावना तीव्र शब्दात आविष्कृत झाल्यानंतर: या कटु भावनाची तीव्रता ज्यायोगें थोडी कमी होईल, व पुन्हा आशेची झुळूक वाहूं लागेल असें काही तरी या दरम्यानच्या काळात घडलें असलें पाहिजे. भावनावश मनुष्याला आपल्या भावनाची इतकीहि अवहेलना सहन होत नाही, तो या बाबतींत अगदी हळुवार बनलेला असतो. यामुळे प्रिय व्यक्तीच्या वागणुकींतील अगदी क्षुद्र गोष्टीने सुद्धा त्याचें हृदय कंपित होतें. दुर्दर्शन ही कविता लिहीत असता गडकऱ्यांच्या बाबतींतहि असेंच कांही तरी झालें असावें. पण ज्या तारकेने त्याना बरीचशी व्यथा दिली व हुरहूर निर्माण करून बेचैन केलें, इतकेंच नव्हे तर कटु शब्दात आपला संताप व्यक्त करावयास लाविलें, त्याच तारकेची याचना करणें त्याना भाग पडलें आहे. नैराश्याची व औदासीन्याची काळोखी रात्र आशेच्या कोमल किरणांनी आतां उजळली आहे, आणि याच आशेच्या आधारावर जीवन भाग्यशाली होण्याचीं सुखस्वप्नें त्यांना पडूं लागलीं आहेत. या तारकेचें आकर्षण अनिवार आहे, आणि त्यात पराकाष्ठेची मोहकता सामावलेली आहे. ही आशेची मोहिनी

अत्यंत उन्मादक आहे. पुढे काय व्हावयाचें तें होवो. या क्षणाला तरी या आशेने सारें जीवन उजळल्यासारखें झालें आहे, साऱ्या वृत्ति महिरून गेल्याप्रमाणें झाल्या आहेत.

थाब जरा तारके ! जरा तरि थाब, सख सुदंरि !
कुणिकडे नेशी मज यापरी ?

या तारकेच्या प्राप्तीच्या लोभसवाण्या आशेने कवीला स्वतःचा पूर्ण विसर पडला आहे, तो तिच्यामध्ये अगदी तन्मय होऊन गेला आहे. या आशेचे महिरे रग भारीच मोहक आहेत. स्वर्गसुख म्हणतात तें हेंच ! तथापि या आशेचेंहि भय वाटण्यासारखी परिस्थिति आहे. नैराश्याची परंपरा भोगणें हेंच ज्याचें नशीब आहे अशा हतभागी जीवाला क्षितिजावर दूर कोठे तरी तरळणाऱ्या आशेमुळे थराथल्यासारखें, बावरल्यासारखें, झालें तर त्यात काही नवल नाही.

स्वर्गसुखाची आशा लावुनि ओढिसि मजला गडे !
थाबाचें—साग परी कुणिकडे ?
अतिदु खाच्या सतत अनुभवें हळवा जिव जाहला,
सुखाची सवय नाहिं त्याजला !

या अपूर्व मानवी जगतात सारेंच जेथे अस्थिर, तेथे इतकी मोहक आशा स्थिर कशी राहावी ? ' बालकवीं ' नी वर्णिल्याप्रमाणें

सौख्यातिरेकही पाही, दु खाला कारण होई—

अशी ज्या जगाची अवस्था आहे, त्या जगातील आशाचित्रे कितीहि मोहक असलीं तरी तीं वंचना कशावरून करणार नाहीत अशी शंका पोळलेल्या हृदयाला येणे स्वाभाविकच नाही काय ? 'बालकवि' म्हणतात—

झोप सौख्यानदात मानवाची
पुरी क्षणही कोठून टिकायाची ?

गडकऱ्याच्या मनाचीहि अशीच हळुवार अवस्था झालेली आहे. यामुळे आशेची पूर्ति होईलच काय ? या थरथरणाऱ्या शकेने ते पराकाष्ठेचे बेचैन झाले आहेत. पण या आशेच्या नाजूक धाग्याच्या आधारावर स्वर्गापर्यंत जाण्याचें भाग्य लाभलें तर सुखातिशयाच्या त्या एका दिव्य क्षणाच्या

प्राप्तीसाठी पुन्हा पृथ्वीवर यावयासहि कवि तयार आहे. तो क्षण !—त्याची प्राप्ति झाल्यानंतर मग नैराश्याचे कडे कोसळले तरी चालतील !

परि आशा लावुनि नेशी मज वरिवरी,
देशील टाकुनी स्वर्गातुनि मज जरी,
तो अध पातही या उन्नतिच्या परी—

इतक्या स्पृहणीय भाग्याला, इतक्या उच्चतेला आपण पात्र नसलों तरी प्रेयसीच्या प्रेमामुळे तशी पात्रता आपल्यामध्ये येईल अशी आशा उत्कंठित हृदयाने बाळगली तर तें अपेक्षितच नव्हे काय ?

उच्चतेस या योग्य न मी तरि स्वप्रेमे सावरीं,
याचना 'गोविंदाग्रज' करी

गडकऱ्यांची ही आशेच्या उन्मादाने धुंदकारलेली, व हळुवार भावनांच्या थरारणाऱ्या तल्लीनतेचें वर्णन करणारी कविता वाचताच कीट्सनें फॅनी ब्रॉन् या आपल्या प्रेयसीला उद्देशून लिहिलेल्या *Ode to Fanny* या कवितेचे मला तीव्रतेने आठवण झाली.

A theme ! a theme ! great Nature ! give a theme,
Let me begin my dream.
I come—I see thee, as thou standest there,
Beckon me out into the wintry air
Ah ! dearest love, sweet home of all my tears,
And hopes, and joys, and parting miseries,
To-night, if I may guess, thy beauty wears
A smile of such delight,
As brilliant and as bright,
As when with ravished, aching, vassal eyes,
Lost in soft amaze,
I gaze, I gaze !

* * *

I know it—and to know it is despair
To one who loves you as I love, sweet Fanny !

Whose heart goes fluttering for you everywhere,
Nor when away you roam,
Dare keep its wretched home,
Love, Love alone, has pains severe and many :
Then loveliest ! keep me free,
From torturing jealousy.

मध्यंतरीं निर्माण झालेलें संशयाचें व अनिश्चिततेचें धुकें डिसेंबरच्या अखेरीस जवळ जवळ विरून गेलें व गडकऱ्याच्या जीवनात पुन्हा आशेचें पुनवेचें चादणें फुलले. हें चादणें हरिणाच्या चंचलतेने नाहीसें होणार असलें तरी या क्षणाला त्याची रमणीयता उन्मादक आहे याची प्रतीति स्पष्टपणें येत आहे. त्याच तारकेस याचना या कवितेंत आविष्कृत झालेलें उन्मादक आशेनें भारलेलें, परतु नैराश्याच्या तरळत्या संशयाने थरारणारें गूढरम्य वातावरण आणखी काही दिवस तरी स्थिर राहावयाचें होतें असें दिसतें. ही कविता लिहिल्यानंतर थोड्याच दिवसानी —स या शीर्षकाचें एक अत्यंत मधुर व भावपूर्ण गीत गडकऱ्यानी लिहिलें. जानेवारी १९१६ च्या मनोरंजनात ते प्रसिद्ध झालें आहे.

प्रेमें जीं कुसुमे दिलीस मजला—
तू,, प्रेमले ! धाडुनी
कोमेजून उद्याच जातिल—सुखे
जावोत कोमेजुनी !
नाही वाटत खेदलेश, उलटा
आनद वाटे मना,
प्रेमाची स्मृति त्या जिवास जडुनी
आजन्म राहील ना ?

प्रेयसीने प्रेमाने पाठविलेलीं फुलें सुकून जातील, पण त्यामुळे वाईट वाटण्याचें कांहीच कारण नाही; कारण जिने तीं पाठविलेलीं आहेत तिची मधुर स्मृति त्या फुलांमुळे कवीच्या हृदयांत सतत दरवळत राहील. २५ नोव्हेंबर १९१५ रोजीं लिहिलेल्या सुभाषित नावाच्या कवितेंत विस्मृति हेंच खरें औषध होय असें आवर्जून सांगणाऱ्या गडकऱ्यांनी केवळ

एक महिन्याच्या आंत फुलांशीं निगडित झालेल्या रुचिर स्मृतीचें इतके गोडवे गावेत यांत कांहीहि विचित्र नाही. आठवण झाली की मनाला भयंकर व्यथा व्हाव्यात अशा घटना घडलेल्या असल्या म्हणजे भावनाकुल मनुष्य विस्मृतीची याचना करीत असतो. उलट एखाद्या स्पृहणीय घटने-तील रुचिरपणा प्रत्यक्ष अनुभवास सापडला असला तर त्या घटनेची स्मृति सदैव मनांत तरळत राहावी असेंच त्याला वाटत असतें. विलक्षण नैराश्या-तून प्रेयसीच्या स्मृति ज्याच्या योगानें सदैव जागृत राहील अशा मोहक फुलांच्या प्राप्तीपर्यंत गडकऱ्याच्या मनाचीं आंदोलनें या महिन्यादीडमहि-न्याच्या अल्पावधींत झालीं असलीं पाहिजेत असा तर्क केला तर त्यात कांहीहि चूक होणार नाही. गडकऱ्याच्या या गीताच्या वाचनाने

Music, when soft voices die

या ओळीने सुरू होणाऱ्या व मागे ( पृ. ४६ ) उद्‌धृत केलेल्या शेली-च्या प्रसिद्ध गीताची आठवण होणें अपरिहार्य आहे.

प्रीतीच्या साफल्याचा हा दिव्य क्षण गडकऱ्याच्या जीवनात जुलै १९१५ पर्यंतच्या काळांत केव्हा तरी येऊन गेला यात शंकाच नाही. कधी कधी या क्षणात सामावलेली रुचिरता संशयाने किंचित् मलिन झाली, आणि कधी कधी नैराश्याच्या भीतीने ती विरूनहि गेली; तथापि आशा–निराशाच्या या आंदोलनात, लपडावातहि, सामावलेली अलौकिक माधुरी गडकऱ्याना अनुभवता आली हें काय थोडें भाग्य आहे ?

—the very doubt endears
My sadness ever new,
The sighs I breathe, the tears I shed for thee.

या शेलीच्या ओळींत आविष्कृत झालेलें भावनांचें आंदोलन गडकऱ्यां-च्याहि भावजीवनांत या कालखंडात हेलावलें असलें पाहिजे.

पण, 'बालकवीं'नी म्हटल्याप्रमाणें 'संध्येच्या सुंदर छाया निमिषांतच काजळताती' हेंच खरें. मानवाचें सुख किती चंचल व किती तरल ! प्रभात-काळचें धुकें विरून जावयासहि यापेक्षा अधिक वेळ लागत असेल, कमल-

पत्रावरील जलबिंदूहि अधिक स्थिर असतील, विजेची चमकहि जास्त वेळ टिकत असेल, पाण्यावरची लाटहि यापेक्षा अधिक शाश्वत असेल ! पण या क्षणभंगुरतेमुळेच प्रेम रमणीय झालें आहे असें गडकऱ्यांची कालिंदी म्हणत नाही का ?

—स या कवितेंतील प्रेमाने भारलेले मदिर वातावरण पाहता पाहतां विरळ झालें, आणि नैराश्याच्या उष्ण वाऱ्याने तें दग्ध होऊ लागलें. हिरव्यागार लुसलुशीत हिरवळीची नयनरम्य शोभा मावळून गेली, आणि तिच्या जागीं रखरखीत माळरान दिसू लागले. गुलाबाचें फूल कोमेजलें, त्याच्या पाकळ्या मातींत पडून नाहीशा झाल्या, आणि काटे तेवढे मागे राहिले. भरतीचें उधान ओसरून गेल्यानतर उघड्या पडलेल्या वाळवंटाचा भकासपणा गडकऱ्याच्या जीवनांत दिसू लागला. मागे जिचा उल्लेख केला होता ती एका जुन्या श्लोकाची आठवण ही कविता गडकऱ्यानी १२ फेब्रुवारी १९१६ रोजीं लिहिली. आता आपल्या जीवनात सुखाने भरलेली झोप नाही असे अत्यत आत उद्‌गार गडकऱ्यानी या कवितेंत काढले आहेत.

नाही झोप सुखे—अहो, हरपली ती ईश्वराची दया !

सारे जग सौंदर्याने भरलेलें असता आपल्या जीवनात समाधान नाही, सुखाची झोप नाही, याची जाणीव गडकऱ्याना तीव्रतेने झालेली आहे.

सौंदर्यें भरल्या जगास बघुनी ...

जीवितास—ही कविता गडकऱ्यानी नेमकी केव्हा लिहिली तें उपलब्ध झाले नाही. परतु सौंदर्याच्या केवळ दर्शनाने मनांत भावनांचा दुबळा क्षोभ मात्र निर्माण होतो ही कल्पना तिच्यात आलेली असल्यामुळे व जीवन हें अत्यंत फसवें आहे हें गडकऱ्यांनी आवर्जून सागितलेलें असल्यामुळे वरील कविता लिहिली त्याच सुमाराची ही कविता असावी. अर्थात् हा केवळ तर्क आहे. जीवितास—या कवितेंत गडकऱ्यांच्या वैकल्याचा आविष्कार पुढीलप्रमाणें झाला आहे.

आणि जीविता, लाभ ह्याच का तुझ्या संगतीं राहुनिया ?
असेंच जाणें असे सदा का कालौघावर वाहुनिया ?
सौंदर्याच्या दर्शनमात्रें जागृत होत्या जीवात
विकल चेतना नाचे नुसती स्वस्थानीं व्हाया श्रात !
जनसंमर्दीं अलभ्य शोभा पाहुनि, ठसवुनि मनिं घेणें,
एकातीं ताच्चिंतन करणें...

एका जुन्या श्लोकाची आठवण या कवितेंत ज्या नैराश्याची व औदासीन्याची चाहूल लागलेली होती तें नैराश्य व औदासीन्य प्रेमभंगाच्याच पोटीं निर्माण झालें होतें यात कसलीच शका नाही. आपल्याला सुखाची झोप माहीत नाही अशी तक्रार त्या कवितेंत गडकऱ्यानी केली आहे. यापुढे आयुष्यांत सुखाची झोप ही काय चीज आहे तें गडकऱ्यांना अनुभवितां यावयाचे नाही ! हें विधिलिखितच होतें. स्वास्थ्य व समाधान या गोष्टी त्यांच्या जीवनांतून यापुढे कायमच्या अदृश्य होणार आहेत. जीवनांतील चैतन्याचा व उत्साहाचा दिवस मावळून त्याचे तेज औदासीन्याच्या अमावास्येमुळे काळवंडून जाणार आहे. जो आनंद लाभेल म्हणून डोळ्यांत सारे प्राण एकवटून ते जीवनाकडे पाहत होते तो आनंद दूर क्षितिजावर दिसला न दिसला तोंच हरपला सुद्धा. आणि

हातीं संसाराची माती
मनिंच्या आशा मनींच खाती

अशी त्यांच्या मनाची भीषण अवस्था झाली, व तींत बदल व्हावा असें कांहीहि पुढे घडून आलें नाही. टेनिसनने वर्णिल्याप्रमाणें

Trouble on trouble, pain on pain

अशीच त्यांच्या जीवनाची यापुढील कहाणी आहे.

१९१६ च्या मार्चच्या सुरवातीसहि प्रेमाची संदिग्धता गडकऱ्यांच्या मनांत थैमान घालीत आहे. हें संपूर्ण नैराश्य नसून त्यांत आशेची एक तरळती तिरीप आहे. अथवा गडकरी आपल्या निराश मनाचें हें वृथा

समाधान करून घेत आहेत काय? आशेला खरोखरच जागा होती कीं मागे ज्या ' प्रॉजेक्शन् ' चें विस्ताराने वर्णन केलें तोच प्रकार पुन्हा एकदा होत आहे!

निर्वाणीची विनवणी ही कविता २ मार्च १९१६ रोजीं लिहिलेली आहे. ही कविता फार महत्त्वाची आहे. गडकऱ्यांच्या प्रेमजीवनांतील एक महत्त्वाचा टप्पा या कवितेंत आढळेल. प्रेमनैराश्याची भीति दत्त म्हणून अगदी समोर उभी राहिलेली असतांहि पळत्या आशेच्या मागे गडकऱ्यांचें मन कसें दीनवाणेपणाने धावत होतें, व मृगजळामागे सैरावरा धावणाऱ्या हरिणाप्रमाणें खोटें समाधान कसें मिळवूं पाहत होतें याचा उत्कृष्ट पुरावा या कवितेंत आढळेल. निर्वाणीची विनवणी या शद्बांवरूनच या कवितेंतील विषयाची ताबडतोब कल्पना येईल. प्रणयिनीची ही शेवटची याचना आहे, आणि शेवटच्या याचनेंतील सारा आर्तपणा तिच्यात ओतप्रोत भरलेला आहे.

पाहसि आता अंत असा का ? पीडिसि का या दीना ?
सुदरि, पदरीं मदीय हृदया घेसि न कां पदलीना ?
क्षणैक हंससी, क्षणभर रुससी निष्ठुर चचलता ही,
सदिग्धा ही वृत्ति व्याकुल करित मनाप्रति पाहीं.
लाजुनि अजुनी स्वजना ह्या जन जवळीं का नच केला ?
किंवा हृदया द्वेषचि दूषवि मजविषयींचा पहिला ?
सुंदर वदनीं तव निर्दयता हृदय विदारित माझें,
पडु दे श्रवणीं ती शुभ वाणी मौन न हे तुज साजे.
प्रत्युत्तर दे प्रश्ना काहीं: अंत वृथा न पहावा,
विनोदवचनीं थावबि नच त्या, प्रश्नें परतवि नच वा.
संशयविष हें जाळित जीवा अधरसुधा दे रमणि!
करी विनवणी निर्वाणीची गोविंदाग्रजवाणी!

अजून संशयग्रस्तता कायम आहे. पण हें संदिग्धतेचें वातावरण आतां असह्य व्हावयास लागलें आहे. आणि म्हणून ही निर्वाणीची विनवणी आहे. प्रत्युत्तराची अपेक्षा करणारें गडकऱ्यांचें मन किती दीनवाणें झालें

आहे हें या कवितेच्या ओळीओळींतून प्रत्ययाला येईल. हें पूर्ण नैराश्य असतें तरी बरें झालें असतें. पण क्षणांत स्मित करणारी आणि क्षणात रुसणारी प्रेयसी हा जीव घेणारा लपंडाव खेळत आहे. या कवितेंतून कांही गूढ गोष्टींचा उलगडा होईल.

लाजुनि अजुनी स्वजना हा जन जवळीं कां नच केला ?

हा प्रश्न सहज डावलण्यासारखा नाही. ज्या रमणीला गडकऱ्यानी मागणी घातली होती ( –होय, गडकऱ्यानी तिला स्पष्ट शब्दात मागणी घातली होती याविषयीं मिळालेल्या माहितीवरून माझी खात्री झालेली आहे ! )—–तिच्याकडून प्रत्युत्तराची वाट बघत गडकरी होय–नाहीच्या झोपाळ्यावर हेलकावे खात आहेत. अजून त्या मुलीच्या मनाचीहि चल-बिचल चाललेली असावी, किंवा घरातील वडीलधाऱ्या माणसाचा या संबंधाला अनेक कारणामुळे तीव्र विरोध असावा. आणि असा विरोध असला तर त्यात असंभाव्य असें काहीहि नाही. ज्या मुलीची विनवणी गडकरी या कवितेंत करीत आहेत ती पुष्कळच देखणी असली पाहिजे— नव्हे, होती ! तिच्या घराण्यात परपरेने चालत आलेला खानदानीपणाहि असावा. सौंदर्याच्या जोडीला कुळाच्या इतमामाची भर पडली असेल तर तिच्या नातेवाइकाना गडकऱ्याशीं येऊ पाहणारा तिचा हा संबध आवडला नसला तर त्यात काहीही आश्चर्य नाही. आणि यामुळेच

लाजुनि अजुनी स्वजना हा जन जवळीं का नच केला ?

असा प्रश्न गडकऱ्याना विचारावा लागला आहे. घरातल्या माणसाचा या संबंधाला विरोध होता हें नक्की. पण तिचे स्वतःचें याबाबतींत काय मत होतें ? तिने अजून तरी स्पष्ट नकार दिलेला दिसत नाही. तिच्या बोलण्यात अजून संदिग्धता दिसत आहे. त्याच्या विनवणीला ती विनोदाने हसून काही तरी गुळमुळीत उत्तर देत असावी असें दिसतें

प्रत्युत्तर दे प्रश्ना काहीं; अत वृथा न पहावा,<br>
विनोदवचनीं थावविं नच त्या, प्रश्नें परतावि नच वा !

तिचे क्षणांत हसणें आणि क्षणात रुसणें कांही वेळ बरें वाटलें, पण त्याचा अतिरेक होऊन संशयग्रस्ततेचे काहूर दाटूं लागल्यावर तो क्रूरपणा आहे असे गडकऱ्यांना वाटूं लागलें आहे.

सुंदर वदनी तव निर्दयता हृदय विदारित माझें,
पडुं दे श्रवणी ती शुभ वाणी मौन न हे तुज साजे!

अशा प्रकार निर्वाणीची विनवणी करीत असताच तिच्या सहवासाची पराकाष्ठेची आतुर उत्कंठा अगदी स्पष्टपणें गडकऱ्यानी प्रकट केली आहे.

संशयविष हे जाळित जीवा अधरसुधा दे रमणि!

'गोविन्दाग्रजां'च्या प्रेमविषयक कल्पनेंत वैषयिक प्रेमाची छटा स्पष्ट दिसते अशी तक्रार डॉ. हर्षे यानी केल्याचें[११] मागे नमूद केलेच आहे. आता **निर्वाणीची विनवणी** या प्रस्तुत कवितेच्या बाबतींत ते काय शेरा मारतात तें पाहण्यासारखें आहे. "आपल्या दयितेची 'निर्वाणीची विनवणी' करीत असताना 'चुम्बन दे रमणी' याच्या पलीकडे ज्याच्या हेतूची मजल जाऊं शकत नाहीं त्याच्या शुद्ध प्रेमाचा कोणाला विश्वास येणार आहे?" निर्वाणीची विनवणी करीत असता प्रेयसीजवळ चुंबनाची याचना केल्याबद्दल डॉ. महाशयाचा कवीवर घुस्सा झाला आहे, व त्याचें प्रेम 'शुद्ध' नसल्याबद्दल त्यानी तक्रार केली आहे.[१२] 'शुद्ध' व निष्काम प्रेमाचा येळकोट व्यवहारी जगांत कसा होतो, आणि खुद्द गडकऱ्याच्या बाबतींत तो कसा सुरू झाला व शेवटी त्याची कड कशी पोचली याचें वर्णन मागे विस्ताराने केलेलें आहेच. शुद्ध व निष्काम प्रेमाच्या विरळ स्वप्नसृष्टींतून गडकरी जेव्हा भावनोद्रेकाने भारलेल्या सत्यसृष्टींत उतरले तेव्हा सहज–मूलभूत–प्रवृत्तींनी त्याच्या मनाचा पूर्ण कबजा घेतला. आणि प्रेयसीची प्राप्ति झाली नाही तरी मनाची समता ढळूं देणें युक्त नाही असें मानणाऱ्या गडकऱ्यांच्या मनाला उत्कट शारीरिक अभिलाषेने ग्रासून टाकलें. आणि यांत अस्वाभाविक असें कांहीहि नाही. प्रेयसीच्या प्राप्तीसाठी तळमळणारें गडकऱ्यांचें मन वरील **निर्वाणीची विनवणी** ही कविता

लिहिण्याच्या काळीं सर्वस्वीं वासनांच्या, शारीर अभिलाषांच्या, आहारीं गेलेलें होतें आणि आपल्या मनातील या साऱ्या भावना गडकऱ्यांनी अगदी प्रामाणिकपणें व्यक्त केल्या आहेत हेंच त्यांचें महत्त्वाचें वैशिष्ट्य होय. आता त्याच्या मनाची अशी कांही विचित्र अवस्था झाली आहे की, प्रेयसीविषयींची शारीर अभिलाषा उफाळून आल्याखेरीज राहणेंच शक्य नाही. आणि या मोहवशतेच्या क्षणींच, नैराश्याची भीति क्षितिजावर तरळत असताच त्यानी प्रेयसीच्या चुंबनाची लालसा प्रकट केली आहे. यात डॉ. हर्षे याना जी वैषयिकतेची छटा दिसत आहे ती खरीच आहे. वैषयिकता येथे निश्चितपणें प्रकट झालेली आहे. डॉ. महाशयाना ती आक्षेपार्ह वाटते व ते नाक मुरडतात. तथापि यात आक्षेपार्ह काहीहि नसून नाक मुरडण्याचें मुळीच कारण नाही. भावनावश मनाच्या उत्कटतेचा तो अगदी स्वाभाविक परिपाक आहे.[१३] अनेक दिवस प्रेयसीच्या ठायीं साऱ्या चित्तवृत्ति केंद्रित करून ठेवल्यानतर व तिच्या प्राप्तीची आशा निर्माण झाल्यानतर आणि संशयग्रस्ततेच्या धुक्यात काही दिवस घोटाळल्यावर मग आशेचा भग झाला असता भावनाप्रधान हळव्या मनाची अशी अवस्था होणे अगदी स्वाभाविक आहे. आणि निराशेचें भय मनाला सतत ग्रासून टाकीत असताहि पुन्हा कदाचित् आपल्या आकाक्षा सफल होतील ही आशा पल्लवित होणेंहि स्वाभाविकच आहे. अशी आशा पल्लवित झाली असता प्रेयसीविषयक शारीरिक अभिलाषा उफाळून आली तर त्यात अनैसर्गिक असें काहीहि नसून दडपून टाकलेल्या भावनाचा तो अपरिहार्य परिणाम आहे असें समजावे. हा अभिलाष 'शुद्ध' प्रेमाच्या उपासनेंत दंग झालेल्या निष्काम प्रेमयोग्याचा भावनाविष्कार नसून प्रेयसीची संपूर्ण प्राप्ति व्हावी यासाठी आसावलेल्या, तिच्या सानिध्यात रहावयास सापडावें म्हणून तळमळणाऱ्या, तिच्या स्पर्शसुखासाठी अधीर झालेल्या प्रेमाची ती आर्त हाक आहे. या हाकेत अनैसर्गिक व त्याज्य असें कांहीच नाही. मानवी जीवन ज्यायोगें सफल व परिपूर्ण होत असतें अशाच गोष्टींपैकी ही एक आहे. प्रेयसीच्या स्पर्शसुखाची तळमळ लागणें ही गोष्ट अनुदात्त व हीन आहे, व त्यायोगे खऱ्या प्रेमात उणीव निर्माण होते अशी कल्पना झाल्यामुळेच डॉ. हर्षे यानी या

कवितेंतील ‘ अधरसुधा दे रमणि ’ या शब्दांवर आक्षेप घेतलेला आहे हें अगदी उघड आहे. परंतु स्त्रीपुरुषांमधील प्रेम उत्कटतेच्या परिसीमेला पोंचलें की तेथे परस्पराच्या शारीरिक स्पर्शाची व अत्यंत निकट सांनिध्याची अनावर व असह्य लालसा निर्माण झालीच पाहिजे. या लालसेमुळे प्रेमाच्या स्पृहणीयतेंत कसलाहि बाध येत नाही; उलट तें अधिक उत्कट बनत असतें. स्त्रीपुरुषांचें आत्यंतिक शारीरिक मीलन हा त्यांच्यामधील मानसिक प्रेमाचा परमोच्च प्रकर्ष असून हा प्रकर्ष जर साधला नाही तरच प्रेमपूर्तींत कांही तरी उणीव राहिली असें म्हणावें लागेल. १८१९ मध्ये प्रेमाच्या आशानिराशाच्या लाटांवर हेलकावे खाणाऱ्या कीट्सच्या आत्यंतिक उत्कट भावनांचें उत्कृष्ट प्रतिबिंब ज्यांत पडलेलें आहे असें एक सॉनेट उपलब्ध आहे. हें सॉनेट कीट्सने आपली प्रेयसी फॅनी ब्रॉन् हिला उद्देशून लिहिलेलें आहे. गडकऱ्यांच्या निर्वाणीची विनवणी या कवितेत भावनांचें ज्या प्रकारचें उत्कट आविष्करण आहे त्याच प्रकारचें भावनाविष्करण कीट्सच्या या सॉनेटमध्येहि आढळेल. भावनाविष्काराची जात तीच आहे, उत्कटतेंत फार तर थोडा फरक असेल. परिसीमेला पोंचलेल्या प्रणयभावनेंतील रसरसलेली उत्कटता कशी अनावर असते हें पाहावयाचें असेल तर गडकऱ्यांच्या कवितेच्या जोडीला कीट्सचें पुढील सॉनेट अवश्य वाचावें.

I cry your mercy—pity—love! -aye, love!
Merciful love that tantalises not,
One-thoughted, never-wandering, guileless love,
Unmask'd, and being seen-without a blot!
O! let me have thee whole,-all-all-be mine!
That shape, that fairness, that sweet minor zest,
Of love, your kiss,-those hands, those eyes divine,
That warm, white, lucent, million-pleasured breast,—
Yourself-your soul-in pity give me all,
Withold no atom's atom or I die,

Or living on perhaps, your wretched thrall,
Forget in the mist of idle misery,
Life's purposes,—the palate of my mind
Losing its gust, and my ambition blind!

• कीट्सच्या सॉनेटमधील I cry your mercy हे सुरवातीचे शब्द, व गडकऱ्यांच्या कवितेतील 'पाहसि आतां अंत असा कां?' हे सुरवातीचे शब्द यांमध्ये व्यक्त होणारी भावना एकाच जातीची आहे. 'अधरसुधा दे रमणि' या गडकऱ्याच्या शब्दांत जी शारीरिक अभिलाषा व्यक्त झालेली आहे तिच्यापेक्षा कीट्सच्या सॉनेटमधील शारीरिक अभिलाषा दसपटींनी अधिक आतुर व उत्कट आहे हें कोणासहि सहज दिसून येईल. हृदयांत ज्या भावनांचा अनावर उद्रेक झाला होता त्या भावना जशाच्या तशा कीट्सने आपल्या या सॉनेटमध्ये ओतल्या आहेत; आणि गडकऱ्यानीहि नेमकें हेंच केलें आहे. तथापि शारीरिक अभिलाषेच्या आविष्कारामुळे या दोन्ही कावितांतील प्रणय-भावनेचें स्वरूप कलंकित व हिणकस झालें आहे असें समजण्याचें मुळीच कारण नाही.

निर्वाणीची विनवणी ही कविता लिहिल्यानंतर बरोबर एका आठवड्यांतच ९ मार्च १९१६ रोजीं गडकऱ्यांनी हृदयास ही कविता लिहिली. या आठवड्यांत गडकऱ्यांच्या मनाचा कांहीतरी विलक्षण निर्धार झालेला असला पाहिजे. संशय नष्ट होऊन नैराश्य हें सत्य ठरल्यावर त्यांच्या हृदयांत वैतागाच्या ज्या तीव्र भावना निर्माण झाल्या त्यांचें आविष्करण अगदी स्पष्टपणें या कवितेंत झालेलें आहे. जोंपर्यंत संशय-ग्रस्ततेची अवस्था होती व आशा करण्यास जागा होती तोंपर्यंतच प्रेयसीची निर्वाणीची विनवणी करण्यांत कांही सौरस्य होतें. शेवटच्या आशेची शेवटची तिरीपहि निराशेच्या भयाण अंधकारांत विलीन होऊन गेल्यावर विनवणी कोणाची करावयाची व कशासाठी करावयाची? अनेक

वर्षे असंख्य आघात सोसून अतिशय दुखावलेल्या व हळुवार बनलेल्या मनाच्या सोशिकपणाचा अंत ज्यायोगें होईल असलें जहरी नैराश्य कसला विलक्षण परिणाम करूं शकतें, व त्यामुळे भावनांच्या साऱ्या कोमलपणाचा चक्काचूर होऊन केवढा कडवटपणा मनांत निर्माण होतो हें **हृदयास** या कवितेंत दिसून येईल. एक आठवड्यापूर्वींच लिहिलेल्या **निर्वाणीची विनवणी** या कवितेंतील भावनाविष्कार जितका प्रामाणिक होता तितकाच प्रामाणिक भावनाविष्कार या कवितेंतहि झालेला आहे. निर्वाणीच्या विनवणींत वेड्या आशेच्या अनावर ओढीमुळे उत्पन्न झालेली हळवी लीनता असली तर या कवितेंत असह्य नैराश्यामुळे भ्रमिष्ट व उद्विग्न बनलेल्या, दुखावलेल्या मनातील कडवटपणाचा डंख आहे. गेल्या साठ वर्षांत प्रणयनैराश्याची व्यथा व्यक्त करणाऱ्या अनेक कविता मराठींत लिहिल्या गेल्या आहेत. परंतु या काळात गडकऱ्यांनी लिहिलेल्या नैराश्याच्या काही कवितात जो विलक्षण कडवटपणा आढळून येतो तसा कडवटपणा अन्यत्र क्वचितच आढळेल. यामुळे **हृदयास** ही कविता व तिच्या आसपास गडकऱ्यानी लिहिलेल्या आणखी काही कविता मराठींत तरी भावनांच्या कटुतेसाठी संस्मरणीय ठरतील अशाच आहेत. **हृदयास** ही कविता तर खरोखरच विलक्षण आहे. इतके दिवस प्रेम प्रेम म्हणून ज्याच्यामागे आपण लागलों होतों ते खरें प्रेम नसून प्रेमाचें हिडिस सोंग होते, आणि या नटव्या व ढोंगी प्रेमाने आपल्या उत्कट भावनाचे अक्षरशः धिंडवडे काढले अशी गडकऱ्यांनी तक्रार केली असून असल्या या बेगडी प्रेमाचा मोह ताबडतोब सोडून देण्यावाचून गत्यंतर नाही असें त्यांनी आपल्या हृदयास बजावलें आहे. निर्वाणीची विनवणी करणारें हळुवार मन या कवितेंत दगडाप्रमाणें कठोर झालेलें दिसून येईल, फुलाच्या नाजूकपणाची जागा तरवारीच्या धारेने घेतलेली दिसून येईल, ‘ सतारीची सुरेल गोडी ’ नष्ट होऊन तिच्याऐवजी ‘ रणवाद्यांची भीषणता ’ प्रतीत होईल, ‘ तलावाच्या पाणभुईवर अग्निरसाचा तवंग ’ पसरल्यासारखें वाटेल.

क्रमाक्रमानें नैराश्याचे कडे तयावरतीं,
कोसळले कितितरि, कोमलता होईना कमती ! ....
नव्या दमाची कोमलताही तशीच का राही ?
नैराश्याच्या दगडासम ती कठिण का न होई ?

असे प्रश्न पूर्वी गडकऱ्यांनी भयाण एकान्त या कवितेंत विचारले होते. आपलें मन दगडासारखें कठोर का होत नाही असा प्रश्न विचारण्याची त्यांना आता जरूर नाही. तें मन आता दगडापेक्षाहि अधिक कठोर व तरवारीच्या पात्यापेक्षाहि अधिक तिखट झालें आहे. गडकऱ्यांची या वेळची मनोवृत्ति किती विलक्षण चमत्कारिक बनली होती हें पाहणें आवश्यक असल्यामुळे हृदयास ही कविता समग्र उद्धृत करण्यावाचून गत्यंतर नाही.

जिवलग हृदया ! मूढ वृत्ति हा धारण केली का असली ?
लाथ मार त्या चंचल जगता, प्रेमाची मोगे कसलीं !
चंचल, लहरी, रंग बेगडी सुंदरतेच्या मोहाने
का वाटेवर पडसी, हृदया ! विकुनी कवडीमोलाने ?
तुझ्या जिवाच्या बोलापाठी हपापले हे रसिक पहा
स्वागत करिं जा त्याचें, त्याना हर्ष किती होईल अहा !
नटव्या सोंगामागें लागे जें त्या सौंदर्यासाठी
नवलाखाचे मोल देसि का ? कशास या आटाआटी ?
जिथे गुणाची चाड न काही कमअस्सल जे जातीचे
सौंदर्यचि तें कसलें ? केवळ एक बाहुले मातीचे !
विद्यावैभव कुठे तुझे, तो ज्ञानाचा गौरव कोठे ?
आणि कुठे रंगीत खेळणे ? नवल खरोखरि हे मोठें !
उदारता तव विशाल पाहुनि देवालाही मोह सुटे
आणिक असलें खोटें नाटे नकली नाणे सांग कुठें ?
गर्वाचें घर खालीं पडुनी खुशाल मिळुं दे मातीत
रसिकाच्या मृदुहृदयमंदिरी रहा, निजयशा मिरवीत.
चितारडसी कां चित्र जिवाचे पाण्यावरच्या रेघानीं ?
'गोविंदाग्रज' सांगे तुजला रहा त्याहुनी स्वस्थानीं !

(शेवटची ओळ वाचल्याबरोबर १९०९ सालीं गडकऱ्यांनी लिहिलेल्या अखंड प्रेमास या कवितेंतील पुढील ओळींची स्मृति होणें अपरिहार्य आहे.

म्हणुनि लाडक्या ! कुठे न जाई,
या हृदयाताचिं लपुनी राही,
योग्य मित्र नच सुख तरि नाही !......)

प्रेमसाफल्याची रंगीत स्वप्नसृष्टि कल्पनेने निर्माण करून तिच्यांत दंग होऊन राहिलेल्या, अमर्याद इच्छा करणाऱ्या मनाला प्रणयभंगाचा असह्य धक्का बसण्यामुळे निर्माण झालेला हा विलक्षण वैताग आहे. ही विलक्षण चीड आहे. निर्वाणीची विनवणी लिहिल्यावर लगेच केव्हा तरी गडकऱ्यांनी प्रेमाच्या बाबतींतील आपल्या नशिबाची अखेरची पारख करण्याचें, सारा सोक्षमोक्ष करून टाकण्याचें ठरविलें असलें पाहिजे. संशयाचें धुकें नाहीसें होऊन काही तरी निर्णय झाला म्हणजे मनाची तगमग थांबेल या वेड्या कल्पनेने गडकऱ्यांनी आपल्या प्रेयसीला निर्वाणीचें साकडे घातलें असलें पाहिजे. नातेवाइकांच्या भीतीमुळेच ही केवळ आपल्या प्रेमयाचनेला रुकार देत नसावी अशी कल्पना गडकऱ्यांनी निर्वाणीची विनवणी या कवितेंत व्यक्त केली आहे, तिला आपला कांही कारणामुळे तिरस्कार वाटतो की काय अशीहि शंका त्यांच्या मनांत तरळून गेली आहे. पण आता या साऱ्या संशयांचें पूर्णपणें निरसन झालें आहे. तिने त्याना स्पष्ट शब्दांत नकार दिला आहे यांत कसलीच शंका नाही. तिच्या या नकाराचीं कारणें कोणतीं असतील याविषयीं फार तर कांही तर्क आपल्याला करता येईल. पण खरीं कारणें तिलाच माहीत ! तें काहीहि असो. गडकऱ्यानी केलेल्या निर्वाणीच्या याचनेला तिने नकार दिला—अगदी स्पष्टपणें नकार दिला, हें मात्र निश्चित. संदेहाची अवस्था नष्ट होऊन कांही तरी निर्णय व्हावा असें गडकऱ्यांना कितीहि वाटत असलें तरी प्रेयसीने आपल्या आशेची पूर्ति करावी याच उत्कंठेने त्यांचें मन भारून टाकलेलें होतें. तिचा नकार पतकरण्याची त्याची तयारी असणें शक्यच नव्हतें. मागे एकदा नैराश्याच्या व्यथा सोसाव्या लागल्या असतां पुन्हा प्रेम करणें बरें आहे का? त्यापेक्षा

निर्माण झालेली प्रेमभावना तावडतोब मुळापासून उखडून टाकलेलीच बरी नाही का ? पुढे निराशा सोसण्यापेक्षा आताच मनाची तयारी करून प्रेम-भावनेचा उदयच मनांत होऊं नये अशी व्यवस्था करणेंच बरें नाही काय ? इत्यादि प्रश्नांनी या प्रेमाच्या जाळ्यांत गुरफटण्यापूर्वी गडकऱ्यांच्या मनांत थैमान घातलेलें होतें याला भयाण एकान्त या कवितेंत अगदी स्पष्ट पुरावा आहे.

> नव्या दमाची कोमलताही तशीच का राही ?
> नैराश्याच्या दगडासम ती कठिण का न होई ? . . . .
> जरा कुठेसें कोमलतेहुनि हृदय होइ दूर
> तोंच कशाला प्रेमाची ही लागे हुरहूर ?
> दु:खामागुनि दु:ख भोगुनी मन फत्तर बनता
> कधीच मेले प्रेम, पुन्हा ते निपजे का आतां ? ...
> प्रेमाची एकदा पुरी जी झाली मनिं होळी,
> विसरावी ती घ्यावी किंवा कायमची झोळी ? ...

एकदा प्रेमनिराशा झाली असतां पुन्हा प्रेम करावें कीं न करावें ? पुन्हा निराशा झाली तर ती कशी सहन करता येईल ? इत्यादि विचार पोळलेल्या मनाला संत्रस्त करून सोडतात. पण नैराश्याच्या यातना कितीहि तीव्र असल्या तरी 'कशाभोंवतीं तरि गुंगावें हा हृदयाचा धर्म' असतो असें गडकऱ्यांनीच भयाण एकान्त या वर उल्लेखिलेल्या कवितेंत सांगितलें आहे; आणि गडकऱ्यांचें हें म्हणणें अगदी बरोबर आहे. कोणावर तरी प्रेम करावें व त्या व्यक्तीने सुद्धा उलट आपल्यावर प्रेम करावें अशी आतुरता प्रत्येकाच्या ठायीं असतें; इतकेंच नाही तर एकदा केलेल्या प्रेमाची निराशा झाल्यावर सुद्धा मनुष्य पुन्हा प्रेमसाफल्याच्या आशेच्या मागे वेड्यासारखा धावत सुटतो, व नैराश्याचे आघात सोसूनहि पुन्हा नवीन प्रेमाच्या जाणिवेने त्याचें मन मोहरून जात असतें; आणि हें नवीन प्रेम पहिल्या प्रेमाइतकेंच, किंबहुना कांही वेळां तर अधिक उत्कट असूं शकतें हेंहि तितकेंच खरें आहे. मनुष्य फक्त एकदाच प्रेम करूं शकतो ही कांही भावनावश कवींनी

प्रसृत केलेली कल्पना मुळांतच अत्यंत चुकीची आहे. गडकऱ्यांना या गोष्टीची चांगली जाणीव होती हें त्यांच्या पुनर्जात प्रेमास या कवितेवरून स्पष्ट दिसून येतें. एकदा मेलेलें प्रेम पुन्हा जागृत होत नाही ही आपली कल्पना चुकीची असून भावनांचा सागर एकदा हेलावला म्हणजे तो कोंडून धरता येत नाही, भरतीची लाट परतवून लावता येत नाही, अशी कबुली देऊन गडकरी पुनर्जात प्रेमास या कवितेंत म्हणतात–

क्षणभर वाटत होतें मजला,<br>
कीं तव ओघ आटुनि गेला<br>
परि जो अखंड भरला त्याला<br>
कशाची तूट––चल उघड झाकली मूठ !

प्रेमाखातर या कवितेवर स्वत: गडकऱ्यांनी जी प्रास्ताविक टीप जोडली आहे तिच्यांत प्रेमनैराश्यानंतर पुन्हा प्रेमाचा आधार सापडला असतां मनुष्याला संजीवन लाभतें असें ते स्पष्ट म्हणतात.

"प्रेमनिराशेमुळें हेतुशून्य व हताश झालेल्या मनुष्याला पुन्हा प्रेमाचा आधार सापडला म्हणजे नवा जीव लाभतो."

इतकेंच नाहीं तर निराशेतून जन्मलेल्या प्रेमाची महती कांही विलक्षणच असते असेंहि ते या कवितेंत म्हणत आहेत.

तशात हें तर निराशेतुनी प्रेम जन्मलेलें !

गीतविरक्ति या कवितेंतील "'गोविंदाग्रज' सहजचि कवनें जाळि निराशा खर दाहीं" या ओळींत नैराश्याची जी प्रतीति भरलेली आहे तिच्यानंतर मनात पुन्हा प्रेमाची आशा पल्लवित होऊन ती वृद्धिंगत होण्यासारखी अनुकूल परिस्थिति निर्माण झाल्यावर, व आपल्या प्रेमाचें साफल्य होणार अशी जवळ जवळ खात्री झाल्यावर मग त्या आशेचा चुराडा होऊन पुन्हा प्रेमभगाची दारुण व्यथा भोगण्याचें नशिबीं येणें ही गडकऱ्याच्या प्रणयजीवनातील विविध आंदोलनें नीट लक्षात घेतलीं तरच हृदयास या कवितेंत स्पष्टपणें प्रकट झालेल्या विलक्षण वैतागाचें, चिडीचें,

संतापाचें व कडवटपणाचे नेमकें मर्म कळून येईल. गीताविरक्ति ही कविता १९१५ च्या नोव्हेंबरमध्ये प्रसिद्ध झाली आणि हृदयास ही कविता ९ मार्च १९१६ रोजीं लिहिलेली आहे. म्हणजे सुमारें दीड वर्षाच्या अवधींतील हीं आंदोलनें आहेत. आता या प्रेमाच्या वाटेला जावयाचें नाही व नैराश्याचें दुःख पतकरावयाचें नाही असा कितीहि निर्धार केला तरी मानवी मनाची ग्वाही कोणाला देता येईल ? तें पुन्हा प्रेम करूं लागतें— अगदी उत्कट प्रेम करूं लागतें. या पुनर्जात प्रेमाचें साफल्य झालें तर जीवन समृद्ध झालेंच यांत शंका नाही. पण तसें साफल्य झाले नाही तर मात्र होणाऱ्या वेदनांच्या असह्यतेला तोड नसते. आणि या वेदनांची दारुणता व भीषणता या गोष्टी शिगेला पोचल्या म्हणजे थोडा वेळ का होईना विलक्षण कडवटपणा निर्माण होणारच. हें सारें मानवी भावनांना अनुसरूनच आहे. आणि हाच अनावर कडवटपणा आपल्याला हृदयास या कवितेंत अगदी ओतप्रोत भरलेला दिसून येत आहे. ज्या सौंदर्याच्या मागे इतके दिवस आपण वेड्यासारखे धावलों ते सौंदर्य नकली व बेगडी असून एखाद्या रंगीत खेळण्यापलीकडे त्याची मुळीच किंमत नाही; हें सारे जग चंचलतेने भरलेलें असून या जगातील प्रेमसुद्धा तितकेंच चंचल व लहरी आहे; नटव्या सोंगामागे धावणाऱ्या असल्या या बेगडी सौंदर्यासाठी व लहरी प्रेमासाठी आपलें स्वतःचें बहुमोल आयुष्य कां बरबाद करून घ्यावें ? आणि पाण्यावर रेघोट्या ओढण्याचा व्यर्थ प्रयत्न करून आपल्या मनाची वंचना कां करावी ? असे प्रश्न विचारण्याची पाळी ज्या भावनाप्रधान माणसावर येते तो आपल्या यातनांची कटुता कोणत्या तरी प्रकाराने प्रकट करणारच. त्यांत अस्वाभाविक असें कांहीहि नाही. आपली प्रतिभा अलौकिक असून आपल्या कविता व आपलीं नाटकें हजारो रसिकांच्या हृदयाचें रंजन करावयास समर्थ असतां, व ते रसिकहि आपल्या कलाकृतींचें स्वागत करण्यास सदैव सज्ज असतां, कलानिर्मितीचा व रसिकरंजनाचा आनंद लुटावयाचा सोडून देऊन एका सुंदर बाहुलीच्या पायांत आपण घोटाळत राहिलों व मनाच्या चिंधड्या करून टाकल्या, सारें आयुष्य वाया घालवावयाचें ठरवलें ! आणि हें सारें कशासाठी ? चंचल, लहरी व दिखाऊ प्रेमासाठी !

हे विचार मनांत येतांच गडकऱ्यांच्या मनाला असंख्य इंगळ्या डसल्या असतील.

> तुझ्या जिवाच्या बोलापाठीं हपापले हे रसिक पहा
> स्वागत करिं जा त्याचें, त्यांना हर्ष किती होईल अहा !

आपल्या प्रतिभेविषयीं गडकऱ्यांना जो आत्मविश्वास वाटत होता तो या ओळींत प्रकट झाला आहे. आपल्या कविता, आपलें विनोदी लेखन, व आपलीं नाटकें यांच्या प्रभावामुळे रसिकाचीं मनें भारलीं गेलीं आहेत व आपल्यावर ते निहायत खूष आहेत हें गडकऱ्यांना चांगलें माहीत होतें. आपल्या वाङ्मयाने भारलेल्या व आपल्या एका शब्दासाठी हपापलेल्या रसिकाकडे लक्ष देण्याचें सोडून एका भावनाशून्य मुलीच्या बेगडी सौंदर्याच्या व लहरी, उसन्या प्रेमाच्या मागे आपण लागलो व आपल्या जीवितकार्याकडे, आपल्या कलेकडे, आपण विनाकारणच दुर्लक्ष केले अशी कल्पना निराशेच्या उत्कट क्षणीं गडकऱ्यांच्या चित्तात प्रबळ झाली असेल, व त्या आवेगांत त्यांनी या ओळी लिहिल्या असतील. असल्याच आवेगाचा भर अनावर झाला असतां

> I have offended reputation,
> A most unnoble swerving.

असे उद्‌गार शेक्स्पियरच्या ॲटनीने काढले होते.[१४]

आपल्या ठिकाणीं असलेल्या अनेक गुणांची चाड आपल्या प्रेयसीला नाही अशी स्पष्ट तक्रार गडकऱ्यांनी या कवितेंत केली आहे.[१५] विद्यावैभव, ज्ञानाचा गौरव, उदारता इत्यादि गोष्टींचें तिला कांहीच महत्त्व वाटत नसल्यामुळे केवळ वैभवाच्या नटव्या सोंगामागे लागणारें सौंदर्य जातीचें 'कमअस्सल' असलें पाहिजे असा गडकऱ्यांनी आपला संताप व्यक्त केला आहे.

जिथें गुणाची चाड न कांहीं कमअस्सल जें जातीचें
सौंदर्याचि ते कसले ? केवळ एक बाहुले मातीचें !
विद्यावैभव कुठे तुझे, तो ज्ञानाचा गौरव कोठें ?
आणि कुठें रगीत खेळणे ? ...
उदारता तव विशाल पाहुनि देवालाही मोह सुटे
आणिक असलें खोटे नाटें नकली नाणें सांग कुठें ?

उदारतेचा उल्लेख गडकऱ्यानी **निर्दय बालेस** या कवितेंत पुन्हा एकदा केला आहे.

प्रेयसीला आपल्या गुणांची चाड नसून केवळ पैशाच्या लोभाने तिने आपल्याला झिडकारलें आहे अशी मनाची क्षणैक खात्री होऊन संतापाच्या भरांत 'बेगडी सुदरता,' 'चंचल,' 'लहरी,' 'कमअस्सल,' 'मातीचें बाहुलें,' 'रगीत खेळणे,' 'नकली नाणें' इत्यादि शेलके शब्द वापरले तरी गडकऱ्याचें समाधान झालेलें दिसत नाही. आपली अशी अवहेलना करणाऱ्या भावनाशून्य, निष्ठुर मुलीला यातना सोसाव्या लागल्या पाहिजेत असा आशयहि 'गर्वाचे घर खालीं पडुनी खुशाल मिळुं दे मातींत ' या ओळींत प्रकट झालेला आहे. आत्यंतिक निराशेच्या पोटीं क्षणमात्र निर्माण झालेली ही तितकीच आत्यतिक कटुता आहे हें लक्षात घेतलें असतां आपल्या मनांतील भावना अशा उद्वेगाने प्रकट करणाऱ्या कवीला क्षमा करावी असेंच आपणास वाटेल. ही उद्वेगाची भावना क्षणिक आहे हें अवघ्या पंधरा दिवसानंतर गडकऱ्यांनी लिहिलेल्या **एका शब्दासाठीं विनती** या कवितेंवरून कोणासहि स्पष्टपणें दिसून येईल.

**हृदयास** या कवितेंत प्रकट झालेल्या पराकाष्ठेच्या कडवटपणाची पूर्वपीठिका स्पष्ट करून त्याचें स्वरुपहि वर विस्ताराने विशद केलें आहे. आता डॉ. हर्षे यांनी या कवितेंतील भावनाविष्कारावर जी टीका केली आहे तिचा विचार करूं. डॉ. हर्षे म्हणतात[१६]—

" निर्दय बालेकडून वंचना झालेली पाहून त्यानीं त्वेषभराने आपल्या 'हृदयास' जो उपदेश केला आहे तो साहजिक असला तरी पूर्व-

ग्रहदूषित आहे व त्यांत व्यक्त होणारा अहंभाव एकवेळ यथार्थ मानिला तरी तो व्यक्त करून दाखविणें अनुचित होय. प्रियकरणीनें परित्याग केला म्हणून तिला ' कम-अस्सल ' म्हणणें शिष्टाचारास तर सोडूनच आहे, परंतु खऱ्या प्रेमाला तें शोभत नाहीं. एकदा प्रेम केलें कीं तें शेवटपर्यंत तसेंच कायम राहिलें पाहिजे तरच तें खरें प्रेम होय ...... एकदा जिच्यावर आपण प्रेम केलें तिच्यासंबंधीं हा अनादर व्यक्त करणें हें प्रियकराचें कर्तव्य नव्हे. ती ध्येयच्युत झाली म्हणून त्यानेंहि ध्येयच्युत व्हावें असें नाहीं. शिवाय प्रेमाला शंभर गुन्हे माफ असतात; म्हणून ' गर्वाचें घर खालीं पडुनी खुशाल मिळुं दे मातींत ' ही भाषा त्याचें तोंडीं शोभत नाहीं. "

डॉ. हर्षे यांनी गडकऱ्याच्या प्रेमगीतांचा कालानुक्रमाने सूक्ष्म अभ्यास केला असता, व त्याच्या प्रेमविषयक भावनांतील स्थित्यंतरें लक्षांत घेतलीं असतीं तर हृदयास या कवितेंतील आत्यंतिक उद्वेगाचें व कडवटपणाचें मर्म त्यांना समजलें असतें. हा उद्वेग किंवा हा कडवटपणा गडकऱ्यांच्या या वेळच्या मनःस्थितीचा सहानुभूतीने विचार केला तर अगदी स्वाभाविक आहे असेंच दिसून येईल. शिवाय अतिरिक्त कडवटपणाची ही भावना फारच थोडा वेळ टिकली, थोड्याच दिवसांत मृदु भावनांनी गडकऱ्यांच्या मनाचा पुन्हा ताबा घेतला, त्यांचा कठोरपणा नाहीसा झाला व पुन्हा प्रेयसीची समजूत घालण्याचा, व कटु शब्द बोलून तिचें मन दुखवल्याबद्दल तिची क्षमा मागण्याचाहि विचार त्याच्या मनांत प्रबळ झाला ही गोष्ट लक्षांत घेतली असतां या कवितेंतील वैतागाच्या प्रदर्शनाबद्दल त्यांच्यावर रागावण्याचें कांही कारण आहे असें मला तरी वाटत नाही. आपल्या हृदयास गडकऱ्यांनी केलेला उपदेश ' साहजिक ' आहे अशी कबुली डॉ. हर्षे यांनीहि नकळत देऊन टाकलीच आहे. फक्त तो उपदेश ' पूर्वग्रहदूषित ' आहे इतकीच त्यांची तक्रार उरली. पण प्रेमभंगाची दारुण व्यथा सहन करणें ज्याच्या नशिबीं आलें आहे अशा भावनाप्रधान व हळव्या माणसाने आपल्या दुखावलेल्या भावनांचा आविष्कार कितीहि

संयम राखून केला तरी तो पूर्वग्रहदूषित असणारच ! प्रेमसाफल्याच्या बाबतींत अमर्याद इच्छा करणारें निराश मन म्हणजे कांही निर्गुण, निर्लेप, निरंजन परब्रह्म नव्हे ! प्रेमभावनांची उत्कटता अगदी परिसीमेला पोचली असतां व प्रिय व्यक्तीच्या प्राप्तीच्या कल्पनेने मन अंतर्बाह्य व्यापून टाकलें असता, आणि प्रेमसाफल्य निश्चयाने होईल अशी आशा वाटण्यासारखी अनकूल परिस्थिति निर्माण झाली असता, प्रेयसीने आपली जाणूनबुजून वंचना केली अशी नुसती शंका आल्याबरोबर रसरसलेल्या भावनानी ओतप्रोत भरलेलें मन क्षणिक आवेगाने भ्रमिष्टासारखें झालें व जिने वंचना केली तिच्याविषयींच्या पूर्वींच्या कोमल प्रणयभावनाचे कांही काळ तरी संतापात किंवा द्वेषात रूपातर झाले तर त्यात अस्वाभाविक असें कांहीहि नाही. किंबहुना हेंच नैसर्गिक होय ![१७] संशयकल्लोळांतील आश्विनशेट ' कुठंहि खुशाल ऐस ' असे रेवतीचा शेवटचा निरोप घेताना म्हणतो. तसें कांही तरी गडकऱ्यानी या कवितेत म्हटले असते तर डॉ. हर्षे यांचें समाधान झाले असतें असें वाटतें. पण या प्रकरणीं एक मुद्दा असा की, आपली वंचना—क्रूर वंचना—झालेली आहे असा साक्षात्कार ज्या क्षणीं प्रथम होतो त्या क्षणाला तरी मनुष्य बेभान होणे व उद्विग्न होणें हेंच स्वाभाविक आहे. थोडा काळ निघून गेल्यावर वैताग आपोआप ओसरतो, आणि प्रेम जर प्रामाणिक व उत्कट असेल तर प्रेयसीविषयीं पुन्हा मृदु भावना निर्माण होतात व ' तूं कुठंहि खुशाल ऐस ' असे कोमल शब्द ओठातून बाहेर पडतात. पण वंचनेच्या जाणिवेमुळे आलेला पहिला झटका मात्र अत्यंत तीव्र असतो; नव्हे, तसा तो असलाच पाहिजे. शाकुंतलाच्या पांचव्या अंकांत दारुण वंचना झाल्यामुळे बेभान झालेली शकुतला चारचौघांसमक्ष दुष्यंताला ' अनार्य ' म्हणते व अत्यंत कटु शब्दांनी त्याची गिर्भर्त्सना करते. पण या द्वेषाच्या प्रदर्शनामुळे तिचें दुष्यंतावरील प्रेम थोडेंहि कमी झालें होतें असा पुरावा नाही. डॉ. हर्षे हें मान्य करतील अशी आशा आहे. उत्कट प्रेमाची क्रूर वंचना ही जगांतील अत्यंत असह्य असलेल्या गोष्टींपैकी एक आहे; आणि अवहेलनेचा डंख ज्याला झाला आहे असें मन वंचनेची पहिली जाणीव होतांक्षणींच अनावर होणें व भडकणें हीच गोष्ट स्वाभाविक

आहे हें कबूल केलें पाहिजे. अमर्याद इच्छा करणारें मन निराश झालें तर त्याला ही किंमत द्यावीच लागते, आणि या निराशेचें कधी कधी तात्पुरत्या द्वेषभावनेंत सुद्धा रूपांतर होत असतें. दुसरें असें की, उत्कट प्रणयभावना ही चीजच अशी आहे की तिच्या सर्वंकष प्रभावामुळे विवेक, संयमपणा, धोरणीपणा इत्यादि साऱ्या गोष्टी वितळून जातात व दुर्दम्य विकार तेवढा प्रबळ होऊन मनावर सत्ता गाजवूं लागतो. उत्कट प्रेमभावना हा विकार जर अदम्य, तर त्या प्रेमाची निराशा झाल्यामुळे उत्पन्न होणारा विकार शतपटींनी अधिक अदम्य असला पाहिजे यांत शंकाच नाही. अशा स्थितींत विकारांच्या अधीन गेलेल्या मनांत आपली वंचना करणाऱ्या स्त्रीविषयीं किंचित्काल तिरस्काराची व द्वेषाची भावना निर्माण झाली तर ते मानवी स्वभावा[illegible]ूर्ण अनुसरूनच झालें असें म्हणावयास हरकत कोणती? आणि यामुळेच गडकऱ्याच्या प्रस्तुत कवितेंत प्रकट झालेल्या क्षणिक तिरस्काराच्या व द्वेषाच्या आविष्करणात कांहीहि अनैसर्गिक नाही असें म्हणावेंसें वाटते.

> ...for to be wise and love
> Exceeds man s might......

हे शेक्स्पियरच्या क्रेसिडाचे[१८] उद्गार अगदी खरे आहेत. विकारांचा अतिरेक ज्या क्षणीं झाला असेल त्या क्षणीं विवेकाची व संयमाची अपेक्षा करणें हें स्पृहणीय असलें तरी तें मानवाच्या शक्तीच्या बाहेरचें असतें. क्रेसिडावर प्राणापलीकडे प्रेम करणाऱ्या ट्रॉयलस्ला तिने आपली निष्ठुरपणें वंचना केली आहे या अत्यत कटु सत्याची जाणीव होतांच बेभान होऊन तो उद्गारतो[१९]—

> O Cressid ! O false Cressid ! false, false, false !
> Let all untruths stand by thy stained name,
> And they'll seem glorious.

कांही काळ गडकऱ्यांना प्रेमसाफल्याच्या समाधानाची प्रतीति आली आणि त्या प्रतीतीमुळे होणाऱ्या मधुर भावनांत त्यांचें मन तल्लीन झालें हें खरें. ज्या निष्प्रेम जीवनाचा त्यांनी पूर्वी अनेक वेळां कठोर धिक्कार केला

होता तें जीवन प्रणयपूर्तीमुळे समृद्ध होईल अशी आशाहि उगवली होती. प्रणयपूर्तीचा हा एकच क्षण सर्व जीवनावर समृद्धीच्या मोहक चांदण्याची बरसात करीत असतो. या क्षणातील अद्वितीय उन्माद गडकऱ्यांनी अनुभवलेला होता. परंतु प्रणयपूर्तीचें हें समाधान कमालीचें अल्पजीवि ठरलें आणि वंचनेच्या व नैराश्याच्या असह्य वेदना सहन करणें त्याच्या नशिबीं आले. या वेदनाचा पहिला भर ओसरून गेल्यावर व मन किंचित् स्थिर झाल्यावर आपल्या प्रणयजीवनाच्या दुःखपूर्ण कहाणींतील तपशील त्याना जसजसा आठवूं लागला तसतसा त्याचा भावनोद्रेक पुन्हा अनावर होऊ लागला. परंतु हा भावनोद्रेक **हृदयास** या कवितेत व्यक्त झालेल्या भावनोद्रेकापेक्षा निराळ्या प्रकारचा आहे. **हृदयास** या कवितेंतील भावनाविष्कार तिरस्कारांत व द्वेषात घोळून निघालेला आहे. परंतु तिरस्कार व द्वेष याची धार मागे वर्णिल्याप्रमाणे लवकरच कमी झाली, उफाळून आलेले विकार क्षीण झाले, आणि त्याची जागा आपल्याच दुर्दैवाच्या तीव्र जाणिवेच्या पोटीं निर्माण होणाऱ्या अनुकंपेने घेतली. एका दिव्य क्षणीं झालेल्या प्रेमपूर्तीच्या समाधानाने हृदय व्यापून टाकले असले तरी दुसऱ्याच क्षणीं तें समाधान पाण्यांत हरपलेल्या मोत्याप्रमाणे विरून गेलें, आणि त्या प्रेमाच्या मरणाबद्दल शोक करण्याची पाळी गडकऱ्यावर आली; आणि त्याच्या भावनानी रूपकाचा आश्रय केला व **प्रेम आणि मरण** ही उत्कृष्ट कविता निर्माण झाली. **हृदयास** ही कविता लिहीत असता भावनाचा जो उद्रेक झालेला होता त्याचे अवशेष शिल्लक असतानाच गडकऱ्यानी **प्रेम आणि मरण** ही कविता लिहिली असली पाहिजे. **मनोरंजनाच्या** १९१६ च्या वसत अंकात म्हणजे एप्रिलच्या अंकात ही कविता प्रसिद्ध झाली आहे. यावरून **हृदयास** ही कविता लिहिल्यानंतर एका आठवड्याच्या आतबाहेर २० मार्चच्या सुमारास ही कविता लिहिलेली असावी असें वाटतें. मानवी भावनाचीं काही आंदोलनें अशीं विचित्र असतात की त्याचा आविष्कार स्पष्टपणे, वाच्यार्थाने करण्याऐवजीं रूपकाच्या (allegory)द्वारें करणें कवींना अधिक सुलभ व प्रशस्त वाटतें हे मागे (पृ. ९५) स्पष्ट केलेंच आहे. याच कारणामुळे **वेडा** व

ओसाड आडांतील एकच फूल या रूपकात्मक कविता गडकऱ्यांनी लिहिल्या. आणि अगदी याच कारणामुळे कीट्सने लॅमिया हें दीर्घ कवन लिहिलें व शेलीने सेन्सिटिव्ह प्लँट ही आपल्याच भावनांचे आविष्करण करणारी रूपकात्मक कविता लिहिली. असल्या रूपकात्मक कवितांचें मर्म मागे स्पष्ट केलेंच आहे. आता प्रेम आणि मरण या कवितेंतील रूपक पाहूं. मैदानातील एका वृक्षाला एकदा आकाशांत बिजली चमकलेली दिसली, आणि तत्क्षणीं त्या वृक्षाला त्या बिजलीचें वेड लागले. तिच्या प्राप्तीचा ध्यास त्याला लागला. अखेर एक दिवस त्याच्या आशेचे साफल्य झाले- वीज कडाडून खाली आली आणि वृक्षाला कडकडून भेटली. त्या 'आलिंगना'मुळे वृक्षाला प्रेमसाफल्याची समृद्धि प्राप्त झाली हे खरे पण यातच त्याचे मरण सामावलेले होते. पण त्या वृक्षाला जळून जावें लागलें तरी प्रमाचा तो दिव्य क्षण त्याला लाभल्यामुळे त्याचे जीवन सफल झाले. या कवितेतील रूपकाचा हा आराखडा आहे. रूपकाचें अवगुठन या ठिकाणी इतके जाळीदार व विरळ आहे की कविता अगदी वरवर वाचणाराला सुद्धा स्वतः गडकऱ्याचीच ही निराश प्रेमाची—किंवा त्यांच्या प्रेमाची व त्या प्रेमाच्या मरणाची—कहाणी आहे हें सहज कळून येईल.

> वृक्ष थोर एकच त्यात
> वाढला पुऱ्या जोमात । सारखा ॥

स्वतःच्या कर्तबगारीविषयीं गडकऱ्यांना वाटणारा अमर्याद विश्वास या ओळींत प्रकट झाला आहे असा तर्क करावयास हरकत नाही. गडकऱ्याच्या नाटकातील अनेक प्रमुख व्यक्ति आपल्या व इतराच्या बुद्धिमत्तेविषयीं गौरवपर उद्गार काढताना आढळतात हें मागे (पृ. ६८) दाखवून दिलेच आहे. स्वतःच्याच प्रतिभेचा व बुद्धिमत्तेचा गौरव गडकऱ्यांनी नाटकातील पात्राच्या तोंडून केलेला आहे यात शंका नाही. 'बुद्धिमत्तेच्या विजयातच सुख मानायची' सवय आपल्याला पहिल्यापासून लागली आहे असें भावबंधनांतील घनश्याम म्हणतो, पुण्यप्रभावांतील ईश्वर लहानपणापासून कमावीत आणलेल्या आपल्या बुद्धिमत्तेचा उल्लेख करतो, वसुंधरेची विद्याप्राप्ति 'पुरुषाना सुद्धा अलंकृत करणारी, असून तिची प्रगल्भ

बुद्धि' पंडितानाहि लाजविणारी आहे अशी ईश्वराने ग्वाही दिली आहे, भूपाल सुद्धा वसुंधरेच्या ज्ञानगांभीर्याची तारीफ करीत आहे, एकच प्याला या नाटकांतील रामलाल सुधाकराच्या बुद्धिमत्तेचें कौतुक करीत आहे व स्वतः सुधाकरहि आपल्या बुद्धीचा गौरवपूर्ण उल्लेख करीत आहे. आपल्या स्वतःच्याच बुद्धिमत्तेचा हा गडकऱ्यांनी गौरव केलेला आहे हें लक्षात घेतले असतां

वृक्ष थोर एकच त्यात
वाढला पुऱ्या जोमात . . .

या ओळींतील मर्म समजेल. त्याचप्रमाणें भोवतालचें सारे जग अगदी क्षुद्र आहे, व या असल्या क्षुद्र जगाचा तिरस्कार मनात निर्माण होणे ही गोष्ट अपरिहार्य आहे ही कल्पना पुढील ओळींत सूचित झाली आहे.

चहुंकडेच त्याच्या भवते
गुडघाभर सारे जग ते । तेथले ॥
झुडुपेच खुरट इवलालीं
मातीत पसरल्या वेली । माजती ॥

मैदानातील असख्य वेली त्या वृक्षाच्यां सानिध्यासाठी तळमळत होत्या. पण नशिबाचा फासा असा विपरीत की, एकदा तळपती विद्युल्लता त्याच्या नजरेस पडली आणि त्या विद्युल्लतेने त्याला अक्षरशः वेड लावले.

परि कर्माचे विदान
काही तरि असते आन । चहुकडे ।
कोणत्या मुहूर्तावरती
मेघात वीज लखलखनी । नाचली ।
त्या क्षणीं । त्याचिया मनीं । तरगति झणी ।
गोड तरी जहरी । प्रीतिच्या लहरी । नकळता ।
So sweet was ne'er so fatal

असें शेक्स्पियरचा ऑथेल्लो म्हणतो. त्या वृक्षाच्या मनांत तरळूं लागलेल्या प्रीतीच्या लहरी अशाच गोड पण जहरी होत्या. या प्रीतीचा घाव त्याच्या

जिव्हारीं बसला आणि त्याला पुरतें वेड लागलें, तो भ्रमिष्ट झाला. त्याचा 'जातिधर्म' सुटला; आपण कोण याचा त्याला पुरा पुरा विसर पडला. आपण कोण व आपली प्रेयसी कोण, तिच्यात व आपल्यात थोडें तरी साम्य आहे काय, तिची प्राप्ति करून घेण्याची आपली लायकी आहे काय इत्यादि गोष्टींचा थोडा सुद्धा विचार त्याच्या मनात आला नाही.

Love is too young to know what conscience is

या शेक्स्पियरच्या वचनात[२०] केवढें सार्वजनीन सत्य भरले आहे! प्रेमाच्या उन्मादांत विवेकाला कसा थारा मिळणार? उत्कट प्रेमाचा उन्माद, व धोरणी विवेक याचा परस्परांशी कांहीहि संबध नाही! आपला घात होणार हें अगदी स्पष्ट दिसत असताहि हा उन्माद माणसाला वाटेल तें करावयास लावीत असतो. समजूतदारपणाने, व विवेक संभाळून उत्कट प्रेम करणें ही गोष्ट वदतोव्याघातासारखी असून ती भावनावश माणसांच्या आटोक्याच्या बाहेरची आहे, फार तर देवाना ती शक्य आहे असें जें शेक्स्पियरची क्रेसिडा म्हणते त्यातील मर्म तरी हेच होय. त्या वृक्षाला आता कसलीहि आशा राहिली नाही, त्याचे सारे लक्ष त्या मोहक पण दाहक विद्युल्लतेच्या ठायीं केंद्रित झालें, आणि त्याला फक्त तिचाच ध्यास लागला, आणि हा ध्यास त्याला जाळूं लागला. त्याचे चित्त इतर कोणत्याहि गोष्टींत रमेना, त्याचा उत्साह मावळला, तो फटिंग झाला.

तो योग। खरा हटयोग; ! प्रीतिचा रोग।
लागला ज्याला। लागते जगावें त्याला॥ हे असे॥

त्या वृक्षाची ही तल्लीन व बेभान अवस्था पाहून भोवतालची क्षुद्र दुनिया त्याचा उपहास करूं लागली. कोणी त्याला हसू लागले, तर कोणी त्याची कीव करूं लागले, कोणी त्याला सहानुभूति दाखवूं लागले, कोणी निंदा करूं लागले आणि कोणी त्याची नजर चुकवूं लागले, आणि काहींना तर त्याची भीतीहि वाटूं लागली.

ही त्याची स्थिति पाहुनिया
ती दीडवितीची दुनिया। बडबडे।

कुणि हंस कुणि करी कींव
तडफडे कुणाचा जीव । त्यास्तव ।
कुणि दयाहि त्यावरि करिती
स्वर्गस्थ देव मनि हंसती । त्याप्रति ।
निंदिती । कुणी त्याप्रती । नजर चुकविती ।
भीतिही कोणी । जड जगास अवजड गोणी । होइ तो ।।

या ओळींतील रूपक अगदीच विरळ व जाळीदार आहे. प्रणयोन्मादाने बेभान झालेल्या माणसाला भोवतालच्या जगाच्या चौकस डोळ्याकडे व चवचाल जिभाकडे लक्ष देण्याइतपत मनाची शुद्ध नसते. भोवतालच्या रिकामटेकड्या क्षुद्र मतलबी माणसे प्रथम त्याचा हेवा करूं लागतात, मत्सर करूं लागतात, आणि शेवटीं संतापाने बेभान होऊन तीं त्याची टवाळी करूं लागतात. हा जगाचा न्यायच आहे. गडकऱ्याच्या या ओळी वाचल्याबरोबर मला माधवराव पटवर्धनाच्या त्या प्रसिद्ध ओळींची आठवण झाली.

हा रस्त्यात दिसे न तों पटपटा सभाषणें थाबती
दृष्टि यावर रोखिली प्रकटवी साशङ्क कौतूहल
याची पाठ फिरे न तोंच उसळे हेटाळणीचें हसे
मागूनी विषदिग्ध शब्द सुटती काळीज भेदावया

प्रेमाच्या उन्मादाची प्रतीति ज्याला आली त्याला सुखसंवेदनेबरोबर त्यांतील विखारहि पतकरावा लागतो. उन्मादाचा अतिरेक झाला म्हणजे त्याचें मन त्याला फसवूं लागतें, व तोहि जगाला फसविण्याची पराकाष्ठा करूं लागतो. आपल्या भावना आतल्या आत दडपून टाकण्याच्या बाबतींत यश येणें अशक्य झालें म्हणजे ही परवचना आणि आत्मवंचना सुरू होते, आणि भावनोद्रेक आवरून धरून, डोळ्यात तरारणारे अश्रू कोणाला दिसणार नाहीत अशा बेताने पुसून टाकून, उसनें हास्य तोंडावर दाखविणें त्याला भाग पडते.

इष्काचा जहरी प्याला
नशिबाला ज्याच्या आला । हा असा ।

टोंकाविण चालू मरणें
तें त्याचें होते जगणें । सारखें ।
हृदयाला फसवुनि हंसणे
जीवाला न कळत जगणें । वरिवरी ।

'गगनांतील चंचल बाला' भेटावी ही त्या वृक्षाची आतुर उत्कंठा लवकरच अत्यत तीव्र झाली. त्याची ती विलक्षण तपश्चर्या पाहून आकाशांतील देवानाहि त्याची करुणा आली, आणि काय वाटेल तें त्याला द्यावयास ते तयार झाले. त्याला फक्त एकाच गोष्टीचा ध्यास लागलेला होता —त्याला आकाशातील विद्युल्लता हवी होती, तीच त्याच्या 'जीविंच्या जीवाची बाला' होती. हें वेडें प्रेम सोडून देण्याशिवाय गत्यंतर नाही, त्या तेजस्वी बालेचा स्पर्श होतांक्षणींच मरण पतकरावें लागेल इत्यादि गोष्टी सांगून त्याचें मन त्या लखलखत्या विद्युल्लतेच्या आशेपासून परावृत्त करण्याची देवानी शिकस्त केली. पण उन्मनी अवस्थेंत गेलेल्या त्या बेभान वृक्षाला हा धोरणी, पोक्त व विवेकी सल्ला कसा पटावा? त्यानेच उलट निष्प्रेम जीवनाचा धिक्कार करून उपदेश करणारांना प्रीतीच्या साफल्याचे महत्त्व पटविण्यास सुरवात केली.

निष्प्रेम चिरजीवन ते
जगिं दगडालाही मिळते । धिक् तुझा ।
क्षण एक पुरे प्रेमाचा
वर्षाव पडो मरणाचा । मग पुढे ।

प्रेमसाफल्याच्या, प्रणयपूर्तीच्या, दिव्य क्षणाची वाट प्रत्येकजण डोळ्यांत प्राण आणून पाहत असतो. तो क्षण लाभल्यावर मग सर्वस्वाचा सत्यानाश झाला तरी तो उघड्या डोळ्यानी पाहण्याची तयारी होणें ही प्रणयविषयाशीं झालेल्या आत्यंतिक तादात्म्याची खूण आहे. मेटरलिंकच्या मोना व्हॅना या नाटकांतील प्रिन्झिव्हेल याच क्षणाची वर्षानुवर्षें वाट पाहत होता, आणि तो क्षण प्राप्त झाला तर त्यानंतर वाटेल त्या आपत्ति सोसण्याची त्याने आपल्या मनाची तयारी करून ठेवली होती. आणि अखेर 'प्रीतीची जळती ज्योत' त्या वृक्षाकडे धावत आली, त्याची विद्युल्लता त्याला भेटली, असंख्य क्षण

भोगलेल्या यातनांचा विनाश या एका क्षणाने केला. पण —! विद्युल्लतेचा स्पर्श झाल्याबरोबर प्रेमसाफल्याच्या पूर्तीचें समाधान लाभतें न लाभतें तोंच त्याचा विनाश झाला. साफल्याच्या व समृद्धीच्या क्षणांतच विनाशाचा क्षण गुरफटलेला होता, प्रेमसाफल्य म्हणजेच विनाश हें त्या वृक्षाचें भवितव्य होते. परंतु या मरणांतच आपल्या जीवनाचे अत्युत्कट साफल्य त्याला लाभलें. आणखी काय पाहिजे ? प्रेमसाफल्याच्या या क्षणाचें गडकऱ्यांनी केलेलें वर्णन नितान्तरमणीय आहे.

दुभंगून खाली पडला
परि पडतां पडता हसला । एकदां ।
हर्षाच्या येउनि लहरी ।
फडफडुनी पानें सारीं । हासली ।
त्या कळया सर्वही फुलल्या
खुलल्या त्या कायम खुलल्या । अजुनिही ।
तो योग । खरा हटयोग; । प्रीतिचा रोग ।
लागला ज्याला । लाभते मरणही त्याला । हे असे ।

प्रीतीच्या साफल्याच्या दिव्य क्षणींच जीविताचा विनाश झाला तर त्यासारखें सुखाचें दुसरें निधान नाही या गडकऱ्यानी **प्रेम आणि मरण** या कवितेत माडलेल्या कल्पनेचें कीट्सने आपली प्रेयसी फॅनी ब्रॉन् हिला पाठविलेल्या पत्रातील कल्पनेशीं कमालीचें साम्य आहे. कीट्स लिहितो—

" I have two luxuries to brood over in my walks, your Loveliness and the hour of my death. O that I could have possession of them in the same moment ! "[२१]

प्रेमसाफल्य हें गडकऱ्यांच्या जीवनाचें परमोच्च ध्येय जसें बनलें होतें तसेंच तें कीट्सचेहि ध्येय होतें. किंबहुना तो त्याचा धर्म बनला होता, तें त्याच्या जीवनाचें सारसर्वस्व बनले होतें; आणि 'धर्मा'साठी सर्वस्वाचें बलिदान करावयाचीहि त्याची तयारी होती. प्रस्तुत प्रकरणाच्या सुरवातीला कीट्सच्या पत्रांतील जीं वाक्यें उद्धृत केलीं आहेत त्यांच्यामध्ये प्रेमधर्मासाठी बलिदान करण्याची कीट्सची उत्सुकता अगदी स्पष्टपणे प्रकट झाली आहे.

> " .....I could be martyred for my Religion—Love is my religion—I could die for that I could die for you. My Creed is Love and you are its only tenet."

आणखी एका पत्रात कीट्स म्हणतो—

> " I should like to cast the die for Love or death. I have no Patience with anything else .. .."[२२]

प्रेम आणि मरण—! कीट्सने या दोन गोष्टींची सांगड घातली आहे त्या-प्रमाणें गडकऱ्यानी सुद्धा घातली आहे. पुण्यप्रभावाच्या पहिल्या अंकाच्या दुसऱ्या प्रवेशातील कालिंदीचे उद्‌गार यासाठी पाहावे.

> "...मरणामुळेच माणसाला मोल येते. प्रेमाला मरणाचे भय नसेल तर त्याबद्दल सभय उत्कंठा कधींच वाटणार नाहीं ! नाशाच्या भीतीमुळे सुखाबद्दल सारखी गोड हुरहूर वाटत असते. .. प्रेमाच्या जहरी निशेने बेभान, बेहोष होऊन ... डोळ्यांवर धुंदीची झांपड पडली असताना.... हा जीव ठायींच्या ठायीं विरून गेला तर आणखी काय पाहिजे ?"

कालिंदीच्या या उद्‌गाराचें

> " O that I could have possession of them in the same moment ! "

या वर उल्लेखिलेल्या कीट्सच्या उद्‌गाराशीं केवढे विलक्षण साम्य आहे !

प्रेमाच्या पूर्तीचा एक क्षण प्राप्त झाला तरी त्याने आपल्या जीवनाचें साफल्य झालें, त्यानंतर कसलेंहि नैराश्य सोसावे लागलें तरी चालेल या कल्पनेचा प्रभाव बलवत्तर झाल्यामुळे

क्षण एक पुरे प्रेमाचा
वर्षाव पडो मरणाचा ..

असें समाधान मानून घेण्याचा माणसाने कसलाहि निर्धार केला तरी प्रेम-पूर्तीच्या त्या क्षणीं अनुभविलेल्या सुखद स्मृति नैराश्याने उद्‌भवणाऱ्या

वेदनांवर मात करतात, इतकेंच नव्हे तर प्रेयसीविषयींचा क्षणिक तिरस्कार व द्वेष याच्यावर त्या स्मृति मात करतात व तिच्याविषयींच्या कोमल, मृदु भावनाचा पुन्हा विजय होतो. याचें प्रत्यतर २४ मार्च १९१६ रोजीं गडकऱ्यानी लिहिलेल्या एका शब्दासाठीं विनंति या कवितेवरून येईल. अगदी थोड्या दिवसांपूर्वी ( हृदयास या कवितेंत ) भारीच कठोर शब्द वापरल्याबद्दल प्रेयसीची क्षमायाचना करण्यासाठीच ही कविता लिहिलेली आहे. आपण दोघे एकमेकांसाठीच असून एकमेकास क्षमा करणें हें आपलें कर्तव्यच आहे असें कवि म्हणतो.

क्षमा करावी मी तुज, बाले, आणि तूंहि माते
असेच आता जडले आहे दोघाचे नाते
परस्परास्तव आपण ऐसा प्रत्ययही आला
तुजवाचुनि सुचेरुचेना मजाविणहि तुजला.

प्रेयसीविषयीं आपल्या ज्या भावना आहेत तशाच भावना तिच्याहि आपल्याविषयीं आहेत असा विश्वास पुन्हा उत्पन्न होण्यासारखी कोणती घटना ९ मार्च ते २४ मार्च या अवध्या पधरा दिवसांत घडली असेल तें सागता येत नाही. काही तरी घटना घडलेली आहे हे मात्र निश्चित. ही सारीच कविता वस्तुस्थितींत प्रयक्ष घडलेल्या घटनेबर आधारलेली आहे यांत कसलीच शंका नाही. घडलेली गोष्ट कवि अगदी प्रामाणिकपणें जशीच्या तशी सागत आहे याचा प्रत्यय प्रत्येक ओळींतून येत आहे. पुढील ओळी पाहाव्या.

क्षणमात्राचा राग अन्तवर–स्वभाव दोघाचा
समजुनि हे मग राग धरावा कोणी कोणाचा ?
जीवाच्या बागेत खेळतो पक्षी प्रेमाचा
पिसामागुनी पिसे काढणें, मार्ग न सुज्ञाचा.
पश्चात्तापे हृदय हलविता अश्रूंच्या धारा,
वाहुनि त्याला लाभू दे तो मोत्याचा चारा.
जें झालें ते विसरुनि, सखये ! टाकुनि इतराजी
भला बुरा मी मान्य करुनिया होशिल ना माझी ?
' गोविंदाग्रज ' आणुनि नयनीं जीवाचें तोय
विनवित; बाले ! लिहीं स्वहस्तें तूंच पुढे— !

ज्या एका शद्वासाठी कवि ' विनंति ' करीत आहे तो म्हणजे शेवटच्या ओळींतील सोडून दिलेला ' होय ' हा शद्ब होय. तिने आपल्या विनंतीला ' होय ' असे उत्तर द्यावें यासाठी कवि तळमळत आहे. ' जें झालें तें विसरुनि ' हे शद्व अत्यंत महत्त्वाचे आहेत. हृदयास ही कविता लिहिण्याच्या वेळी मनाचा जो अनावर क्षोभ झालेला होता त्याच्या भरात जे कटु उद्‌गार तोंडांतून बाहेर पडले असतील त्याना उद्देशून हे शद्व आहेत. हृदयास ही कविता लिहीत असता मनांत जो विलक्षण कडवटपणा निर्माण झालेला होता तो आता नाहीसा होऊन त्याची जागा मृदु भावनानी, किंबहुना आर्जवीपणाने घेतली आहे हें या कवितेवरून स्पष्ट होईल.

या मृदु भावना ज्या घटनेमुळे निर्माण झाल्या त्याच घटनेमुळे गडकऱ्यांच्या मनांत पुन्हा आशेचें कोवळे चांदणे फुललें असेल; आणि ही आशा बहरल्यावर मनाच्या त्या अवस्थेंत त्यानी कधीं ? हें अत्यंत रमणीय गीत लिहिलें असेल. हें गीत जून १९१६ च्या मनोरंजनांत प्रसिद्ध झालें आहे. यावरून एप्रिल महिन्यांत केव्हा तरी गडकऱ्यांनी तें लिहिलें असावें. आपल्या अमर्याद आशांची पूर्ति कधी होणार ? रुचिर स्वप्नें सत्यसृष्टींत कधी अवतीर्ण होणार ? या प्रश्नानें गडकऱ्याच्या मनाची संभ्रांत अवस्था करून सोडली आहे. नैराश्याचे कितीहि दारुण आघात झाले तरी आशेचा गूढ मोहकपणा काही कमी होत नाही, ते विचित्र आकर्षण काही नष्ट होत नाही. गडकऱ्यांचीं प्रेमगीतें म्हणजे अमर्याद इच्छा करणाऱ्या निराश मनाची कहाणी आहे हें पुन्हा पुन्हा प्रत्ययाला येत आहे.

> "This is the monstrosity in love, lady, that the will is infinite .....that the desire is boundless... .."

हे शेक्स्पियरच्या ट्रॉयूलसचे [२३] उद्‌गार थोड्याफार फरकाने गडकऱ्यांच्या अमर्याद इच्छांनी ओतप्रोत भरलेल्या मनालाहि लागू आहेत. प्रेमसाफल्य कधी होणार ? प्रेयसीनें दिलेलीं गोड गोड वचनें कधी खरीं होणार ? हा खरा प्रश्न आहे. या प्रश्नाने बेचैन झालेल्या गडकऱ्यांच्या मना-

तील कोमल भावनानी प्रस्तुत कवितेंत अत्यंत बहारीचें काव्यमय रूप धारण केले आहे. हृद्यास या कवितेतील विलक्षण कडवटपणाचा प्रत्यय आल्यानंतर कधीं ? या कवितेंतील मोहक भावनाविष्कार पाहणें म्हणजे अमावास्येच्या भीषण काळोखात राक्षसी वादळाचा रौद्रपणा अनुभविल्यावर, पौर्णिमेच्या उन्मादक चादण्याची बरसात होत असता एखाद्या रमणीय उद्यानात कोवळ्या लुसलुशीत हिरवळीवरून फुलाच्या सुगधाने महिरून गेलेल्या वातावरणातून हिंडण्यासारखेच होय. हें सारेच गीत पराकाष्ठेचें ललित व मोहक उतरले आहे. काव्यात्मक कलाकुसरीचा—उत्कृष्ट शद्ब-योजनेचा व लालित्याचा—या ठिकाणीं प्रकर्ष झाला आहे.

चित्रपटावरि रम्याकृतिच्या सीमारेषा परोपरी,
रग कधीं वठतील परी ?
कानाला आनद देति हे झुळझुळ गाउनि गोड झरे,
अर्थ कधीं कळणार बरे ?
अधुक अधुक गोड भावना डोकावाति कविमनाकडे,
शब्द कधी होतील खडे ?
सतेज वचने देई तारा, परी लकाके नभामधीं.
खाली येईल परी कधीं ?
झापड पडते डोळ्यावरती— चिंता छाळिता हृदंतरीं,
झोप कधीं येईल परी ?
प्रतिरात्री ही स्वप्ने दाविति इच्छाचित्रे जीवाचीं,
सृष्टि कधीं होइल त्याची ?
अंधनयानें ही बघते आशा विश्वाचे हे रम्याकार,
जगीं कधीं तें दिसणार ?
—आणि वल्लभे ! दिलींस वचने, गोड अहा तीं किती तरी !
खरीं कधीं होणार परी ?
' गोविंदाग्रज ' जें जें आळवि कवनी–आणिक–मनामधीं,
पटेल ते तें साग कधीं ?

पण वल्लभेने दिलेलीं वचनें खरीं कधी होणार म्हणून तळमळणाऱ्या गडकऱ्याना या प्रश्नाचें उत्तर कोण देणार ! तीं वचनें कितीहि गोड असलीं तरी तीं कधीच खरीं झालीं नाहीत—व्हावयाचीं नव्हतीं.

आकाशांत लकाकणारी तारका खाली कशी येणार ? स्वप्नें हीं कितीहि मोहक असलीं तरी तीं स्वप्नच ! सत्यसृष्टींत तीं कशीं उतरणार ? एका शब्दासाठीं विनंती करणाऱ्या व नैराश्याची भीति समोर दिसत असताहि वल्लभेच्या रुकारासाठी तळमळणाऱ्या गडकऱ्याना आपल्या प्रेयसीचा अखेरचा निरोप घेण्याची पाळी फार लवकरच आली, आणि तीव्र निराशेचा शेवटचा धक्का ही काय चीज असते याची त्यांना प्रतीति आली. ' कधीं ? ' हा प्रश्न कायमचा प्रश्नच राहिला, त्याला कधीच उत्तर मिळालें नाहीं, आणि जिच्या पावलासाठी आपल्या हृदयाच्या पायघड्या केल्या ती नटव्या थाटामागे धावत निघून गेली या विचाराच्या अगदी चरळत्या लहरीसरशीं उत्पन्न होणारी व्यथा निर्दय बालेस या कवितेंत प्रकट झाली.पण गडकऱ्यांच्या मनातील सारीं शल्यें या कवितेंत बोलकीं झालीं असलीं तरी हृदयास या कवितेंत दिसून आलेल्या विलक्षण कडवटपणाचा लेशसुद्धा येथे आढळणार नाही. उलट एक प्रकारचा दीनवाणेपणा, व केविलवाणेपणा, आपल्या कंगाल भाग्याविषयींची अनुकंपा याच गोष्टी या कवितेंत प्रकट झाल्या आहेत. ज्या निर्दय बालेमुळे ही विचित्र परिस्थिति निर्माण झाली तिला दूषणे देण्याऐवजीं आपल्या दुर्दैवाचा व वेड्या प्रेमाचाच अधिक्षेप कवि या कवितेंत करीत आहे. १९१६ मे महिन्याच्या अखेरीस ही कविता गडकऱ्यानी लिहिली असावी. कधीं ? ही कविता लिहिल्यानंतर लगेच जिच्या पायाभोवती त्याच्या साऱ्या भावना कित्येक दिवस घोटाळत होत्या तिचे लग्न झालें असेल व ती आता आपल्याला कायमची दुरावली ही खात्री झाल्यावर गडकऱ्याच्या मनाची जी अवस्था झाली तिच्यातून ही कविता उद्भूत झाली असली पाहिजे, आणि

अखेर झाली आता । घे हा । प्रणाम जाता जातां ।

असे निर्वाणीचे केविलवाणे उद्गार त्याना काढावे लागले असले पाहिजेत. प्रेयसीला जिंकून जन्मभर तिचा दास होऊं या वेड्या आशेवर टांगलेला जीव तिच्या नजरेंत एवढासा बदल दिसला अथवा तसा नुसता भास झाला तरी कावराबावरा होई; आणि अशा जीवाला शोकाच्या अथाग

डोहांत बुडवून टाकणारी बालिका निर्दयच नाही काय ? तिच्या पायांशीं सर्वस्व अर्पण केल्यानंतर तिने निराशा करावी हें शल्य असह्य नव्हे काय !

> नजर जराशी तुझी बदलता थोडा थोडा होई
> वेडा माझा जीव बुडविला तूं शोकाच्या डोही.
> होते नव्हते त्याची केली तुझ्या ठिकाणीं पोंच
> जीवाच्या जाळ्यात झेलला शब्द न पडला तोंच

मनोहर रूपाच्या जोडीला तीव्र बुद्धि असल्यामुळे आपल्यामधील गुणाची तिला काही पारख असेल ही कवीची कल्पना अगदी खोटी ठरली व अखेर नटव्या थाटाचा विजय झालेला पाहणे त्याच्या नशिबीं आलें.

> रूप मनोहर असले, बुद्धिहि तीव्र लाभली तुजला,
> खऱ्या गुणाची पारख काही असेल तव हृदयाला—
> वेडी आशा अशी धरुनि या धडा जिवाचा केला
> भल्याबुऱ्याचा भेद न तुजला अनुभव भलता आला !
> केल्या ज्याच्या पायघड्या मी तुझ्या पावलासाठीं
> त्या हृदयाला तुडवुन गेलिस नटव्या थाटापाठीं.
> जग सगळे हे डोळ्यापुरते, रूप जिवाला पुरतें
> उदार हृदया परि निर्दय जग दगडाखालीं पुरते !

आपल्या गुणाची, आपल्या उदारतेची ( उदारतेचा हा उल्लेख हृदयास या कवितेंतहि येऊन गेला आहे.) थोडी देखील चाड या निर्दय बालेला नाही इतकेंच म्हणून गडकरी थांबले नाहीत. वैभवहीनते-शिवाय आपल्या आणखी एका महत्त्वाच्या वैगुण्याचा उल्लेख त्यांनी केला आहे. अर्थात् हा उल्लेख त्यानी नकळत, अभावितपणेंहि, केला असण्याची शक्यता आहे. त्याच्या अंतर्मनात चाललेले गूढ व्यापार मात्र त्यायोगें स्पष्ट झाले आहेत. आपल्याजवळ पैसा नाही, आपण श्रीमंत नाही आणि यामुळे श्रीमंत, खानदानी घराण्यांत जन्मलेल्या व आपल्या तोलाचें श्रीमंत स्थळ लाभावें अशी जिच्या बाबतींत आईबापांची महत्त्वाकांक्षा असेल अशा प्रेयसीच्या मानाने आपण अगदीच सामान्य आहोंत हा एक 'इन्फीरिऑरिटी कॉंप्लेक्स' गडकऱ्याच्या आत्यंतिक भावनावश मनांत रुजलेला असलाच पाहिजे. या कवितेंत त्यांच्या मनांत दृढमूल झालेला आणखी एक ' इन्फी-

रिऑरिटी कॉप्लेक्स ' सहजगत्या प्रगट झाला आहे, आणि त्यांच्या 'अन्कॉन्शस ' मधील गूढ भावना अशा प्रकारें त्याच्या प्रयत्नांना न जुमानतां उफाळून आल्या आहेत.

जग सगळे हे डोळ्यापुरतें, रूप जिवाला पुरते !

ही ती ओळ होय. वैभवाच्या बाबतींत आपण जसे तिच्या तोलाचे नाहीं तसेच रूपाच्या, देखणेपणाच्याहि बाबतीत आपण तिच्या मुळीच तोलाचे नाही या कटु सत्याची जाणीव गडकऱ्याच्या मनाला वारंवार छळीत असलीच पाहिजे. आता या ठिकाणीं मात्र ती जाणीव स्पष्टपणें प्रकट झाली आहे. आपल्याजवळ वैभव नाही आणि स्त्रीच्या डाळ्याना भुरळ पाडणारें रूपहि नाही; आणि आपली विद्या, आपले ज्ञान, आपली बुद्धिमत्ता, आपली कला इत्यादि गुणांची तर तिला मुळीच चाड नाही; ज्या ठिकाणीं या गुणांची चाड नसते त्या ठिकाणीं वैभव व रूप याच गोष्टी महत्त्वाच्या ठरतात, आणि त्यांचा तर आपल्याजवळ पूर्ण अभाव आहे या जाणिवेचें शल्य हृदयात सलूं लागलें असल्यामुळेच

खऱ्या गुणाची पारख काहीं असेल तव हृदयाला<br>
वेडी आशा अशी धरुनिया धडा जिवाचा केला.

यासारख्या या कवितेंतील ओळी, किंवा

जिथे गुणाची चाड न काही, कमअस्सल जें जातीचे<br>
सौंदर्यचि तें कसलें ? केवळ एक बाहुले मातीचें.<br>
विद्यावैभव कुठे तुझे ? तो ज्ञानाचा गौरव कोठें ?<br>
आणि कुठे रंगीत खेळणें .....

या हृदयास या कवितेंतील ओळी निर्माण झाल्या असल्या पाहिजेत हें उघड आहे. आणि यामुळे

जग सगळे हें डोळ्यापुरते, रूप जिवाला पुरतें.

या ओळींतील-विलक्षण आर्तता आपल्याहि मनाला बोचते. या ओळींत सामावलेलीच कल्पना गडकऱ्यांनी पुण्यप्रभावांतील कालिंदीच्या तोंडून पुन्हा विस्ताराने वदावेली आहे.

" आपल्या उदार दृष्टीला कदाचित् दिसलीं नाहींत म्हणून माझीं मलासुद्धां तीं कारणें दिसल्यावांचून कशीं राहतील ? आपल्या माझ्यांतलें अंतर थोडें का आहे ? आपल्यासारख्या बावन्न बिरुदाच्या धन्याला शिलेदारी शिरपेचांची शोभाच साजून दिसायची ! माझी आपली सांवळ्या तुळशींची साधीभोळी मंजुळा ! प्रीतीची पूजा बांधायला नुसतीं तुळशीपत्रें कशीं पुरणार? पुरुष आधीं रूपाकडे पाहतात; आणि तसें सौंदर्य माझ्या कपाळीं मुळींच नाहीं ! "

'जग सगळें हें डोळ्यांपुरतें, रूप जिवाला पुरतें' या ओळींत गडकऱ्यानी आपल्या मनांतील जें शल्य प्रकट केलें आहे, तेंच कालिंदीच्या तोंडून प्रकट केले आहे; कालिंदीच्या तोंडून स्वतः गडकरीच बोलत आहेत. रूपहीनतेमुळे आपण सुंदर मुलीच्या प्रेमाला पात्र होऊं शकत नाही या कल्पनेने गडकऱ्याच्या काव्यात्म, भावनावश व सौंदर्यलालस मनाला केवडा डख झाला असेल याचा तर्क करता येईल. आपल्या प्रौढ वयामुळे आपण सुंदर प्रेयसीच्या सांनिध्यास अपात्र आहों या गोष्टीची कटु जाणीव अशाच प्रकारें शेक्सूपियरनेहि १३८ व्या सॉनेटमध्ये प्रकट केली आहे.

Thus vainly thinking that she thinks me young,
Although she knows my days are past the best.

**हृदयास** व **निर्दय बालेस** या दोन कवितांत प्रणयनैराश्याचाच आविष्कार असला तरी त्या आविष्काराच्या पद्धतींत फार मोठा फरक आहे. वंचना करणाऱ्या प्रेयसीची अत्यंत कटु शब्दांत केलेली निष्ठुर निर्भर्त्सना **हृदयास** या कवितेंत आढळेल. **निर्दय बालेस** या कवितेंत या निष्ठुर निर्भर्त्सनेचा लेशहि नाही. स्वतःविषयींचीच अनुकंपा सर्वत्र दिसून येत असून आपल्या ' भिकारी भाग्यदेवतेला ' बोल लावण्याकडेच कवीचा कल दिसून येत आहे. इतकेंच नव्हे तर ज्या प्रेमभावनेमुळे हें दुःख सहन करण्याची पाळी आली त्या प्रेमभावनेचाच कवीला तिरस्कार

आलेला आहे, व इतःपर प्रेमाचें नाव सुद्धा मनांत येऊं द्यावयाचें नाही असा निर्धार त्याने केलेला आहे.

ज्या देवानें जग हें केलें, ज्या प्रेमें हें चालें
त्या देवाला, त्या प्रेमाला, जाळिन आतां बाले !
जगावाचुनी लाभतीस तरि जग मी केलें असतें
तुझ्यावाचुनी जग हे आता असून झालें नसतें.[२४]
दिला तिलाजलि अश्रूंचा हा त्या प्रेमांच्या नांवा
परतायाचे नाहीं आता त्या प्रेमाच्या गावा.

आता प्रेमाचे नांव सुद्धा काढावयाचें नाही हा निर्धार पाहिल्याबरोबर एकदा प्रेमाची निराशा झाली असतां पुन्हा एकदा विस्तवाशीं खेळ खेळणें बरें आहे काय या विचाराने संभ्रान्त झालेल्या गडकऱ्याच्या भावनांचे जे हेलकावे भयाण एकान्त या कवितेंत उत्कृष्टपणें प्रकट झाले होते त्याची आठवण होणें अपरिहार्य आहे.

तुझी उपजती आशा मनिंची मनींच चिरडावी ?
कीं विसरुनी अनुभवा, एकदा पुन्हा धाव घ्यावी ?... ..
सहज जोडिला मित्र तोडिता कष्ट होति फार,
एक तोडिता सखा जिवाचा एक जीव ठार.
प्रेमाची एकदा पुरी जी झाली मनिं होळी
विसरावी ती किंवा घ्यावी कायमची झोळी ?......
किंवा तळिंच्या रत्नांसाठीं द्विगुणित उत्साहें,
पुन्हा बुडी मारावी खालीं ?......

असल्या शंकांचा निरास करून पुन्हींही प्रेम करावें असा निर्धार विचारपूर्वक कोणी करीत असतो असें मुळीच नाही. प्रेमाचा प्रभाव माणसाला नकळत त्याच्या मनाची पकड घेतो व त्याला हतबल करून टाकतो. गडकऱ्यांच्या बाबतींत असेंच झालें; आणि एकदा निराशा भोगावी लागली असतांहि साऱ्या विवेकाचा त्याग करून त्यांनी पुन्हा प्रेम करावयास सुरवात केली, व अखेर ते त्या प्रेमाच्या जाळ्यांत पूर्णपणें गुरफटून गेले व स्वतःच्या मनावरचा ताबा अगदी उडून जाईल इतकी त्याची उन्मनी अवस्था झाली. आणि अखेर !—

होइल होइल वाटत होतें तेंच अखेरिस झालें
नाव घेतल्यावाचुन आतां मनांत झुरणें आले !

निर्दय बालेस या कवितेंत आत्यंतिक नैराश्यामुळे उत्पन्न झालेला प्रेमाभावनेविषयींचा जो तिरस्कार दृष्टीस पडतो त्यांत कडवटपणा आहे यांत शंकाच नाही. पण हा कडवटपणा प्रेम या कल्पनेविषयींचाच आहे, प्रेयसीविषयींचा नाही हें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे. या कवितेंत प्रकट झालेला हा कडवटपणा निर्दय देवीस या ( गडकऱ्यांच्या मृत्यूनतर सुमारें पंचवीस वर्षांनी प्रसिद्ध झालेल्या ) कवितेंत अगदी शिगेला पोचलेला दिसून येईल. मराठींत तरी या कडवटपणाला दुसरी जोड सापडणें कठिण आहे. पराकाष्ठेची उत्कट भावनावशता हा जो गडकऱ्यांचा स्थायीभाव त्यातूनच हा कडवटपणा निर्माण झालेला आहे. कीट्सच्या कांही कवनातून असलाच कडवटपणा आढळतो. परंतु त्याचा खरा आविष्कार स्विन्बर्नच्या कांही कवितात झालेला आढळून येईल. विशेषत: *The Triumph of Time Anactoria, Dolores, A Forsaken Garden* या स्विन्बर्नच्या कविता दारुण प्रेमानिराशेमुळे उत्पन्न झालेला आत्यतिक कडवटपणा ही काय चीज असते हें जाणून घ्यावयाचें असेल तर अवश्य वाचाव्या. स्विन्बर्नचें जिच्यावर उत्कट प्रेम होते त्या मुलीने त्याला एकदा उत्कृष्ट गुलाबांचा एक झेला दिला होता; व ती चागली गात असे. पुढे तिने भयकर निराशा केल्यावर फुलांचा व संगीताचा त्याच्या मनांत जो बिलक्षण तिरस्कार बाणला तो कायमचाच याचा उल्लेख मागे येऊन गेलेलाच आहे. *The Triumph of Time* या कवितेमधील पुढील कडवें पाहावें.

I shall never be friends again with roses;
I shall loathe sweet tunes, where a note grown strong
Relents and recoils, and climbs and closes,
As a wave of the sea turned back by song.
There are sounds where the soul's delight takes fire,
Face to face with its own desire;
A delight that rebels, a desire that reposes;
I shall hate sweet music my whole life long.

**निर्दय बालेस** ही कविता गडकऱ्यांनी मनाच्या ज्या अवस्थेत लिहिली त्याच अवस्थेंत **निर्दय देवीस** व **हाय हाय** या कविता लिहिल्या असल्या पाहिजेत. **निर्दय देवीस** ही कविता गडकऱ्यांच्या हयातींत प्रसिद्ध झाली नव्हती. ती १९४४ सालीं **समीक्षक** मासिकाच्या गडकरी विशेषांकांत प्रथमच प्रसिद्ध झाली. **हाय हाय** या अपूर्ण कवितेच्या पहिल्या अठ्ठेचाळीस ओळी **वाग्वैजयंतीच्या** चवथ्या आवृत्तींत प्रसिद्ध झाल्या असून उरलेल्या ओळी **समीक्षकाच्या** गडकरी विशेषांकांत प्रसिद्ध झाल्या आहेत. दोनहि कवितात प्रेमनैराश्यामुळे उत्पन्न झालेला वैताग व कडवटपणा याच गोष्टी ओतप्रोत भरलेल्या आहेत. विशेषतः **निर्दय देवीस** या कवितेंत प्रकट झालेला कडवटपणा सुधाकराच्या मरणकाळच्या उद्गारातील कडवटपणा-सारखाच आहे. पुढील ओळी पाहाव्या.

आग लावता हृदया निघती निःश्वासे ज्वाला
तापुनि लागे काळोखाचा रस उकळायाला !
जळत्या जगातली प्रेमाचीं भूतें हीं सारी !
रसरसलेल्या काळोखामधिं भाजतात भारी !
ऐक तयांच्या अखेरच्या या भयाण किंकाळ्या,
बहिरे होतें अगचि सारे बसती कानठळ्या !
प्रेमहि माझें या हृदयाच्या स्मशानात जळता,
हे स्मरणाचे भूत नाचते त्या जागी आता !
झाला माझ्या भोवतालच्या विश्वाचा जाळ,
त्या राखेवर नाचाया मी झालो वेताळ !
जिथे जिथे पडते माझी सैतानी दृष्टि,
काहींच्या काहींच होतसे तिथें तिथे सृष्टि !
रम्य चंद्रिका करपुनि होतो तिचाहि काळोख,
आनंदाच्या या नजरेनें होत महाशोक !
जळती तारा, फुलें करपती, काय कथा यांची ?
निष्प्रेमाने राख जाहली श्रीजगदीशाची !
आग भडकता हृदयामधला ईश्वरही मेला,
निर्दय देवी खेळ एवढा पहा तूंच केला !

आपल्याला प्रेमाची मोहक आशा अनेक वेळां दाखवून व आपल्या मनांतील प्रेमभावनेचा अंकुर ज्यायोगें तराकून बहरेल अशा रितीने वागून शेवटीं प्रेयसीने आपला भयंकर विश्वासघात केला व आपला सत्यानाश केला हा आरोप **निर्दय देवीस** या कवितेंत गडकऱ्यांनी पुन्हा पुन्हा केला आहे. हा आरोप इतका असंदिग्ध आहे व नैराश्यामुळे उत्पन्न झालेला या कवितेंतील वैताग इतका विलक्षण आहे की गडकऱ्याना ही कविता प्रसिद्ध करण्याचा धीर होणेंच शक्य नव्हतें.

निर्दय देवी, हंसता हंसता केले हे काय ?
आग लागली जगास माझ्या, विश्व लया जाय !

प्रेमभावनेचा प्रादुर्भाव, तिचा विकास, प्रेयसीकडून मिळालेला रुकार, व अखेर तिने केलेला अव्हेर या चढत्या क्रमाने घडत गेलेल्या घटनाचा इतिहास पुढील ओळींत आढळेल.

कोमल बाला सौंदर्याची, प्रेमाची खाण,
जाणुनि हृदयीं झेलुनि घे मी तुझे नयनबाण !
प्रेमयाचना करिता देशी हाताही हातात,
गमले नव्हते कीं तू करिशिल असा पुढे घात !
त्या हृदयाची माती माती यापरि केलीस,
कल्पनेत मम शिरून आता पाहत बसलीस !
का हससी निर्दये, दावुनी प्रीति अशी फसवी ?
तव शरिं मरणाराची तळमळ काय तुला हसवी ?
करकमळाचीं दळे दळाशीं लाविनाच अंग,
सर्वस्वाच्या भेटीचा तो गमे पूर्वरंग !
प्रेमाधाचा परि विश्वासें धरुनि असा हात,
टाकिलेस त्या नैराश्याच्या अथाण डोहात !
प्रेमयाचना परिसुनि हंसलिस गालींच्या गालीं
हृदयाच्या रंगाची आली गालावर लाली !
भावि भाग्यसूर्याची माझ्या उषाच ती गमली,
हाय ! निराशारात्रीची या परि संध्या ठरली !

नैराश्याच्या काळोखाच्या या अमावास्येंत भयानक व भीषण दृश्यांखेरीज दुसरे काय दिसणार ?

त्या लाटातुनि भीषणतेच्या निघती या ताना !......
असली कवनें गातां गातां निराशाधकारी
अर्धमेला येऊन पडलों मरणाच्या द्वारीं '...
तुफान दरिया असा नयाच्या हलकल्लोळात
मरणकाळची गाणीं असली बसलों मी गात ! ....

असल्याच भीषण कल्पनाची हाय हाय या कवितेच्या अप्रकाशित कडव्यातहि खैरात झालेली आहे.

तोड तोड त्या दोऱ्या देवा, मन तरि जाऊं दे,
जीव मरू दे, देह जळू दे, काहीं होऊ दे !
एका अंशाची तरि आशा पूर्ण करायास,
उरल्या सुरल्या माझ्या देवा, करि सत्यानाश !

गडकऱ्यांच्या या तीव्र विषादाने भरलेल्या ओळी वाचताच स्विन्बर्नच्या पुढील ओळींची आठवण तितक्याच तीव्रतेने होते.

Ah, had I not taken my life up and given
All that life gives and the years let go,
The wine and honey, the balm and leaven,
The dreams reared high and the hopes brought low ?
Come life, come death, not a word be said;
Should I lose you loving and vex you dead ?
I never shall tell you on earth; and in heaven,
If I cry to you then, will you hear or know ?

१ जून १९१६ रोजीं गडकऱ्यांनी आपलें शेवटचें प्रेमगीत लिहिलें, आणि प्रेमाच्या या ट्रॅजिक नाटकावर आपल्या समजुतीप्रमाणें शेवटचा पडदा टाकला. भावनांचा तीव्र कडवटपणा व नैराश्याच्या पोटीं निर्माण

झालेला वैताग या गोष्टी आता लयाला गेल्या आहेत. आपल्या दुर्दैवाची, कंगाल भाग्याची, कीव करून प्रेयसीचें प्रेम आपल्याच कमनशिबामुळे या जन्मात दुष्प्राप्य ठरलें असलें तरी निदान ते पुढल्या जन्मीं तरी आपल्या जीवनात क्षणभर का होईना, सुखाची व समृद्धीची बरसात करील ही भ्रमिष्ट व वेडी आशा उराशीं बाळगून थोडेंसे खोटे समाधान मिळविण्याची धडपड करणें एवढेंच त्याना आता शक्य आहे. प्रेमनैराश्याच्या उन्मत्त आवेगाच्या क्षणीं प्रेयसीविषयींची जी तिरस्काराची व द्वेषाची भावना निर्माण झाली होती ती भावनाहि आता विरून गेली असून तिची जागा जिव्हाळ्याने व कारुण्याने घेतली आहे. आता ते प्रेमाचें रम्य जग स्वप्ना-प्रमाणें विरून गेलें व त्याच्या रमणीय स्मृतीमुळे डोळ्यात तरारणारीं आसवें तेवढीं मागे राहिलीं आहेत. ज्यासाठी जगावें असें वाटावें तेच नष्ट झाल्या-वर आता जगण्यात तरी काय मतलब ?

> तुटे स्नेहसंबंध सर्वस्वि आता । टाकिता तूं असें या अनाथा ॥
> सात वर्षें, सखे ! हर्षद स्वप्न जें । पाहिले, भोगिले तेच आता ।
> घोरतिमिरा निशा सहज भय देतसे । जीव हा एकला आज उरता ॥
> अश्रुधारा पहा वाहती निर्भरा । चित्त विव्हल, नसे वृत्ति शाता ।
> नयनजलि नाहता, त्यासवें वाहता । पाहिना तुजविना जीव जगता ॥
> जीवनव्याप हा व्यर्थ वाटे पहा । नयनविषयाच ही विश्वसंस्था ।
> कांहिं नाहीं पुढें, जवि तिमिरीं बुडे । स्तिमित वा बधिर वा जात अंता ॥
> नाश तरि सर्वथा होउं दे एकदा । आपदा लोपवी रे कृताता ।
> कष्टला जीव हा दुःखमात्रा वहा । शून्यशा जीविताप्रति वहाता ॥
> यत्न केले, सखे ! रत्न तुजसारखे । कधि तरी व्हावया प्राप्त हातां ।
> अन्य घटना परी नाकळे का करी । देव कीं दैव की तो विधाता !
> जन्म हा व्यर्थसा होत, होवो तसा । सर्वथा शिवपरा ईशसत्ता ।
> प्रेमयज्ञाप्रति प्रथमही आहुति । अपरिहार्यांच जी जविजाता ॥
> एक आशा उरे–( तीच मज पुरे ) । तिजसवें जवि करि एकमयता ।
> "जन्मजन्मातरीं एकदा क्षणभरी । प्रेम लाभो तुझें शोकवाता ॥"

शेवटच्या ओळींतील आर्तता विलक्षण आहे. या साऱ्याच कवितेंत आर्तता व कारुण्य यांचा प्रकर्ष झालेला आहे. असह्य आवेगाच्या क्षणीं

प्रेयसीविषयीं अत्यंत कटु शब्द वापरणाऱ्या गडकऱ्यांच्या अंतर्मनांत तिच्या-विषयीं जी तन्मयता ओतप्रोत भरलेली होती ती सारी या कवितेंत उत्कट-तेनें आविष्कृत झालेली दिसून येईल. डॉ. हर्षे यानी ही कविता काळजी-पूर्वक वाचली असती व तिच्यामधून गडकऱ्याचें अंतरंग समजावून घेण्याचा प्रयत्न केला असता तर हृदयास या कवितेत प्रकट झालेल्या वैतागाबद्दल त्यानी गडकऱ्याना कधीच दोष दिला नसता !

या कवितेंतील 'सात वर्षें' हा कालावधीचा उल्लेखहि अत्यंत महत्त्वाचा आहे. "...सात वर्षेपर्यंत उराशीं बाळगून ठेवलेली ही हर्षद आशा शेवटीं स्वप्नवत् ठरून शेवटीं प्रियमतेचा संबंध सर्वस्वीं तुटल्यामुळें त्याना शेवटचें प्रेमगीत लिहावें लागले आहे" असा डॉ. हर्षे यांनी 'सात वर्षां'चा उल्लेख केला आहे,[२५] व गडकऱ्याचें हे प्रेमप्रकरण सात वर्षे चाललें होतें असें सूचित केलें आहे. या बाबतीत श्री. वि. स. खाडेकर याचेहि मत असेंच आहे. ''या चरणावरून—विशेषतः त्यातील सात वर्षांच्या कालविषयक उल्ले-वरुन—या पुनर्जात प्रेमाचा प्रवाह १९०९ ते १९१६ पर्यंत वाहत असावा असें वाटतें... १९१६त लिहिलेल्या कवितावरूनही १९१६ मध्ये त्याच्या आशावृक्षावर दुर्दैवानें पुन्हा घाला घातला असावा अशी शका येते." इतकें लिहून झाल्यावर या कवितेत गडकऱ्यांनी आपल्या कवितेचा निरोप घेतला असावा व ते नाट्याकडे वळले असावे अशी खाडेकरांना शंका आली. ही शंका स्पष्ट करताना ते म्हणतात—"१९०९ मध्यें गडकऱ्यांची कविता प्रसिद्ध व्हावयाला सुरवात झाली, १९१६ मध्ये पुण्यप्रभाव रंगभूमीवर आल्यानंतर नाट्यलेखनाला स्वतःला वाहून घेण्याचें निश्चित करून गड-कऱ्यांनीं कवितेचा जवळजवळ कायमचा निरोप घेतला. सदरहू कवितेंतील सात वर्षांच्या काळाचा असा अर्थ लावणें अशक्य नाहीं."[२६] खाडेकरानी वर ज्या दोन कल्पना माडलेल्या आहेत त्यापैकी पहिलीच बरोबर आहे. या कवितेंतील सात वर्षांचा उल्लेख गडकऱ्याच्या प्रेमप्रकरणालाच उद्देशून आहे यांत कसलीच शंका नाही. सात वर्षांचा हा उल्लेख वस्तुस्थितीवरच आधारलेला आहे.

या सात वर्षांच्या काळांत प्रेमभावनेतील अनेक छटांची प्रतीति गडकऱ्यांना आली. निष्प्रेम जीवनाची असह्यता, कोणावर तरी प्रेमाची वृष्टि करण्याची तीव्र उत्कठा, निष्काम प्रेमाचा अव्यवहार्य ध्येयवाद, प्रेयसीच्या प्राप्तीची विलक्षण तळमळ, आशेचा प्रादुर्भाव, आशानिराशाचा लपडाव, नैराश्य, औदासीन्य—पुन्हा आशेचा उदय, पुन्हा ‘ हृदयिंचा लपंडाव ’, आणि शेवटी दारुण निराशा व तिच्यातून उद्‌भवलेलें आत्यंतिक औदासीन्य— असा हा सात वर्षातील गडकऱ्यांच्या भावजीवनाचा स्थूल आराखडा आहे. **गीतविरक्ति** ही कविता १९१५ च्या नोव्हेंबरमध्ये प्रसिद्ध झाली. या वेळीं गडकऱ्यांच्या प्रेमप्रकरणातील पहिलें पर्व सपलें. या कवितेंत प्रेमनैराश्याचा स्पष्ट उल्लेख आहे. पण यानंतर थोड्याच दिवसात प्रेमभावनेचा अंकुर ज्यायोगे तरारेल अशी आशापूर्ण परिस्थिति निर्माण झाली. **पुनर्जात प्रेमास** या कवितेचा लेखनकाल उपलब्ध नसला तरी ती याच सुमाराची, म्हणजे १९१५ च्या अखेरची असली पाहिजे. कोंडलेल्या भावनांना वाट करून देण्यासाठीच ही कविता गडकऱ्यानी लिहिली असून तिच्यांत प्रेमाचा प्रभाव अगदी स्पष्टपणे वर्णिला आहे. **प्रेमाखातर** ही कविताहि याच्याच आसपास लिहिलेली असली पाहिजे. “ प्रेमनिराशेमुळें हेतुशून्य व हताश झालेल्या मनुष्याला पुन्हां प्रेमाचा आधार सांपडला म्हणजे नवा जीव लाभतो ” अशी स्वतः गडकऱ्यानीच या कवितेला प्रास्ताविक टीप जोडली आहे. याहि कवितेंत प्रेमाचा विलक्षण प्रभाव गडकऱ्याना वर्णावयाचा आहे. तथापि

> तशात हें तर निराशेतुनी प्रेम जन्मलेले !

ही या कवितेंतील ओळ अत्यंत महत्त्वाची आहे. गडकऱ्याच्या पुनर्जात प्रेमाचा, आशेच्या उद्‌भवाचा, या ओळींत आपणास प्रत्यय येईल. पुनर्जात प्रेमाच्या या प्रकरणावर १९१६ च्या मे महिन्याच्या अखेरीस शेवटचा पडदा पडला. १ जून १९१६ रोजीं लिहिलेली **शेवटचें प्रेमगीत** ही कविता याचा बलवत्तर पुरावा होय. **अल्लड प्रेमास** या १९०९ सालीं लिहिलेल्या कवितेंत प्रेमभावनेच्या सुखसंवेदनेची पहिली

ओझरती झुळूक जाणवेल; आणि १९१६ च्या जूनमध्ये लिहिलेल्या **शेवटचें प्रेमगीत** या कवितेंत भयानक वादळानंतरचा भीषण उद्ध्वस्तपणा व ओसाडपणा अत्यंत तीव्रतेनें जाणवेल. असा हा गडकऱ्यांच्या भावजीवनाचा १९०९ ते १९१६ या सात वर्षातील इतिहास आहे. हें लक्षात घेतलें असता

सात वर्षें, सखे ! हर्षद स्वप्न जें। पाहिलें

या प्रसिद्ध ओळींतील मर्म उकलेल.

हे ' हर्षद स्वप्न ' दुर्दैवाने विरून गेल्यानंतर गडकऱ्यांनी **पुण्यप्रभाव** हें नाटक लिहिलें असावें. श्री. खांडेकरांच्या मतें **पुण्यप्रभाव** गडकऱ्यांनी १९१५ च्या अखेरीसच पूर्ण केलें. याविषयीं कोणता लेखी पुरावा खांडेकरांना उपलब्ध झाला हें मला माहीत नाही. परंतु गडकऱ्यांच्या कवितांचा व **पुण्यप्रभावा**च्या पहिल्या अंकाचा अतिशय सूक्ष्मपणें पुन्हा विचार केल्यानंतर १९१६ च्या मेमध्ये ( किंवा त्यापूर्वीं थोडे दिवस ) गडकऱ्यांच्या प्रेमनाटकाचें भरतवाक्य आटोपल्यावर व **शेवटचें प्रेमगीत** ही कविता लिहिल्यानंतर त्यांनी **पुण्यप्रभाव** लिहिलें असावें असें मला निःसंदेहपणें वाटतें ( लेखी किंवा इतर एखाद्या प्रकारचा बलवत्तर पुरावा उपलब्ध झालाच तर माझें हें विधान बदलावें लागेल व यापुढचा मजकूर पुन्हा लिहून काढावा लागेल हें अगदी उघड आहे !—आणि या गोष्टीला माझी केव्हाहि तयारी आहे. ) **पुण्यप्रभाव** नाटकाला गडकऱ्यांच्या प्रेमप्रकरणाचाच संपूर्ण आधार आहे असें मला वाटतें. **पुण्यप्रभावां**तील अगदी महत्त्वाच्या घटनांना वस्तुस्थितीचा भरपूर आधार आहे अशी मला जी माहिती मिळाली आहे तिच्यामुळे माझी खात्री झाली आहे. वसुंधरा, ईश्वर, भूपाल व वृंदावन या चार प्रमुख व्यक्ति म्हणजे सत्यसृष्टींतील व्यक्तींचींच प्रतिबिंबें होत. गडकऱ्यांचें सात वर्षांचें ' हर्षद स्वप्न ' विरून जाण्यास सत्यसृष्टींतील जी 'निर्दय' बाला कारणीभूत झाली तीच नाटकांत वसुंधरेच्या रूपानें अवतरली; आणि स्वतः गडकऱ्यांनी विरक्त ईश्वराचा वेष धारण केला. प्रेमभंगाच्या दारुण आघातामुळे कांही काळ विलक्षण कडवटपणा गडकऱ्यां-

या मनांत निमाण झाला होता हे खरे आहे. आणि हा कडवटपणा पूर्ण-णें कधीच नष्ट झाला नाही हेंहि खरे आहे. तथापि, आपल्या मनो-विकाराना थोडासा आवर घालणे गडकऱ्याना ज्या वेळीं शक्य झालें असेल व्हा कडवटपणाचें भीषण थैमान कमी झालें असेल, आणि प्रेयसीविषयींच्या अनेक प्रेमपूर्ण स्मृतींच्या कल्लोळाचा प्रभाव जाणवू लागताच आपल्या नैराश भावनाचें उदात्तीकरण करून चित्ताच्या असह्य व्यथा कांहीशा सह्य करण्याची त्यांनी अनिवार धडपड केली असेल. दिव्य प्रेमाची ज्योति या कवितेंत ज्या निरभिलाष व उदात्त प्रेमाचें गडकऱ्यानी पूर्वी गायन केले होते त्याच निरभिलाष, निष्काम, शुद्ध प्रेमाच्या कल्पनेचा त्हा अवलंब केल्याशिवाय त्याच्या भग्न हृदयाला समाधान मिळणें शक्यच व्हतें. अर्थात् हे समाधान अगदींच तकलुपी व दीनवाणें होतें हें खरें आहे. ण या प्रकारचें कंगाल समाधान थोडा वेळ मिळवून त्यात धुंद होण्याची गडकऱ्यानी पुण्यप्रभावांतील ईश्वर व वसुधरा याच्या द्वारें खटपट करून पाहिली इतकें मात्र खरें. पहिल्या अंकाच्या पहिल्या प्रवेशांत ईश्वर व वसुंधरा याच्या संवादात गडकऱ्याच्या स्वभावांतील काही महत्त्वाचीं वैशिष्टये ईश्वराच्या तोंडून प्रकट झालीं आहेत. गडकऱ्याच्या मनात ज्या परस्परविरोधी भावनाचा विलक्षण कोलाहल या वेळीं चाललेला होता त्याच्या स्पष्ट खुणा ईश्वराच्या उद्गारात जागोजागीं आढळतील. वसुंधरे-विषयींची अभिलाषा मनाच्या अगदी आतल्या कप्प्यात दडवून ठेवून ईश्वर तिच्याविषयींच्या आपल्या भावनाचें पुढीलप्रमाणें उदात्तीकरण करीत आहे.

" आजपर्यंतच्या माझ्या मनातल्या विचारांत वावरणारी तुझी मूर्ति एका कुमारिकेची होती आणि कुमारिकेबद्दलच्या निर्दोष अभिलाषदृष्टीनेंच मी तिच्याकडे पाहत आलों. तिच्या हानीबद्दलचे माझे निःश्वासही याच कारणामुळे क्षम्य आहेत......तुझ्या बदललेल्या स्थितीची कल्पना एकदा नीट बसली म्हणजे कुमारिके-बद्दलच्या शुद्ध प्रीतीचें, पत्नीपदारूढ झालेल्या पतिव्रतेविषयींच्या उज्ज्वल भक्तींत संक्रमण होईल. ही निर्लोभ दृष्टि एकदां झाली म्हणजे झालें ! उच्चपदीं विराजणाऱ्या सौंदर्याबद्दल अभिलाषबुद्धी-

ऐवजीं आदरभाव उत्पन्न होतो ... दिव्य सौंदर्याच्या सानिध्याने मनोवृत्ति निवळतील कीं गढूळ होतील ? ”

पुण्यप्रभावांतील ईश्वर म्हणजे स्वतः गडकरीच या माझ्या विधानाला फार मोठी पुष्टि देणारा एक महत्त्वाचा पुरावा मला श्री. अण्णासाहेब कारखानीस यांच्याकडून मिळाला.

एका विवाहसंमारंभाच्या प्रसंगीं मंडपातील एका मुलीला उद्देशून गडकऱ्यानी जे उद्‌गार आपल्याजवळ काढले तेच पुण्यप्रभावाच्या पहिल्या अंकाच्या पहिल्या प्रवेशात ईश्वराच्या तोंडीं फारच थोड्या फरकाने आले आहेत असें कारखानीस म्हणाले. “ आज दीनाराला असा पाहून त्याना ( म्हणजे वसुधरेच्या वडिलाना ) जितका आनद झाला असता तितकाच तुम्हाला असें पाहून त्यांना खेदहि झाला असता ” असें वसुंधरा ईश्वराला म्हणते. त्यावर ईश्वर स्वतःशीं बोलतो —

“ या मुलाकडे पाहताच माझ्या मनात विलक्षण असबद्ध कल्पनाचें काहूर उद्‌भवल्यामुळें मी इतका भाबावून गेलों आहें, कीं याला जवळ घेतला तर हा हातातून खालीं पडेल.

कारखानिसानी ज्या वाक्याचा उल्लेख केला तें हें वाक्य होय. ज्या मुलीला उद्देशून प्रत्यक्षात वरील आशयाचे उद्‌गार गडकऱ्यानी कारखानिसांच्या जवळ काढले तीच पुण्यप्रभावांत वसुधरेच्या रूपाने पुन्हा अवतीर्ण झाली असली पाहिजे असा तर्क केला तर तो वस्तुस्थितीशीं बहुशीं जुळेल असें मानण्याइतपत ऐकीव पुरावा माझ्याजवळ असल्यामुळेच सत्यसृष्टींतील गडकऱ्यांची प्रेयसी हीच पुण्यप्रभावातील वसुंधरा, व प्रेमनैराश्याच्या दारुण व्यथाचा अनुभव घेत असताच तिच्याविषयींच्या कटु भावना व तिच्याविषयींचे खरें प्रेम याच्या कात्रींत सापडून आपल्या भावनाचें उदात्तीकरण करण्याचा अनावर प्रयत्न करणारे स्वतः गडकरी म्हणजेच पुण्यप्रभावांतील ईश्वर असें समीकरण माडण्याचें धाडस मी करीत आहें.

याशीं विरोधी असा फारच बलवत्तर लेखी पुरावा उजेडात येऊन माझी खात्री पटेपर्यंत वरील विधान मागे घेण्याचें कारण मला पडणार नाही. श्री. खांडेकर म्हणतात त्याप्रमाणे गडकऱ्यानी १९१५ च्या अखेर **पुण्यप्रभाव** पूर्ण केलें आणि १९१६ च्या जूनमध्ये तें रंगभूमीवर आले हें विधान कागदपत्राच्या पुराव्यानिशीं जर खरें ठरलें तर **पुण्यप्रभावा**विषयीं वर जें विवेचन मीं केले आहे ते सुधारून घ्यावे लागेल हें उघड आहे; आणि तसें तें मी सुधारून घेईनहि. पण, जून १९१६ नतर गडकऱ्यानी **पुण्यप्रभाव** पूर्ण केले असलें पाहिजे असे मला त्यांच्या कविताच्या सूक्ष्म अभ्यासानंतर व ऐकलेल्या माहितीची काळजीपूर्वक छाननी केल्यानतर वाटू लागलें; आणि आजहि मला तसेच वाटत आहे.

आपल्या भावनाचे ' सब्लिमेशन ' गडकऱ्यांनी ईश्वराची व्यक्तिरेखा निर्माण करून केले. आपल्या प्रेमविषयक उदात्त ध्येयवादाचें — कल्पनारम्य ध्येयवादाचे — साफल्य अशा रीतीने त्याना नाट्यसृष्टींत करून घेता आलें. परंतु कल्पनारम्य ध्येयसृष्टीतील ईश्वराचा उदात्त ध्येयवाद कठोर व्यावहारिक जगतात वावरणाऱ्या गडकऱ्याना व्यवहारात मात्र उतरविता आला नाही. वसुंधरेच्या प्राप्तीची आशा कायमची नष्ट झाल्यावर, विवाहामुळे ती कायमची दुरावल्यावर सुद्धा, आपण विवाह करावा असा विचार चुकून देखील ईश्वराच्या मनांत येत नाही हें लक्षात ठेवण्यासारखें आहे. " ... तुम्ही एखादी स्त्री पाहून विवाहसुखांत संसारी आयुष्य घालविण्याचा विचार का करीत नाहीं ? " असा सूचक प्रश्न वसुंधरा ईश्वराला विचारते. यावर ईश्वर तिला उत्तर देतो — " ज्या सुखाची लहानपणापासून आशा केली तें परत मिळण्याची आतां आशा नाहीं म्हणून. वसुंधरे, यापेक्षा स्पष्ट बोललों तर त्याची पापात जमा होईल. " ईश्वराने यापेक्षा अधिक स्पष्ट बोलण्याची काहीच जरूर नाही. त्याच्या मनांतील विचार आपणाला सहज कळून येतील. ईश्वर पुढे म्हणतो —

> "...... तुझ्यासारख्या त्रिभुवनदेवतेला सावधिक संसाराच्या साम्राज्यांत राणी केल्यानंतर......उत्साहाने लहानपणापासून

कमावीत आणलेली बुद्धिमत्ता, मानसशक्ति आणि बाहुबल आतां एखाद्या सजीव बाहुलीला सजविण्यासाठीं खर्च करीत बसूं आणि त्यांत सर्वस्वाचें सार्थक मानूं ? ”

ईश्वराचा हा उदात्त व प्रखर ध्येयवाद स्वतः गडकऱ्यांना व्यवहारात झेपला नाही. १९१७ च्या जूनमध्ये त्यानी विवाह केला यावरूनच हें स्पष्ट होत आहे. ध्येयवादाच्या आदर्शभूत व कल्पनारम्य सृष्टीवर व्यावहारिक जगताची आणखी एकदा मात झाली असाच याचा अर्थ आहे ! आणि

नवीं बधनें तुला लाभलीं—आणि लाभतिल तशीं मला

या ओळींत स्वतः गडकऱ्यानीच आपल्या या वैक्लव्याची स्पष्ट कबुली देऊन टाकली नाही काय ?

* * *

जविनव्याप हा व्यर्थ वाटे पहा
नाश तरि सर्वथा होउ दे एकदा। आपदा लोपवीं रे कृताता ॥

या शेवटचें प्रेमगीत या कवितेंतील ओळींत व्यक्त होणारी सर्वस्वाच्या सत्यानाशाची व मृत्यूची कल्पना यापुढे गडकऱ्याच्या मनात सतत घोळत राहिली असली पाहिजे. या असल्याच मानसिक क्षोभाचा अतिरेक झाला असतां शेवटची कविता ही कविता त्यांनी लिहिली असावी. ही अपूर्ण कविता त्यांनी प्रकाशित मात्र केली नाही. १९४४ साली समीक्षक मासिकाच्या गडकरी विशेषांकांत ती प्रथम प्रसिद्ध झाली. या कवितेला स्वतः गडकऱ्यांनी पुढील प्रास्ताविक टीप जोडली आहे.

“शेवटची कविता ! माझी शेवटची कविता ! तिला प्रस्तावना काय लिहूं ! माझी उद्यांची अनाथ कवितादेवी–देवि, तूंच काय लिहावयाचें तें लिही ! ”

सर्वत्र खिन्नता व शून्यता भरलेली असून जिवाचा विलक्षण कोंडमारा झालेला आहे, करपलेल्या आशेच्या आगीच्या ज्वाळा भडकल्या आहेत,

आणि असल्या या परिस्थितींत आपलें सारें कवित्व, सारी प्रतिभा पार लयाला गेली आहे असें गडकरी म्हणतात. कवित्वाची ऊर्मि लयाला गेली आहे, इतकेंच नव्हे तर त्या कवित्वाचें हृदयांत खोलवर रुजलेलें रोपटें आपणच मुळापासून उपटून टाकावयाचा निर्धार केला आहे असेंहि ते म्हणत आहेत.

स्वप्नामधल्या स्वप्नातहि मज येत काळझोंप
म्हणुनी हृदयातुनी उपटितों नवलाचे रोप !
राग नका धरू हतभाग्याचा ऐकुनि आकांत......
वाहूं द्या हा मम कवितेचा प्रवाह शेवटचा,
ऐकूं द्या हा तिजला माझा निरोप शेवटचा

जगतातील कसल्याहि सौंदर्याचा—मानवी सौंदर्याचा व कलेंतील सौंदर्याचा—आपल्या मनावर यापुढे यत्किंचितहि परिणाम होणार नाही, तो होऊं नये, अशी इच्छा कवीच्या मनांत प्रादुर्भूत झाली आहे. प्रतिभेचे पंखच कापून टाकावे अशीहि विचित्र लालसा त्याच्या मनाला ग्रासून टाकीत आहे.

गा विहगानों, कवीश्वरांनों, गगनगायकानों !
हसा मुलानो, हसा फुलानों, हंसा तारकानों !... ..
पाहत नाहीं सौंदर्याच्या मोहकतर लीला !... ..
हे प्रतिभेचे पंख कापितों माझ्या हाताहीं !
चमक सारखी इकडुन तिकडे तूं चंचल बिजली,
स्थिरावली कल्पना जागच्या जागीं ती थिजली !......
नवयुवतींच्या नेत्रकिरणिं जरि कुणि केलीं जाळीं,
तोडिन तरि मी क्षणार्धांत तीं सारी या काळीं !......
मज रिझवाया कालिदास वा येऊं द्या बाण,
सगचे बिल खरी करि मज अभेद्य पाषाण !

इच्छा, उपभोग व विषय हें गीत गडकऱ्यांनी २२ नोव्हेंबर १९१६ रोजीं लिहिलें.

When the lamp is shattered,
The light in the dust lies dead

या ओळींनी सुरू होणाऱ्या शेलीच्या प्रसिद्ध गीतांतील कल्पनेसारखीच कल्पना गडकऱ्याच्या या गीतात आढळेल.

अखंड गायन ऐकायाते पंजरात धरिला पक्षी,
उडती लकेर झरता, जीवा ! नादचित्र केवळ लक्षी !

तथापि मानवी इच्छेची विफलता व जगाची अपूर्णता याच गोष्टींवर या कवितेंत गडकऱ्याना भर द्यावयाचा आहे हें शेवटच्या दोन ओळींवरून स्पष्ट दिसते.

' असे–असावे ' याच्या सीमा अपूर्णता ही दावितसे,
' गोविंदाग्रज ' सनि श्वास मग नभाकडे क्षण पाहतसे !

या कवितेच्या पूर्वी आठच दिवस लिहिलेल्या **प्रेमाची प्रामाणिकता** या कवितेत गडकऱ्यानी प्रिय व्यक्तीला सर्वस्वाचें दान करणें, साऱ्या भावना, सारें अंतर्बाह्य हृदय तिला अर्पण करून तिच्याशीं तादात्म्य पावण्याची तळमळ बाळगणें हेंच खऱ्या प्रामाणिक प्रेमाचे लक्षण होय असें स्पष्टपणे सांगितले आहे प्रिय व्यक्तींत सारें चित्त केंद्रित करणें ही गोष्ट धोरणी व्यवहाराच्या दृष्टीने स्पृहणीय नसेलहि. पण उत्कट प्रेमाची खरी परिपूर्ति असल्या ऐकांतिक तादात्म्याखेरीज होणें शक्यच नाही ही गड-कऱ्यांची एक आवडती कल्पना होती. त्यांचें सारें भावजीवन म्हणजे याच कल्पनेचें प्रात्याक्षिक आहे हें आपण त्यांच्या अनेक प्रेमगीतांच्या साह्या-य्याने मागे पाहिलेंच आहे. प्रस्तुत कवितेच्या शेवटच्या चार ओळींत ऐकांतिक तादात्म्याची व संपूर्ण हृदयार्पणाचीच कल्पना पुन्हा एकदा आविष्कृत झाली आहे.

हृदयार्पण जरि करणे आहे स्पष्ट दान तरि करावया,
अश्रुजलासह अर्पावें या पुण्यमार्गे एकच सखया !
स्वप्रेमातें लपवायाचा बोध तुझा लाभो तुजला,
' गोविंदाग्रज ' वाहिल प्रेमा हृदयासह निज अश्रुजला !

प्रेमविषयाशीं तादात्म्य पावण्याच्या व संपूर्ण हृदयार्पण करण्याच्या या आतिरेकी आसक्तीमुळेच गडकऱ्यांना नैराश्याच्या दारुण व्यथा भोगाव्या लागल्या नाहीत काय ?

या मनोभंगाचा व नैराश्याचा सूचक उल्लेख १९ एप्रिल १९१७ रोजीं लिहिलेल्या **तीन तरी** या कल्पनाविलासाने नटलेल्या उत्कृष्ट गीतांत आलेला आहे. जें घडू नये तें घडून गेल्यावर आपल्या इच्छेप्रमाणें पुन्हा घडाविणें, विस्कटलेली घडी पुन्हा बसाविणें, या गोष्टी जगांत शक्य झाल्या तर! —तर किती तरी मानवी दुःखांचा परिहार होईल. पण– !

> हार घेउनी धार पळाली, पुन्हा आणणे कुणी तरी ?
> लवून गेली बहार बिजली, पुन्हा पाहणे कुणीं तरी ?...
> लाट जळातरिं पळात जिरली, पुन्हा चढविणे कुणी तरी ? ..
> सूर विराला वाऱ्यावरतीं, पुन्हा छेडणे कुणीं तरी ? ...
> घडू नये तें घडून गेले, पुन्हा घडविणे कुणीं तरी ?......

प्रेमसाफल्यासाठी सतत तळमळणाऱ्या गडकऱ्याचा दारुण आशाभग झाला नसता तर—त्याच्या अमर्याद इच्छाची निराशा झाली नसती तर ! — तर काय झालें असतें ? त्याच्या जीवनाला निराळें वळण लागलें असते ? त्यांचें जीवन यशस्वी व समृद्ध झालें असते ? त्यांच्या प्रतिभेला अधिक रमणीय बहर आला असता ? त्याचे कवित्व अधिक मनोहर झालें असतें ? शक्य आहे. निदान गडकऱ्याना तरी तसे खास वाटत असावें. प्रेमभंगाच्या वेदनेमुळे आपला घात झाला, प्रीतीने आपली वंचना केली नसती तर आपल्या मनाचा घात टळला असता, असें गडकरी **कथाशेष** या अप्रकाशित अपूर्ण खंडकाव्यात स्पष्टपणें म्हणत आहेत.

> क्षणाचि आणखी एक, शब्द वा एक, एक दृक्पात,
> जरी लाभता तरि हा चुकता असा मनाचा घात !

गडकऱ्यांच्या या ओळी वाचल्याबरोबर

> "I should have had her when I was in health and I should have remained well."

या कीट्सने आपली प्रेयसी फॅनी ब्रॉन् हिला उद्देशून काढलेल्या उद्‌गाराची आठवण होणें स्वाभाविक आहे.

ज्या प्रीतीने गडकऱ्यांची अत्यंत दारुण वंचना केली, व सर्वस्वाचा सत्यानाश झाल्यास बरें अशी विचित्र तळमळ त्याच्या मनांत निर्माण केली त्या प्रीतीचा केवढा विलक्षण परिणाम त्यांच्या मनावर झालेला होता, त्या प्रीतीची नुसती स्मृति सुद्धा त्यांना किती बेचैन करून टाकीत होती हें त्यांच्या एका अप्रकाशित कवितेवरून दिसून येईल. शेवटचें प्रेमगीत लिहिलें म्हणजे तें गीत ज्यांच्यामुळे निर्माण झालें त्या घटनांची स्मृति सर्वस्वीं नष्ट होणें कसें शक्य आहे ? ती स्मृति सदैव जागृत राहून मनाला बेचैन करणारच. स्मृतीचा हा प्रभाव जुन्या प्रेमास या कवितेत दिसून येईल. ही कविता समीक्षक गडकरी विशेषाकात ( १९४४ ) प्रथम प्रसिद्ध झाली.

प्रेमाची भाषणें परिसतां किंवा वदता तद्विषयीं,
तुझी स्मृति क्षणमात्र होत मज, लहरी नाचवि जी हृदयीं !
तुटला आतां ऋणानुबंधाचि—कुणी कुणाचें जरि नाहीं,
तरी न विसरे जीव—आपुलें गूढ असे जें मनिं काहीं !

* *

नवीं बंधनें तुला लाभलीं—आणि लाभतिल तशीं मला,
परंतु गेली पाहिली प्रीति......

या दोन ओळींत प्रेयसीच्या विवाहाचा स्पष्ट उलेख आहे. तिला जशीं नवीं बंधनें लाभलीं, नवीन मायापाश लाभले, तशींच नवीं बंधनें व व नवीन मायापाश आपल्यालाहि लाभतील असें गडकरी म्हणत आहेत. १९१७ सालीं गडकऱ्यांनी दुसरा विवाह केला. या विवाहाला उद्देशूनच ' आणि लाभतिल तशीं मला ' हें वाक्य गडकऱ्यानी लिहिलें असलें पाहिजे. निराशेच्या दारुण आघातामुळे उत्पन्न झालेल्या भावनांचा अनावर क्षोभ ओसरल्यावर ही व्यवहारीपणाची जाणीव गडकऱ्याना झालेली दिसते असेंहि कोणी म्हणतील. आणि स्वतः गडकऱ्यांनीच ही कबुली दिलेली आहे.

व्यवहाराची बुद्धि मन्मना तुजपासुनि ओढुनि नेई !

प्रेमभंगाची व्यथा कितीहि असह्य व दारुण असली व तिच्यामुळे होणारें दुःख कितीहि अनावर असलें तरी कालांतराने त्या व्यथेची असह्यता थोडी तरी कमी होणारच. आणि तें दुःख थोडें तरी हलके होणारच. प्रेमभंगाचा धक्का कितीहि भयकर असला तरी त्यामुळे माणसें काही मरत नाहीत हें खरें आहे. आणि यामुळे व्यवहाराची जाणीव केव्हा तरी झाली तर त्यात काहीच नवल नाही. पण अशी जाणीव होणे शक्य असले तरी अत्यंत उत्कट प्रीतीचा प्रभाव कायमचा नष्ट होईल हे मात्र मुळीच शक्य नाही. ट्रायंफ ऑफ् टाइम या कवितेत स्विन्बर्नने हीच कल्पना मांडली आहे.

The grief shall endure not for ever, I know.

परंतु हें दुःख कालांतराने सह्य झाले तरी गतकाळातील प्रेमभावनेची स्मृति मात्र तशीच बलवत्तर राहणार आणि त्या स्मृतीचा सुवास जीवनात सदैव दरवळत राहणार हें उघड आहे. पण त्या प्रीतींतील उत्कटतेची प्रतीति पुन्हा अनुभवास येईल याची खात्री कशी देता येणार ?

नवी बंधनें तुला लाभलीं—आणि लाभतिल तशीं मला,
परंतु गेली पहिली प्रीति .

या गडकऱ्यांच्या ओळींतील कल्पनेमारखीच कल्पना स्विन्बर्नच्या पुढील ओळींत आढळेल. 'व्यवहाराची बुद्धि' असें गडकऱ्यांनी ज्याचे वर्णन केलें आहे त्या व्यवहारी बुद्धीचेहि स्वरूप स्विन्बर्नच्या ओळींत प्रकट झालें आहे.

I shall go my ways, tread out my measure,
Fill the days of my daily breath
With fugitive things not good to treasure,
Do as the world doth, say as it saith ,
But if we had loved each other—O sweet,
Had you felt, lying under the palms of your feet,
The heart of my heart, beating harder with pleasure
To feel you tread me to dust and death—

आणि गडकरी म्हणतात---

नवी बधने तुला लाभतिल—आणि लाभतिल तशीं मला,
परतु गेली पहिली प्रीति—प्रीति प्रतिपचन्द्रकला !
व्यवहाराची बुद्धि मन्मना तुजपासुनि ओढुनि नेई,
मदिरेची ही भ्रष्ट दिव्यता स्वतत्रता मजला देई

शेवटच्या ओळींतील मदिरेच्या ' भ्रष्ट दिव्यते ' चा उल्लेख चिंतनीय आहे आपल्या मनाला झालेल्या असह्य व दारुण वेदना मदिरेच्या साहाय्यानेच विसरून जाण्याची आपण धडपड करणार असे तर गडकऱ्याना सुचवावयाचें नाही ना ? तसेच असावें असें मला वाटते. आपल्या चित्ताला नष्ट झालेलें स्वास्थ्य थोड फार मिळवून देणें एका मदिरेलाच शक्य आहे, तीच आता आपल्याला व्यथापासून मुक्त करू शकेल असें गडकऱ्याना वाटलें असेल असा तर्क करण्यास काहीच हरकत नाही.

More dismal cares
Seize on me unawares
Where shall I learn to get my peace again ?

असा आर्त प्रश्न कीट्सप्रमाणेंच गडकऱ्यानीहि स्वतःच्या मनाला वेड्याप्रमाणें विचारला असेल, आणि मदिरा त्याच्या हाकेसरशी धावूनहि आली असेल. नाही तरी मदिरेचे हे सामर्थ्य गडकऱ्यानी पुण्यप्रभावाच्या दुसऱ्या अकाच्या दुसऱ्या प्रवेशात गौरविलें होतेच. भूपाल म्हणतो—

" ऐहिक मोहकतेला भुलून मनाला जगाशीं चिकटवणारी जाणीव विसरण्यासाठीं द्राक्षासवाचा घोट घेतलाच पाहिजे !.. .. असल्या उन्मादाखेरीज जगाचा जाणीवपणानें निरोप घ्यायला धीर होणार नाहीं ! "

एकदा केलेल्या अत्यत उत्कट प्रीतीची स्मृति कशी विसरावी असा प्रश्न कीट्सने एका कवितेंत स्वतःच्या मनालाच विचारला आहे.

Touch has a memory. O say, love, say,
What can I do to kill it and be free
In my old liberty ?

मदिरेचें सेवन करावें काय ? छे, मदिरा ही सुखी व समृद्ध माणसा-साठीच आहे. दुःखी व गाजलेल्या माणसाना मदिरेचा काय उपयोग ?

> Shall I gulp wine ? No, that is vulgarism,
> A heresy and schism,
> Foisted into the canon law of love ,—
> No,—wine is only sweet to happy men

आपली व्यथा विसरण्यासाठी मदिरा हे साधन उपयोगी पडणार नाही असे कीट्सला वाटत असलें तरी गडकऱ्याना तसें वाटत नाही. मदिरेची दिव्यता—ती दिव्यता 'भ्रष्ट' असली तरी—आपल्याला स्वास्थ्य प्राप्त करून देईल असे त्याना वाटत आहे. असह्य प्रेमभंगामुळे उत्पन्न झालेल्या व्यथा नष्ट करण्यासाठी मदिरेच्या भ्रष्ट दिव्यतेची विशेष मदत घेण्याची कल्पना गडकऱ्याच्या मनात या वेळीं थैमान घालीत असली पाहिजे. 'साऱ्या जगाचा जितेपणींच कायमचा निरोप ' घेणें मदिरेशिवाय कसें शक्य आहे ? प्रेमभगापासून होणाऱ्या यातनाचा विसर पडावा यासाठी **एकच प्याला** या नाटकातील भगीरथहि अशाच रीतीने दारूच्या आहारीं जातो. 'दारू-पासून सुख नाहीं हे खर,' अशी कबुली देऊनहि ' दुःखी जीवाला दारू सुखाचं स्वप्न तरी दाखविते खास ' ही कल्पना भगीरथाच्या मनात प्रबळ आहे. ससाराचा अत्यंत कडु अनुभव आल्यामुळे त्या अनुभवाची विस्मृति होण्यासाठी मदिरेखेरीज अन्य उपाय नाही असे भगीरथाला वाटत आहे. तो रामलालला म्हणतो—

> " संसाराच्या सुरवातीलाच माझा प्रेमभंग झालेला आहे. ज्या मुलीवर माझं प्रेम होत तिचं दुसऱ्याशीं लग्न लागलं आणि ससा-राला रामराम ठोकून मी असा फकीर बनलो. "

भगीरथाची ही कथा म्हणजे खुद्द गडकऱ्याचीच कथा होय. आणि भगीरथाप्रमाणेंच गडकरीहि मदिरेच्या भ्रष्ट दिव्यतेंत तरणोपाय शोधू पाहत आहेत. गडकऱ्याच्या सारख्या पराकाष्ठेच्या भावनाप्रधान, मानी, व लहरी माणसाला प्रेमभगाच्या असल्या भयकर वेदना सहन होणेंच शक्य

नाही. **एकच प्याला** नाटकाच्या पहिल्याच प्रवेशात रामलालने सुधाकराचे जें वर्णन केलें आहे तें थोड्या फार फरकाने गडकऱ्यानाहि लागू करता येण्यासारखें आहे.

> "सुधाकर बुद्धिवान् आहे. तो जात्याच मानी आहे आणि केवळ स्वावलंबनानं नावलौकिकाला चढल्यामुळें त्याचा मूळचा मानीपणा हल्लीं इतक्या उग्र स्वरूपाचा झाला आहे कीं, तो त्याच्या चांगल्या मित्रांना सुद्धा असह्य होईल......सिंधू, त्याच्या अफाट बुद्धिमत्तेला पुरून उरण्याजोग्या कामागिरीमध्ये त्याला नेहमीं गुंतवून ठेव. कधींकाळीं त्याचा मनोभंग झाला तर ......"

गडकऱ्यांच्या बाबतींत काव्याच्या उपासनेने त्याच्या मनोभंगाच्या व्यथा कमी केल्या असत्या, आणि तशा त्या थोड्या फार कमी झाल्या सुद्धा. पण मनोव्यथा असह्य झाल्यावर मदिरेची गुंगी मोहक वाटू लागते, तिने अनेक तापदायक दुःखाचा विसर पडतो. 'जगाचा जाणीवपणानें निरोप' घेण्यासाठी भूपाल मदिरेचें साहाय्य घेऊं इच्छितो, आणि 'साऱ्या जगाचा जितेपणींच कायमचा निरोप' घेणें शक्य व्हावे म्हणून भगीरथ मदिरेच्या तावडींत सापडतो. नेमक्या याच कारणासाठी गडकऱ्यानी मदिरेच्या भ्रष्ट दिव्यतेचें साहाय्य घेणें जरूर झालें आहे. मदिरेची ही दिव्यता भ्रष्ट असल्यामुळे तिने आपला प्रभाव गाजविलाच; आणि त्या दिव्यतेचा मोह शेवटीं इतका अनावर झाला की, ज्या मदिरेने सर्वस्वाचा घात केला तिच्यांतच आपला तरणोपाय आहे असें सुधाकराप्रमाणें गडकऱ्यांना सुद्धा वाटूं लागलें. अधःपाताची भ्रष्टता परिसीमेला पोंचल्यावर जीवन जेव्हा असह्य होतें तेव्हा मृत्यूची आराधना करण्याशिवाय दुसरा कोणता मार्ग उरतो ? प्रेमभंग झाल्यानंतर गडकऱ्यांनी ज्या कविता लिहिल्या त्याच्यामध्ये मरणाची ही ओढ अनावर झालेली दिसून येते. 'अर्धामेला येऊनि पडलों मरणाच्या द्वारीं,' 'जीव मरूं दे, देह जळूं दे, कांहीं होऊं दे' इत्यादि ओळींमध्ये दिसून येणारी ही मृत्यूची आसक्ति यापुढे वाढतच गेली असली पाहिजे. सुधाकराच्या भाषणात ( **एकच प्याला**, अंक ४, प्र. ४) मृत्यूची

जी अनावर ओढ दिसून येते तिचा उगम गडकऱ्यांच्या स्वतःच्या मनोवृत्तींतच आहे यांत कसलीहि शंका नाही. सुधाकर रामलालला म्हणतो—

"....पण तुझ्याहूनही माझा एक अधिक जिवलग मित्र, अधिक निस्सीम हितकर्ता—माझाच नाहीं, एकंदर जगाचा—जीवमात्राचा एक जिवलग मित्र, निस्सीम हितकर्ता आहे. त्याच्या सन्मानाचा मी प्रयत्न करीत आहें. ज्याच्यापुढ धन्वंतरीनसुद्धां हात टेकले आहेत, अशा रोगाच्या यातनानीं तळमळणाऱ्या जीवाला अखेर कोण हात देतो ? मृत्यु ! ... यमाला सामोरा जाण्यासाठीं या दुबळ्या देहात मी दारून तकवा आणीत आहे. रामलाल, दुसऱ्याचा नाश केल्यामुळें खून चढतो खरा, पण मी ही आत्महत्या करीत आहे, तिचाच मला खून चढत चालला आहे."

आपले हें म्हणणे पश्चात्तापाचें नसून ते 'विषारी निराशेचं' आहे असेंहि सुधाकर स्पष्टपणे रामलालला सागत आहे.

"तो निकाल ( म्हणजे मृत्यु ) जवळ आणण्यासाठीं अशी भराभर दारू घेत बसणं एवढच या जगांत माझ काम आहे."

सुधाकराच्या वैतागाने भरलेल्या या उद्गारात गडकऱ्यांचेच मन प्रकट झालें आहे. 'भराभर दारू घेत बसण' हे कशासाठी ? मृत्यु शक्य तितक्या लवकर यावा यासाठी ! बेछूटपणे, स्वैर व अमर्याद अतिरेक करून गडकऱ्यांनी आपल्या हातानीच मरण ओढवून घेतले असें म्हटल्यास त्यात काहीहि चूक होणार नाही. इग्रजींत जिला desparation म्हणतात तशीच गडकऱ्याची वृत्ति झालेली होती यात शंका नाही. 'सर्वस्वाच्या सत्यानाशा'ची भाषा ते नेहमी बोलतात यातील मर्महि हेंच होय. सर्वस्वाचा सत्यानाश आणि मरण याचा त्याना जणु ध्यास लागलेला होता.

"I knew I was lost, I had the wild craving to drag all things down with me ....."

असे वैतागाचे उद्गार काढणाऱ्या ( मेटरलिंकच्या मोना व्हॅना या नाटकांतील ) प्रिंझिव्हेलच्या मनःस्थितीप्रमाणेच गडकऱ्याची मनःस्थिति

झाली असली पाहिजे. **शेवटचें प्रेमगीत** ही गडकऱ्यानी आपल्या प्रेम-भावनांची निरवानिरव करण्याच्या उद्देशाने लिहिलेली कविता १ जून १९१६ या तारखेची आहे. यानतर लगेच त्यानी **शेवटची कविता** लिहिली. **राजसंन्यास** नाटकाचा अगदी शेवटचा प्रवेश गडकऱ्यांनी २३ जून१९१६ रोजीं म्हणजे **शेवटचे प्रेमगीत** लिहिल्यानतर जेमतेम तीन आठवड्यातच लिहिला. हा शेवटचा प्रवेश गडकऱ्यानी प्रथम लिहिला, नंतर तीन महिन्यानी पांचव्या अंकातील पहिले चार प्रवेश लिहिले, आणि पहिल्या अकाचा पहिला प्रवेश त्यानी या वर्षाच्या नोव्हेंबरमध्ये लिहिला. **राजसन्यासा**च्या प्रवेशाच्या लेखनाचा हा कालानुक्रम देण्याचें कारण असें की, १९१६ ज्या जूनमध्ये सर्वस्वाचा सत्यानाश व मरण या गोष्टींची आसक्ति गडकऱ्याच्या मनाला ग्रासून टाकीत असतानाच, उद्विग्न मनःस्थितींतच, त्यानी **राजसंन्यासा**चा अगदी शेवटचा प्रवेश प्रथम लिहून टाकला. या प्रवेशातील संभाजीच्या आवेगाने ओतप्रोत भरलेल्या स्वगत भाषणात गडकऱ्याच्या या वेळच्या मनःस्थितीचें प्रतिबिंब अगदी स्पष्टपणें उतरलें आहे. सभाजीचा हा वैताग पाहा—

> " मरणाचा कोणाला अनुभव नाही म्हणून, पण माझी ही स्थिति म्हणजेच मरण असेल का?...विखारलेले मस्तक सुन्न झाल्यामुळें काहीं सुचत नाहीं, आठवत नाहीं, कळत नाहीं !...मराठ्याचा राजा मोऱ्याचा कैदी झाला......मर्दाचा मातीमोल मुडदा झाला, होत्याचे नव्हतें झाले ! आता काय व्हायचे राहिले आहे ? हो, या जित्या मरणाची जाळती जाणीव अजून बाकी आहे ! मेल्या माणसात आणि जीवन्मृतांत एवढी तफावत असते कीं मेलेल्या माणसाला आपण जिवत असूनही मेल्यासारखेच आहोत अशी जहरी जाणीव मुळीच नसते. हे मरण नाहीं, ही, मरणाहून भयाण, अजून कोणाच्याही अनुभवाला आलेली नाही अशी—मरणाऱ्या नंतरची जीवदशा आहे ! मग सर्वस्वाचा विसर पाडणाऱ्या मरणानें माझ्या जीविताचा सुखी शेवट व्हायचा चुकून तसाच राहिला का ? सुखाचें मरण तर नाहींच, पण मरणाचें सुखही या कमनशीबी

संभाजीला पारखें झालें का ? ( मोठ्याने ) क्रूर, कठोर काळा, ये, क्षणभर देवाहून दयाळू होऊन ये आणि माझ्या गळ्यात आपला बाहुपाश घाल ! ”

आपल्या मनातील सारा आवेग, सारा क्षोभ, गडकऱ्यानी राजसंन्यासांतील हा शेवटचा प्रवेश लिहून थोडाफार शमविला, व आपल्या अनावर शोकक्षोभाला वाट करून दिली असें म्हटलें तर तें बरोबरच ठरेल. हा एवढा एकच छोटासा आठपानी प्रवेश लिहून गडकऱ्यानी जवळ जवळ तीन महिने पुन्हा या नाटकाकडे ढुंकून सुद्धा पाहिलें नाही यावरूनहि हा तर्क प्रबळ होतो. काहीहि असलें तरी १९१६ च्या जूनमधील आपली विलक्षण क्षुब्ध मनःस्थिति गडकऱ्यानी संभाजीचें केवळ निमित्त करून आविष्कृत केली आहे यात कोणतीहि शंका नाही.

जुन्या प्रेमास या कवितेंत आपल्या प्रेमकहाणीचा जो दुर्दैवी शेवट गडकऱ्यांनी वर्णिला आहे त्यातील खिन्नता व कारुण्य या गोष्टी मनाला चटका लावून सोडतील अशाच आहेत.

प्रेमाचें ते चरित्र जेव्हा आम्ही चालू केलें,
आम्ही रडलो—जग हसले—परि जे झाले ते झाले !

याच कवितेंतलि ‘ नवीं बंधनें तुला लाभलीं—आणि लाभतिल तशीं मला ’ या ओळींतील पहिल्या भागात प्रेयसीच्या विवाहाचा उल्लेख आहे हें स्पष्ट आहे; ‘ आणि लाभतील तशीं मला ’ या वाक्याने काय सूचित होतें ? यापुढच्या ओळींत व्यावहारिक बुद्धीचा उल्लेख आहे. यावरून गडकऱ्याच्या दुसऱ्या लग्नाचा उल्लेख यात अंतर्भूत असावा हें निश्चित. १९१७ सालीं गडकऱ्यानी दुसरे लग्न केलें. ज्या नव्या बंधनाचा उल्लेख गडकऱ्यानी या कवितेंत केलेला आहे तें नवें बंधन हेंच असेल तर जुन्या प्रेमास ही कविता १९१६ च्या अखेरीस केव्हा तरी गडकऱ्यानी लिहिली असावी असा तर्क करावयास हरकत नाही. नवीन बंधनापासून त्यांना कोणत्या प्रकारचें व किती समाधान प्राप्त झाले व आपलें दुःख ते कितपत विसरूं शकले हें नेमकें कळावयास तूर्त तरी कांही मार्ग नाही.

पण जुन्या स्मृतींमध्ये रममाण होण्याचा त्यांचा स्वभाव अगदी मृत्यूच्या दिवसापर्यंत कायम राहिला असावा हें मात्र अगदी खरे आहे १९१८च्या फेब्रुवारीमध्ये, म्हणजे मृत्यूच्या पूर्वी जेमतेम अकरा महिने, गतकाळातील घटनांच्या स्मृतींमुळे व्याकुळ व बेचैन होऊन त्यांनी दोन कविता लिहिल्या. फणसाचें पान व जुन्या कवितांची आठवण या त्या दोन कविता होत या दोन्ही कवितांमध्ये जवळ जवळ पंधरा वर्षांपूर्वीच्या सुखद घटनांच्या स्मृतीला गडकऱ्यांनी उजळा दिलेला आहे. इतक्या दूरच्या गतकाळात घडलेल्या घटना जणूं नुकत्याच घडलेल्या आहेत असेंच गडकऱ्याना वाटत आहे. गडकऱ्याना पूर्वी घडलेल्या घटना जणू आज, आत्ता डोळ्यासमोर घडत आहेत असा नेहमी भास होत असे. त्याची कल्पनाशक्ति अत्यंत तीव्र असल्यामुळे त्या दूरच्या घटनांतील अगदी बारीक सारीक तपशील सुद्धा त्यांना या दोन कविता लिहीत असता डोळ्यासमोर दिसत असावा असें वाटतें. फणसाचें पान या कवितेत ही शक्ति ( visualization ) अगदी स्पष्ट दिसून येते. पंधरा वर्षांपूर्वी घडलेल्या एका अपूर्ण प्रेमकहाणीचा उल्लेख या दोन कवितात आहे. या दोनहि कविता बोरिवली मुक्कामीं एका आठवड्याच्याच अंतराने गडकऱ्यानी लिहिल्या आहेत. यामुळे एकाच प्रकारची भावना त्यामध्ये प्रकट झाली असल्यास नवल नाही.

> लिहुनि ठेविली पूर्ववयामधिं कथा गोड जी पानीं,
> पुन्हा वाचिली; आणि जाहला सखेद हर्षहि रमणी !

गतकाळातील सुखद घटनांच्या पुनःप्रत्ययातील खेदामिश्रित आनंद ही या दोनहि कवितामधील प्रधान भावना आहे. पूर्ववयातील या अपूर्ण प्रेमकहाणीच्या केवळ स्मृतीने आजहि गडकऱ्यांचें मन मोहरून आले आहे हे लक्षात घेतलें असतां आपल्याला त्याच्या मनःस्थितीची व मनोधर्माची पुष्कळशी कल्पना येईल. या दोनाहि कविताचे विस्तृत व सागोपांग विवेचन मागे ( पृ.१६८–१७१ ) केलेले असल्यामुळे येथे त्याचा नुसता उल्लेख केला तरी पुरें आहे

१९१८ सालीं गडकऱ्यांची प्रकृति खूपच बिघडली व त्यांचें शरीर खंगू लागलें. तथापि शरीराने ते कितीहि विकल झालें असले तरी त्यांच्या

सार्‍या मानसिक शक्ति शेवटपर्यंत अगदी तजेलदार राहिल्या होत्या. शारीरिक दुर्बलतेचा त्याच्या उत्तुंग प्रतिभेवर, त्याच्या तरल कल्पनाशक्तीवर थोडा सुद्धा परिणाम झाला नाही. एकच प्याला या नाटकाच्या चवथ्या व पाचव्या अंकातील सुधाकराचीं भावनोत्कट भाषणे आपल्या आयुष्याचा अत जवळ आला आहे याची जाणीव होऊं लागली असताच गडक-यांनी लिहिलीं असलीं पाहिजेत. त्याच्या ' दुबळया देहात ' तकवा नसला तरी त्याची कल्पनाशक्ति अगदी शेवटपर्यंत रसरसलेली होती, प्रदीप्त होती. याच कल्पनाशक्तीने त्याच्या अंतश्चक्षूसमोर त्याच्या स्वतः-च्या जीवनातील असंख्य घटना जशा घडल्या तशा उभ्या केल्या असतील. याच स्वैर व तरल कल्पनाशक्तीमुळे भारलेलें व उचंबळून आलेलें त्याचें मन कसल्या तरी गूढ धुंदींत गुंग होऊन राहिलें असेल व याच गुंगींतून एकच प्याला या नाटकाच्या चवथ्या अंकाच्या चवथ्या प्रवेशातील सुधाकराची क्षुब्ध आवेगाने व स्वैर कल्पनेने ओतप्रोत भरलेलीं भाषणें निर्माण झालीं असतील. ज्या स्वैर कल्पनेमुळे सुधाकराच्या भाषणात त्यानी इतका उन्मत्त आवेग ओतला तीच कल्पना त्यांच्या भावनाप्रधान मनाला गतकाळांतील घटनांभोवती फेर धरावयास लावीत होती. ज्या व्यथा विसरण्याचा—मदिरेच्या दिव्य भ्रष्टतेचा आधार घेऊनहि विसरण्याचा—त्यांनी आटोकाट प्रयत्न केला त्या प्रेमभगाच्या दारुण व्यथा त्याच्या चित्ताला क्षणभरहि सोडून जावयास तयार नव्हत्या. जें उत्कट प्रेम त्या ' निर्दय ' बालेवर त्यानी एकदा केलें होते, व ज्याने त्याचे सारें जीवन उद्ध्वस्त करून टाकलें होते, त्या प्रेमाची—त्या निस्सीम, उत्कट प्रेमाची—स्मृति थोडीसुद्धा क्षीण झाली नाही, थोडीसुद्धा विकल झाली नाही. बकुळीच्या फुलांप्रमाणें ती सदैव—अगदी मृत्यूपर्यंत—सुवासितच राहिली, तिचा प्रभाव कधीच कमी झाला नाही. आणि शरीर पराकाष्ठेचें दुर्बळ झाल्यावर, मृत्यूच्या पावलांची चाहूल लागल्यावर, निराशेच्या अगदी शेवटच्या क्षणीं, जीविताची आठवण मोहाने फसविण्यास असमर्थ ठरल्यावर, गडकऱ्याच्या थिजत चाललेल्या डोळ्यांत कसली तरी गूढ ' अनाथ आशा ' तरळत राहिली असेल, आणि त्या आशेने सारे मन

भारून टाकलें असता त्यांची स्मरणशक्ति प्रदीप्त झाली असेल, व जीवनाच्या सीमारेषा अंधुक होऊं लागल्या असता अगदी अखेरची, अंतकाळींची याचना, करण्याच्या मोहाने त्याना पुढील कारुण्यपूर्ण आर्त शब्द लिहावयास प्रवृत्त केले असेल. ही गडकऱ्याची अंतकाळची याचना[२७] आहे. अगदी उचंबळून घेऊन ते बोलत आहेत.

प्रार्थितसे एवढे गडे ग ! पाहि जरा मजकडे गडे ग !
मृत्युलोकिंची वसती सरली
जीवन आशा वाटे गेली,
मर्यादेपलिकडे गडे ग !
इहलोका जरि होत पारखा,
तरि भेटीस्तव तुझ्या सारखा,
जीव पहा धडपडे ग !

जिने गडकऱ्याच्या जीवनात काही काळ फुलबाग फुलविला; जिने त्याच्या चित्तवृत्ति मोहरून टाकल्या, साफल्याच्या व समृद्धीच्या सुगधाने दरवळलेला पहाटवारा जिच्यामुळे त्याच्या शरीरावरून थोडा वेळ झुळझुळला, जिच्यामुळे तरळलेल्या कोमल भावनांच्या बरसातीने त्याचे जीवन एक क्षणभर कदंबाप्रमाणें पुलकित झाले, आणि एक क्षणच लकाकून दुसऱ्या क्षणी हरपणाऱ्या अत्यत मोहक पण तितक्याच दाहक विद्युल्लेखेप्रमाणें जी त्याच्या अभागी जीवनाच्या क्षितिजावरून अदृश्य झाली, तिने —त्या निर्दय बालिकेने—त्याना लावलेला चटका इतका अलौकिक होता की, सूर्य मावळून किती तरी वेळ झाला तरी त्याच्या विरून जाणाऱ्या किरणाची ताबूस प्रभा मागे आकाशात रेंगाळत राहावी व तिने साऱ्या जगावर सोनेरी पाखर घालावी त्याप्रमाणें प्रेयसीची स्मृति गडकऱ्याच्या चित्तांत सतत तरळत राहिली व त्या स्मृतीभोवतीच त्याचें विकल मन सतत घोटाळत राहिलें. प्राणज्योतीची अगदी शेवटची तिरीप हरपून जाऊन जीवननाटकाच्या शेवटच्या प्रवेशाचा पडदा सर्रकन् खाली पडण्याच्या क्षणापर्यंत त्यांच्या चित्ताला भारून टाकणारी, त्याच्या साऱ्या जीवनाला पूर्णपणे व्यापून टाकणारी ती स्मृति कधींच

विलीन झाली नाही; आणि भोवताली नैराश्याच्या व औदासीन्याच्या घनदाट छाया दाटल्या असल्या तरी काळोखात दूर कोठे तरी लुकलुकणाऱ्या दीपकळीप्रमाणें ती स्मृति त्यांच्या पोळलेल्या हृदयाला दिलासा देत होती, दूर आकाशांत लखलखणाऱ्या तारकेप्रमाणें ती त्याचे जीवन किंचित् उजळ करीत होती. अनेक प्रकारच्या व्यावहारिक अपयशामुळे ज्यांच्या जीवनावर अपूर्णतेचे दाट धुके सतत पसरलेलें होतें, शारीरिक दुबळेपणाची तमा न बाळगता कल्पनेच्या काव्यानदात स्वैर भरारी मारणारे ज्याचें प्रतिभाशाली मन अनेक व्यथाशीं झगडून अक्षरशः पिचून गेलें होतें— छिन्नविच्छिन्न झालें होते, अमर्याद इच्छा उराशीं बाळगून त्याची निराशा झाल्यामुळे खचत जाणें व पुन्हा वेड्यासारख्या आशा बाळगून कल्पनेच्या साहाय्याने गहिरीं व मोहक इच्छाचित्रें रंगविणें हाच ज्याच्या जीवनाचा स्थायीभाव झालेला होता, प्रेमाच्या विलोभनीय परतु फसव्या काचनमृगामागे स्वैरपणें धावून व शेवटीं खिन्न होऊन थकल्याभागलेल्या ज्याच्या मनाला समाधान देण्यासाठी केवळ मदिरेची भ्रष्ट दिव्यता हेच एकमेवसाधन उरले होते—त्या गडकऱ्याच्या दुर्दैवी प्रेमकहाणीवर पडदा पडला त्याच वेळीं त्याच्या जीवनाचे भरतवाक्यहि अगदी जवळ येऊन ठेपलेलें होतें. आपल्या आयुष्याची ही अखेरची घटका आहे याची कटु जाणीव गडकऱ्याच्या मनात तीक्ष्ण शल्याप्रमाणें रुतलेली होती. या शल्याची वेदना केव्हा तरी असह्य झाली असेल, मृत्यूच्या आगमनाची ललकारी त्यांनी मनाचे कान करून ऐकली असेल, आणि या भीषण जाणिवेने एकदम खचलेल्या त्याच्या मनाचा हुंकार बाहेर पडण्यासाठी धडपडूं लागला असेल मृत्यूच्या पूर्वीं फक्त दहा महिने त्याच्या उचंबळून आलेल्या हृदयाचा अत्यत आर्त व करुण हुंकार **माझा मृत्युलेख** या चारच ओळींच्या छोट्या कवनात घुमत राहिलेला आहे.

> यावज्जीवहि ' काय मी ' न कळलें आप्ताप्रती नीटसे,
> मित्रातेंहि कळे न गूढ—न कळे माझे मलाही तसें,
> अज्ञाता ! मरणोत्तर प्रकट ते होईल नूतें कसे ?
> कोठे आणि कधीतरी जगतिं मी होऊन गेलो असे !

जीवनाचें ते सोनेरी स्वप्न पाहावयास सापडावें यासाठी गडकऱ्यांचा जीव गोळा झालेला होता. तें सोनेरी स्वप्न सुरू होतें न होतें तोंच क्रूर कृतान्ताने त्यांत व्यत्यय आणला. भोवतालच्या भ्याण काळोखांत कल्पनेचीं असख्य भुतें भेडसावूं लागलीं, जागृती हा शाप ठरला, किंबहुना जगणें हाच शाप ठरला. क्षणभर उमललेल्या कळ्या पायदळीं पडून चुरडून गेल्या, थोडा वेळ अवखळणें वाहणारा निर्झर वाळवंटात गुप्त झाला, वसंताच्या आगमनाने मोहराचे तुरे ज्याच्या फांदीफांदीवर झुलूं लागले होते अशा आम्रवृक्षावर अवचित वीज कोसळली व तो उन्मळून खाली पडला. गडकऱ्यांच्या जीवनाचें नाटक हें एक ' भीषणनाट्य ' ठरलें. त्या नाटकाच्या भरतवाक्यात करुण, रौद्र व भयानक हेच रस एकमेकात गुरफटले आहेत. ' प्रेमसौख्याच्या भर बहारींत, ' प्रेमाच्या निशेंत गुंगलेल्या स्थितींत मरण आलें तरच ते खरे भाग्याचें हे कालिंदीच्या तोंडून वदविलेलें मरणाचें मोहक स्वप्न गडकऱ्यांच्या जीवनांत साकार व्हावयाचें नव्हते. असख्य यातनानी खचून भरलेल्या दुर्दैवी जीवनावर अखेरचा पडदा टाकून त्या यातना संपविणारा एक हितकर्ता याच दृष्टीने त्यांनी मत्यूच्या उग्र चित्राकडे केविलवाण्या आशेने पाहिलें असेल. आणि अखेर मृत्यूने त्याच्या चित्ताची भित्री धडपड कायमची बंद केली, आणि यातनानी काळवडलेल्या एका अभागी जीवनावर जाड पडदा टाकला. या पडद्याआड झाकून गेलेले गडकऱ्यांचें जीवन म्हणजे अमर्याद निराशा, चुरडून गेलेल्या कोमल भावना, आवरून धरलेले अश्रु, कठोरपणें मारलेले मन, प्रेमपूर्तीच्या फसव्या आशा, आणि प्रेमभंगाच्या असह्य वेदना ! या प्रकारचे जीवन हीच ज्याची इहलोकींची देणगी त्याला आपला मृत्युलेख इतक्या केविलवाणेपणाने लिहावा लागला यांत काही नवल नाही. आपल्या प्रतिभेने व कल्पनाविलासाने मराठी रंगभूमीवर ज्याने वैभवाची व समृद्धीची बरसात केली, व आपल्या अवखळ विनोदाने ज्याने हजारो लोकांची हसून मुरकुडी वळविली त्या थोर कवीला

अज्ञाता ! मरणोत्तर प्रकट तें होईल तूतें कसे ?<br>
कोठें आणि कधींतरी जगातें मी होऊन गेलो असे !

असें आपल्या जीवनाचें सार वर्णन करण्याची पाळी यावी याशिवाय दैवदुर्विलास दुसरा कोणता असूं शकेल ? गडकऱ्यांच्या या मृत्युलेखातील कारुण्य व आर्तता या गोष्टी काळजाला भेदून जातात आणि मला कीट्सच्या एंडिमियनमधील पुढील आर्त ओळींची आठवण होते.

I have clung
To nothing, lov'd a nothing, nothing seen
Or felt but a great dream! O I have been
Presumptuous against love, against the sky,
Against all elements, against the tie
Of mortals each to each, against the blooms
Of flowers, rush of rivers and the tombs
Of heroes gone! Against his proper glory
Has my own soul conspired. so my story
Will I to children utter, and repent.
There never lived a mortal man, who bent
His appetite beyond his natural sphere,
But starv'd and died.[२८]

जीवनांतील साऱ्या स्पृहणीय गोष्टींची लालसा ज्या वेळीं मनाला भुरळ घालूं शकत नाही त्या आयुष्यातील अखेरच्या घटकेला, जिने आपल्या उत्कट प्रेमाची अवहेलना केली व दारुण वंचना केली तिच्याच स्मृति मनात उचंबळून आल्यामुळे गडकऱ्यानी आपल्या साऱ्या चित्तवृत्तींचा त्या स्मृतींत लय करून टाकला आणि या तल्लीनतेच्या प्रकर्षाच्या क्षणीं तिचीच त्यानी केविलवाणेपणाने याचना केली.

मृत्युलोकिंची वसती सरली
जीवनआशा वाटे गेली
मर्यादेपलिकडे गडे ग !
इहलोका जरि होत पारखा,
तरि भेटीस्तव तुझ्या सारखा,
जवि पहा, धडपडे ग !

---

# १५. भरतवाक्य

Tir d with all these, for restful death I cry,—

– *Shakespeare*

गडकऱ्यांच्या करुणासंकुल जीवनावर काळाचा पडदा पडूनहि बत्तीस वर्षे लोटलीं. समुद्राच्या किनाऱ्यावर पायाखालून वाळूचे कण झरझर निघून जातात त्याप्रमाणें दिवसहि पाहतां पाहतां निघून जातात.

हाय काय परि आता त्याचे ?

या भास्करराव तांब्यांच्या उक्तींत व्यक्त झालेलें पर्युत्सुकत्व प्रत्येक भावनावश मनाला व्यथित करीत असलें आणि—

निर्मल दवकण जैसे गेले धरिता धरितां ते उडुनी

या विचाराने आपण कष्टी होत असलो तरी गडकऱ्यांनी कवि व नाटककार या दृष्टींनी मिळविलेलें यश या काळांत प्रतिपदेच्या चंद्राप्रमाणें वाढतच गेलेलें दिसून येईल.

—आणि जीविता लाभ हाच का तुझ्या संगतीं राहुनियां
असेच जाणे असे सदा का कालौघावर वाहुनिया ?

असा अत्यंत करुण प्रश्न केविलवाणेपणाने विचारणाऱ्या गडकऱ्यांना 'कोठें आणि कधींतरी जगतिं मी होऊन गेलों असें' हें आपल्या

जीवनाचें सार सांगण्याची पाळी आली तरी काळाच्या पडद्यांत ते अंतर्धान पावल्यावर त्यांच्या जीवनाचे मर्म 'अज्ञाता'ला सुद्धा प्रकट झालें आणि त्याना वाटत असलेली भीति खोटी ठरली.

गडकरी केशवसुतांच्या परंपरेत वागले असले, त्या परंपरेचा त्यांना विलक्षण अभिमान वाटत असला, व त्या अभिमानाच्या पोटीं ती परंपरा अविच्छिन्न राहावी म्हणून केशवसुताच्या धर्तीवर त्यानीं कांही कवनें लिहिलीं असलीं, व नाटकातहि काही ठिकाणीं केशवसुताचे विचार स्पष्टपणे बोलून दाखविले असले तरी काव्याचें स्वरूप, काव्याचे ध्येय, काव्याचें प्रयोजन, या बाबतींत त्यांचे केशवसुतांशीं जमावयाचें नाही.

> पद्यपंक्तिची तरफ आमुच्या करीं विधीने दिली असे,
> टेकुनि ती जनताशीर्षावरि जग उलथुनिया देउ कसे !

ही केशवसुताची काव्याचें स्वरूप व त्याचें प्रयोजन या बाबतींतील विचारसरणी असली तर कल्पनाविलासाने वाचकाचीं मनें मुग्ध करून सोडणें व आपल्या हृदयात उचबळून आलेल्या मृदु भावनाचें अत्यंत रसरसलेलें, उत्कट आविष्करण करणे हीं गडकऱ्याच्या दृष्टीने काव्याचीं महत्त्वाचीं कार्ये होत.

> नवशब्दाचे घुगुर बाधुनि रसवंती माझी,
> नाचत डोलत करि शिणलेली मने पुन्हा ताजीं.

या हृदयशारदेस या कवितेंतील ओळींतील 'नवशब्दांचे घुंगुर' हे शब्द फार महत्त्वाचे आहेत. अभिनव शब्दाचे पैंजण पायात बांधून आपली कविता रसिकाचीं शिणलेलीं मने प्रफुल्लित करावयाचें कार्य करीत असते असे गडकरी म्हणतात. या शब्दसौंदर्याच्या जोडीला अत्यंत मोहक कल्पनाविलास ही गडकऱ्यांच्या कवनांतील आणखी एक महत्त्वाची गोष्ट आहे.

> शब्दाचा चढविला क्षणोक्षणि फुलता पोशाख . . .
> तुरा शिरावर डुलतो पवनीं तरल कल्पनाचा !

या विश्वाची विजयादशमी या कवितेतील ओळींत आपल्या कल्पनाविलासाचें स्वरूप स्वतः गडकऱ्यांनीच सांगून टाकलें आहे.

तथापि गडकऱ्यांचा काव्यांतील व नाटकांतील कल्पनाविलास कितीहि रमणीय व आकर्षक असला तरी हृदयात उचंबळून आलेल्या उत्कट भावनांचें अत्यंत आर्त व रसरसलेलें आविष्करण करणें हेंच त्यांच्या कवितेचें सर्वांत महत्त्वाचें कार्य होय. आपल्या मनांतील भावनांचीं विविध आंदोलनें प्रकट करणें ही एकच गोष्ट त्याना अभिप्रेत आहे. कल्पनाविलासाचें महत्त्व गडकऱ्यांना वाटत नव्हतें असें नाही, शब्दसौंदर्याचें महत्त्वहि त्यांच्या दृष्टीने अपार होतें. पण शब्दाची नुसती झगमगणारी शोभा म्हणजे खरें काव्य नव्हे, रसरसलेल्या भावना हाच काव्याचा खरा प्राण होय असा आशय काव्याची व्याख्या या कवितेंत त्यांनी प्रकट केला आहे.

शब्दामध्यें, अर्थामध्ये, प्रासामध्ये काव्य नसे,<br>
नानारंगी वस्तूतहि नच सौंदर्याचा लेश वसे.. ..<br>
गोड सुरावट वेळू करिती गाणे त्याला म्हणू नका.<br>
उंची इमला शिल्प दाखविल, शोभा म्हणजे काव्य नव्हे,<br>
काव्य कराया जित्या जिवाचें जातिवंत करणेंच हवे !

या ओळींत उल्लेखिलेलें 'जित्या जिवाचें जातिवंत करणें' म्हणजे उत्कट भावनांची रसरसलेली अनुभूति. आणि हाच गडकऱ्यांच्या दृष्टीने काव्याचा प्राण होय. आणि या उत्कट अनुभूतींचा तितकाच उत्कट आविष्कार करणें हें त्याच्या मतें काव्याचें सर्वांत स्पृहणीय कार्य होय.

आणि गडकऱ्यांनी ज्या कविता लिहिल्या त्याच्यापैकी बहुतेक साऱ्या महत्त्वाच्या कवितांमध्ये त्यानी आपल्या उत्कट भावनांचा अगदी प्रामाणिक आविष्कार केलेला आहे असें दिसून येईल. आणि आधुनिक मराठी काव्यांत गडकऱ्यांचें हें असाधारण वैशिष्ट्य आहे. स्वतःच्या अतृप्त आकांक्षा, वेड्या आशा, इच्छाचित्रें, केवळ स्वप्नसृष्टींतच सफल होऊं शकतील असे ध्यास; निष्प्रेम जीवनाच्या दारुण व्यथा; निष्काम, उदात्त, शुद्ध प्रेमातील पावित्र्य; प्रेमभावनेचा पहिला तरळता साक्षात्कार; आशा-निराशांच्या संदेहांतील गूढरम्य व मनाला बेचैन करणारी हुरहूर; प्रेम-

साफल्याचीं सोनेरी स्वप्नें; त्या साफल्याच्या आशेचा झुळझुळणारा पहाट-वारा, प्रेमपूर्तीच्या परमोच्च क्षणांत साठविलेली उत्कट, अलौकिक आनंदाची परिसीमा व त्या क्षणांतच सुप्त असलेली नैराश्याची तीव्र दाहकता; प्रणयाची दारुण वंचना झाल्यामुळे होणाऱ्या यमयातना, आणि या यातना सहनशक्तीच्या पलीकडे गेल्यानंतर मृत्यूचा लागलेला ध्यास—या साऱ्या सूक्ष्म, विविध भावनाचा गडकऱ्याच्या कवनातून जितका सरस व उत्कट आविष्कार दृष्टीस पडतो तितका दुसऱ्या कोणत्याहि मराठी कवीच्या कवनातून दिसत नाही असें म्हटलें तर त्यात मुळीच अतिशयोक्ति होणार नाही अशी माझी खात्री आहे. आणि गडकऱ्याच्या कवनाचें हेंच अनन्य-साधारण वैशिष्ट्य होय. मानवी जीवनातील सर्व प्रकारच्या नैराश्याचा अर्क गडकऱ्यांच्या कवनात सामावलेला आहे.

आम्ही गाता जे गाणे, ते जगाचे रडगाणें !

किंवा

अमुच्या कवनाचा पूर, भरल्या जिवाचा सूर !

हें एका बालकवीस—या कवितेत गडकऱ्यानी कवींच्या काव्याचें जे स्वरूप वर्णिलें आहे तें त्याच्या स्वतःच्याच कवनाचें स्वरूप आहे. भावनाची आत्यंतिक उत्कटता हा गडकऱ्याचा असाधारण विशेष आहे. 'शुष्क बुद्धिवादा'च्या आहारीं जाऊन मधून मधून तात्त्विक विचाराची विनाकारण उधळपट्टी जरी ते करीत असले, बुद्धिमत्तेचे महत्त्व अतिरिक्त गौरवाने जरी ते मांडीत असले तरी रसरसलेल्या, उत्कट- पराकाष्ठेच्या उत्कट—भावना हेंच त्यांच्या जीवनाचें सार आहे असल्या आत्यंतिक उत्कट भावनाच्या उद्रेकाने अंतर्बाह्य भारून गेलेला, ज्याचें सारें जीवनच भावनामय झालेले आहे, असा दुसरा कवि महाराष्ट्रात तरी आढळणार नाही. त्याचा पिंड भावनामय होता. तथापि व्यवहारात मात्र ते 'मुखवटे' घालून हिंडत असत. विनोदाचे सर्व प्रकार कौशल्याची परिसीमा करून दाखविणारा, व विजेच्या लकाकीप्रमाणें बुद्धीचे डोळे दिपविणाऱ्या कोट्या करण्यांत कमालीचा तरबेज असलेला, आणि खाजगी सभाषणांत आपल्या समयसूचकतेने

व हजरजबाबीपणाने श्रोत्याना चकित करून सोडणारा हा गृहस्थ एकातात खिन्न, नीरस, व ओसाड जीवनांतील असह्य व्यथानी नेहमी कुढत असे; आणि या ओसाड जीवनात मनाला विरंगुळा वाटण्यासारखें कांही आढळलें नाहीं म्हणजे रमणीय इच्छाचित्रें व स्वप्नदृश्यें कल्पनेने निर्माण करून त्याच्या मोहकतेत धुद होऊन जात असे; किंवा आपल्या साऱ्या मदिर स्वप्नाचे, आशेच्या फुलोऱ्याचें, नैराश्याच्या वेदनाचे, कवनाच्या द्वारे आविष्करण करून मनावरले असह्य दडपण कमी करण्याची तीव्र धडपड करीत असे. या तीव्र धडपडीचा, तीव्र मनःक्षोभाचा इतिहास म्हणजे गडकऱ्याचें काव्य! गडकऱ्याची ही उत्कटता—ही ' इटेन्सिटी '— मराठी काव्य च्या क्षेत्रात तरी अपूर्व आहे, व तिचा आविष्कारहि तितकाच अपूर्व आहे या उत्कटतेमुळेच गडकऱ्याच्या कवनातील असख्य वैगुण्ये आपोआप धुक्याप्रमाणे वितळून जातात व तिच्यातील मनोहर सौंदर्य तेवढे सतत डोळ्या समोर तरळत राहतें.

The excellence of every art is its intensity

हें कीट्सचें वचन जर प्रमाण मानले तर गडकऱ्याचीं उत्कट भावनानी ओतप्रोत भरलेलीं गीते हा काव्यकलेचा एक नितान्तरमणीय आविष्कार आहे असे कबूल करावे लागेल. या आत्यातिक उत्कटतेमुळेच त्यानी आपले हृदय अगदी उघडे केले, व त्या हृदयात दूर कोठे तरी दडून राहिलेल्या आशा, त्याला गाजणाऱ्या निराशा, त्याला भुरळ पाडणारे मधुर आभास, त्याच्या व्यथा, आणि त्याच्या आर्त किंकाळ्या, इत्यादि साऱ्या गोष्टी काही एक मागे न ठेवता जशाच्या तशा जगापुढे माडल्या. उत्कटता—प्रत्येक बाबतींत अतिरेकी उत्कटता—हे गडकऱ्याच्या मनोधर्माचे सर्वात महत्वाचें वैशिष्टय आहे. या उत्कटतेमुळेच कोणतीहि गोष्ट अगदी पराकोटीला नेल्याशिवाय त्याच्या मनाचें समाधान कधीहि होत नसे. रूपकाचा विचार मनाला भुरळ पाडू लागला की रूपकांची अक्षरशः पखरण केल्यावाचून त्याना चैन पडत नसे, अनुप्रासाचें वेड डोक्यात शिरलें की त्या बाबतींत अतिरेक झालाच म्हणून समजावें, कल्पनाचित्राच्या धुंदीने मन बेभान झालें म्हणजे उंन्मादक कल्पनाचित्रांची मालिका निर्माण केल्याशिवाय ते कधीहि

राहत नसत. शब्दाच्या विशेषणात सामावलेल्या गाढ्या छटाचें आकर्षण अनावर होऊन ते विशेषणाची खैरात करीत असत, इतकेंच काय पण भीषण व भयानक कल्पना एकदा मनांत तरळूं लागल्या म्हणजे त्या बाबतींत सुद्धा अतिरेक केल्यावाचून त्याना राहवत नसे हें अरुण (दुसरा) कवितेवरून स्पष्ट दिसून येईल. खाजगी जीवनात सुद्धा हाच विलक्षण अतिरेक गडकऱ्यानी प्रत्येक बाबतींत दाखविला. या अतिरेकी स्वभावामुळे संयम ही गोष्टच गडकऱ्याना माहीत नव्हती. अतिरेक—सर्वत्र अतिरेक—हें गडकऱ्याच्या जीवनाचें सार आहे. यामुळे एखाद्या क्षणीं ज्या भावनेने मनाचा पगडा घेतला असेल त्या भावनेंत सर्वस्वीं रगून जाणें व तिचा अत्यंत उत्कट आविष्कार करण्यासाठी धडपडणें हा त्याच्या मनाचा चाळाच होऊन बसलेला होता. कशात तरी गुंगात राहणें ही सर्वाचीच थोडीफार वृत्ति असते. परतु गडकऱ्याच्या ठायीं ही वृत्ति आश्चर्य वाटेल इतक्या परिसीमेला पोचलेली होती. या आतिरिक्त उत्कटतेमुळेच प्रेयसीविषयक प्रेमाची भावना प्रकट करीत असता त्यानी भावनोद्रेकाचे अभूतपूर्व नमुने दाखविले आणि नैराश्याच्या दारुण व्यथेची अनुभूति आल्यावर कटु भावनाचाहि तसलाच विलक्षण उद्रेक त्यानी दाखविला. त्याच्या आशातील उत्कटता जशी लोकविलक्षण, तशीच निराशेतील कटुताहि लोकविलक्षण ! प्रेयसीविषयीं वाटणाऱ्या मृदु भावनाचा लोभसवाणा विलास ज्या उत्कटतेने त्यानी प्रकट केला तीच उत्कटता तिने वंचना केल्यावर तिच्याविषयीं वाटणाऱ्या विलक्षण संतापाच्या आविष्करणातहि दिसून येते. त्याच्या उत्कट इच्छाहि अमर्याद आणि त्याच्या निराश मनाच्या व्यथाहि अमर्याद ! सर्वस्वाच्या सत्यानाशाच्या—मरणाच्या—विचारातहि त्याना जी आसक्ति वाटते तिचाहि उत्कटपणा अक्षरशः कळसाला पोचलेला आहे. मृत्यूविषयीं इतकी उत्कट आसक्ति अन्यत्र दिसावयाची नाही. उत्कटता, उत्कटता,—मृत्यूच्या ध्यासातहि उत्कटता ! या आतिरेकी उत्कटतेने त्याचें जीवन अंतर्बाह्य व्यापून टाकलेलें असल्यामुळेच,

Verse, Fame and Beauty are intense indeed,
But Death is intenser—Death is Life's high meed.

या कीट्सच्या प्रसिद्ध उद्गाराची आठवण करून देणारे उद्‌गार गड-कऱ्यांनीहि काढले. आपल्या कंटकमय, अपेशी, निराश व कारुण्यपूर्ण जीवनाचें भीषणनाट्य डोळे उघडे ठेवून प्राहिल्यावर विरामचिन्हें या कवितेत

> आशा, प्रेम, नवीन वैभव, तशी कीर्तिप्रभा, सद्यश,
> ही एकेक समर्थ आज नसती चित्ता कराया वश !
> सर्वांचा परमोच्च सगम चिर जेथे असे जाहला,
> देवा ! 'पूर्णविराम,' त्या नव पदीं दे शीघ्र आता मला !

अशी याचना करणाऱ्या गडकऱ्यांनी

> अज्ञाता ! मरणोत्तर प्रकट ते होईल तूंते कसे ?
> कोठें आणि कधीतरी जगतिं मी होऊन गेलो असे !

असें आपल्या जीवनाचें भरतवाक्य म्हटलें असल्यास त्यांत नवल तें काय !



## परिशिष्ट

# गडकऱ्यांच्या कवितांचा लेखनकाल किंवा प्रसिद्धिकाल

### खालच्या यादींतील कविता मनोरंजनांत प्रसिद्ध झाल्या होत्या.

| कवितेचें नांव | लेखनकाल | प्रसिद्धिकाल |
|---|---|---|
| अल्लड प्रेमास | १९०९ | |
| गुलाबी कोडें | | सप्टेंबर १९११ |
| मनातली पाल | | मार्च १९१२ |
| पहिलें चुंबन | | एप्रिल १९१२ |
| आंधळ्यांची माळ | | मे १९१२ |
| एखाद्याचें नशीब | | जून १९१२ |
| राजहंस माझा निजला | | जुलै १९१२ |
| वेडा | | ऑगस्ट १९१२ |
| मुरली | | सप्टेंबर १९१२ |
| हृदयशारदेस | | आक्टोबर १९१२ |
| प्रेमपाठ | | नोव्हेंबर १९१२ |
| घुंगुरवाळा | | फेब्रुवारी १९१३ |
| केशवसुत मेले ! | | ऑगस्ट १९१३ |
| चिमुकलीच कविता | | सप्टेंबर १९१३ |
| दसरा | | आक्टोबर १९१३ |
| जगाचें गाणें | | जुलै १९१४ |
| ती कोण ! | | ऑगस्ट १९१४ |
| अरुण ( पहिला ) | | सप्टेंबर १९१४ |
| निद्रागीत | | नोव्हेंबर १९१४ |
| ओसाड आडांतील एकच फूल | | नोव्हेंबर १९१४ |
| पुनर्विकसन | | डिसेंबर १९१४ |
| हालत्या पिंपळपानास | | डिसेंबर १९१४ |
| हा क्षण ! | | जुलै १९१५ |
| मागें पाहणें | ३० जुलै १९१५ | |

| कवितेचें नांव | लेखनकाल | प्रसिद्धिकाल |
|---|---|---|
| फुटकी तपेली | | जुलै १९१५ |
| मनांतली दिवसरात्र | | ऑगस्ट १९१५ |
| गीतविरक्ति | | नोव्हेंबर १९१५ |
| सुभाषित | २५ नोव्हेबर १९१५ | |
| दुर्दर्शन | २ डिसेंबर १९१५ | |
| त्याच तारकेस याचना | २८ डिसेंबर १९१५ | |
| —स | | जानेवारी १९१६ |
| एका जुन्या श्लोकाची आठवण | १२ फेब्रुवारी १९१६ | एप्रिल १९१६ |
| निर्वाणीची विनवणी | २ मार्च १९१६ | |
| हृदयास | ९ मार्च १९१६ | |
| एका शब्दासाठीं विनंती | २४ मार्च १९१६ | |
| प्रेम आणि मरण | | एप्रिल १९१६ |
| परमाणूंचें कार्यमाहात्म्य | ६ एप्रिल १९१६ | |
| कांहीं इंग्रजी कविता वाचून | | मे १९१६ |
| कधीं ? | | जून १९१६ |
| शेवटचें प्रेमगीत | १ जून १९१६ | |
| अंधाला दृष्टिलाभ | २५ सप्टेंबर १९१६ | |
| प्रेमाची प्रामाणिकता | १५ नोव्हेंबर १९१६ | |
| इच्छा, उपभोग व विषय | २२ नोव्हेंबर १९१६ | |
| तीन तरी | १९ एप्रिल १९१७ | |
| फूल ना फुलाची पाकळी | २४ नोव्हेंबर १९१७ | |
| दैवाची निर्दयता | २ जानेवारी १९१८ | |
| फणसाचें पान | १० फेब्रुवारी १९१८ | |
| जुन्या कवितांची आठवण | १६ फेब्रुवारीं १९१८ | |
| माझा मृत्युलेख | १ एप्रिल १९१८ | |

# टीपा

## प्रकरण २ रें

१. तुतारीमंडळ या संस्थेच्या साधार व विस्तृत माहितीसाठी साहित्यांतील संप्रदाय या माझ्या ग्रंथांतील १८९–१९२ हीं पृष्ठे पाहावीं.

२. गोविंदाग्रज, पृ. ५९–६१.

३. प्रेमसंन्यास नाटकाच्या प्रथम प्रयोगाच्या वेळीं त्यांतील न झेपणाऱ्या सामाजिक उदारमतवादामुळे काही प्रेक्षकानी थिएटरमध्ये थोडासा दंगा केला होता असें ऐकिवांत आहे. साहित्यांतील संप्रदाय, २०२–२०६ हीं पृष्ठें पाहावीं.

## प्रकरण ३ रें

१. या ओळी जीवितास—या गडकऱ्यांच्या कवितेंतील आहेत.

## प्रकरण ४ थें

१. कीट्सच्या कवितेंतील काही महत्त्वाचीं कडवीं पुढें दिलीं आहेत.

In a dear-nighted December,
Too happy, happy tree,

Thy branches ne'er remember
Their green felicity:

* * *

Ah! would 'twere so with many
A gentle girl and boy
But were there ever any
Writh'd not at passed joy?

To know the change and feel it,
When there is none to heal it,
Nor numbed sense to steal it,
Was never said in rhyme.

१. सुभाषित या गडकऱ्यांच्या कवितेंतील या ओळी आहेत.

## प्रकरण ५ वें

१. साहित्यांतील संप्रदाय, पृ. ९४

२. गूढरम्यतेच्या विवेचनासाठी साहित्यांतील संप्रदाय, ५२, ५४ व ५५ हीं पृष्ठें पाहावीं.

३. ही कल्पना सगनभाऊच्या कवनांत अनेक ठिकाणीं आलेली आहे. उदा. ' ज्योतिची ज्योत मिळाली क्षणभर बसते जवळी. '

४. गडकऱ्यांच्या या कल्पनेशीं रघुवंशाच्या १४ व्या सर्गांतील ' प्राप्तानि दुःखान्यपि दण्डकेषु संचिन्त्यमानानि सुखान्यभूवन् ' या कल्पनेशीं तुलना करावी.

५. ही ओळ वर्ड्स्वर्थच्या ओड ऑन द इंटिमेशन्स ऑफ् इमॉर्टॅलिटी या प्रसिद्ध कवितेंतील आहे.

# प्रकरण ६ वें

१. 'फिगरेटिव्ह इमेजरी' च्या उदाहरणीसाठा 'That time of year' या ओळीने सुरू होणारें शेक्स्पियरचें ७३ वें सुनीत पाहावें; आणि 'लिटरल इमेजरी' साठी त्याच्याच लव्ह्ज लेबर लॉस्ट या नाटकांतील अगदी शेवटच्या 'सॉग' मधील 'When icicles hang' हें तिसरें कडवें पाहावें.

२. 'विद्वन्मानसहंस......' इत्यादि संस्कृत श्लोकांतील रूपकाची गडकऱ्यांच्या रूपकाशीं तुलना करावी.

३. श्रीयुत 'भालचंद्र' यांची बिछान्यावरचा अरुण ही कविता—

"उठा ! उठा प्रियकरा ! उठा हा अरुणध्वज फडके !"
"असेल वेडे ! तुझ्या प्रीतिच्या शालूचें फडकें !"
"उठा उठा हा अरुण साच हो !" "असेल वेडे तें
प्रीतिचुंबनीं गालीं आलें लालीचें भरतें !
असेल किंवा शृंगाराची प्रीतीच्या उकळी !
उडी प्रीतिच्या डोहीं घेता वा आली उसळी !
असेल किंवा प्रीतिहृदयीं जो पान्हा गे फुटला !
भक्तिदर्शनीं ! साच तयाचा रंग तसा उठला !
असेल वा जें प्रीतिदेविचें षड्रिपुशीं युद्ध
घोर माजलें, सये ! तयाचा रक्तपात युद्ध !
असेल वा चिरकीर्तीच्या आकांक्षेची होळी
तुझ्या प्रीतिनें केली, तीच्या ज्वाळेची लाली !"
"उठा ! अरुण हा खराखुरा हो !" "वेडे रसकरुण
महाभक्तिचा असेल ! किंवा मृत्यूचें मरण !
किंवा असेल मधुदुःखांचे मधुमधुर स्मरण !
गे प्रीती च्या हृदयाचें वा तें एकीकरण !
लाल छटा तीं त्या एकीकरणाची वर आली
असेल सारी ! अरुण नव्हे तो ! अरुण—छटा कुठली !"
"अरुण साच हो ! पहा चालला रवितेजीं विरुनी!"
"हो !—जाऊं दे ! घेऊं दे मज झोंप सुखें फिरुनी !"

## प्रकरण ७ वें

१. पुण्यप्रभावांतील भूपालाचे पुढील शब्द पाहा—" सुखाच्या प्राप्तीनें इच्छेची तृप्ति होते पण त्या सुखाच्या अक्षयतेसाठीं पुन्हा नवी इच्छा भविष्यत्कालाकडे केविलवाण्या आशेने पाहूं लागते. तृप्तीला इच्छेच्या उत्तरक्रियेचें अमंगल रूप मिळतें ! एका इच्छेच्या मरणांतून दुसरीचें जनन होऊन त्याची परंपरा आजन्म चालूं राहते ! " ( अंक २, प्र. २ )

२. कथाशेष या गडकऱ्यांच्या अप्रकाशित कवितेंतील ( ही कविता गडकऱ्यांच्या पश्चात् १९४४ च्या समीक्षक–गडकरी विशेषांकांत प्रसिद्ध झाली. ) पुढील ओळींत यासारखीच कल्पना आली आहे.

प्रेमकथा ही ऐकायाला नको रिकामा कान,
ज्याची त्याला दसलाखाची मुक्या मनाची तान !

३. या ओळींतील कल्पना वर पहिल्या टीपेंत आलेल्या पुण्यप्रभावांतील कल्पनेशीं अगदीं सदृश आहे.

## प्रकरण ८ वें

१. *The Mystery of Keats*, p. 126

२. *Endymion*, lines 537–540.

३. *Endymion*, lines 617–619

४. 'The deadly feel of solitude' या कीट्सच्या शब्दांची ' किती भेसूर स्तब्धता ही ! ' या भूपालाच्या उद्गाराशीं तुलना करावी. ( पुण्यप्रभाव अंक ३, प्र. १ ).

५. एडगर पोच्या रेव्हन् या कवितेंतील भीषणतेविषयी कॅथारन् गिल्बर्ट म्हणते,–' ...As the main body of the building looms behind in impenetrable darkness, the effect produced is uncanny Reading a poem like *The Raven* we become slightly intoxicated, we feel invaded by a sensuous horror of loneliness and by an unfathomable melancholy"

## प्रकरण ९ वें

१. गोविंदाग्रज, पृ. १०५

## प्रकरण १० वें

*Shakespeare Criticism* (World's Classics), pp.18-19

२ *Shakespeare Survey*, p 23

३. जयंताच्या या उद्गारांतील कल्पनेची पुण्यप्रभावाच्या ४ थ्या अंकाच्या ५ व्या प्रवेशांत कालिंदीच्या तोंडीं जें गाणें आहे त्यांतील पुढील ओळींत पुनरुक्ति आढळेल.

जीवाच्या जळत्या ज्योती
आकाशीं तारा होती !

४ *Ode on the Intimations of Immortality*

## प्रकरण ११ वें

१. गोविंदाग्रज, पृ. ८२

२ गडकरी ( व्यक्ति व वाङ्मय ), पृ. ९

३. *William Shakespeare*, p. 278

४ *The Erotic Motive in Literature* या आल्बर्ट मॉडेलच्या पुस्तकांतील पृ. १२३ वरील विवेचन यासाठी वाचावें.

५. *Monna Vanna, Act II*

६. *Ibid*

७. चिमुकलीच कविता या कवितेंतील पुढील ओळी पाहा.

हात जोडुनी, विमले बाले ! मागितले काय ?
स्फूर्तिनेच कीं पावित्र्याच्या नत झाला काय !
जें पावन, जे विशुद्ध, त्याची तूं मंगलमूर्ति .. ..
तुझ्या मनींचा विमल भाव हा कळता तया क्षणीं
दगडाचा देवही वाकविल देह तुझ्या चरणीं !

## प्रकरण १२ वें

१. या ओळींतील कल्पना शब्दशः कृष्णाकांठीं कुंडल या कवितेंतील पुढील ओळींत आलेली आहे.

घारीनें झडपिला हासिचा बघता बघता हार,
पुढतीं केला हात जरा तो विरून गेली गार !

२. गोविंदाग्रज, पृ. २७

## प्रकरण १४ वें

१. *The Mystery of Keats, P. 62*

२. *Early Victorian Novelists* (*Pelican*) *P 89*

३. उत्तररामचरित, अंक १

४. *William Shakespeare, P. 680*

५. मायकेलॅंजेलोच्या लेखनांत व शेक्स्पियरच्या सुनीतांत 'प्लेटॉनिक लव्हची' जी वैशिष्ट्यें दिसून येतात त्यांची विस्तृत चर्चा जॉर्ज विंडहॅम याने आपल्या *Essays in Romantic Literature* या ग्रंथात केली आहे. सदर ग्रंथाची ३५७–३६८ हीं पृष्ठें यासाठीं पाहावीं.

६. *Shelley the Man and the Poet, P. 24*

७ *Ibid, P. 25*

८. *The Erotic Motive in Literature, P 111.*

९ *The Mystery of Keats, P 22.*

१०. वाग्वैजयंतीच्या १९३९ सालीं प्रसिद्ध झालेल्या चवथ्या आवृत्तींत या कवितेची शेवटची ओळ 'जाळि निराशा स्वर दाहीं' अशी आहे. परंतु अर्थदृष्ट्या ही ओळ स्वीकार्य न वाटल्यामुळे मनोरंजनाच्या ज्या अंकात ही कविता प्रथम प्रसिद्ध झाली तो अंक (नोव्हेंबर १९१५) मीं पाहिला. त्यांत 'स्वर दाहीं' या शब्दाऐवजीं 'खर दाहीं' असे शब्द आढळले, व तेच स्वीकारणें मला प्रशस्त वाटलें.

११. गोविंदाग्रज, पृ. २७

१२. कित्ता, पृ. २७

१३. डॉ. हर्षे यांचा जो उतारा येथे उद्धृत केलेला आहे त्यात 'चुम्बन दे रमणी' हे शब्द अवतरणचिह्नांत आहेत. यावरून गडकऱ्यांच्या कवितेंत असेच शब्द मुळांत असले पाहिजेत अशी कोणाचीहि समजूत होणें शक्य आहे. पण मूळ कवितेंत 'अधरसुधा दे रमणी' असे शब्द आहेत!

१४. *Antony and Cleopatra, Act III, Scene IX*

१५. पुरन्ध्रीणा प्रज्ञा पुरुषगुणाविज्ञानमुखी। या मुद्राराक्षस नाटकांतील ओळींत हीच कल्पना आहे.

१६. गोविंदाग्रज, पृ. ९५–९६

१७. "And I hated you because of this love of mine" या मोना व्हॅना या नाटकांतील प्रिंझिव्हेलच्या उद्गारांतहि हेंच मर्म नाही काय ?

१८ *Troilus and Cressida, Act III, Scene II, line 163*

१९. *Ibid, Act V, Scene II, line 177*

२०. १५१ वें सॉनेट

२१. *The Mystery of Keats, P. 55*

२२ *Ibid, pp 41–42.*

२३ *Troilus and Cressida, Act III, Scene II, line 87*

२४. या ओळीशीं भयाण एकान्त या कवितेंतील पुढील ओळींची तुलना करावी.

> पूर्वी जंग अतरता हृदयीं काहिंतरीं होते,
> परि या कालीं तू त्यजिना मग काय तिथें उरते ?

२५. गोविंदाग्रज, पृ. ८४

२६. गडकरी ( व्यक्ति व वाङ्मय ), पृ. ८१–८२

२७. समीक्षक, गडकरी विशेषांकांत ( फेब्रुवारी १९४४ ) ही कविता प्रथम प्रसिद्ध झाली.

२८ *Endymion, Book IV, lines 636–64.*

# सूचि

[ टीप—गडकऱ्यांच्या कवितांचीं व नाटकांचीं नांवें जाड टाइपांत छापलीं आहेत. ]

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २२ | १४ | ओळाची | ओळींची |
| २५ | २७ | गोडवनांतील | गोडवनांतील |
| ३१ | १२ | उळूकन | उकलून |
| ४५ | १ | ाअहेत. | आहेत. |
| ५८ | १ | बरतीं | वरतीं |
| ५८ | १ | राहा | राही |
| ५८ | ९ | ानजली | निजली |
| ६८ | ६ | पोटींच गोष्ट | पोटींच ही गोष्ट |
| ७४ | १ | स्मृतिगीत | स्मृतिगीत, |
| ७५ | २२ | तीन तरी | तीन तरी, |
| ७६ | ४ | आल्या तर | आल्या माहीत तर |
| ७६ | १४ | गडकऱ्यांमी | गडकऱ्यांनी |
| ७६ | १६ | शालेला | झालेला |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ८२ | २२ | शेलीचें | शैलीचें |
| ९१ | २३ | वार्टेत | वाटतें |
| ९२ | ११ | होतील | होतील, |
| ९२ | १६ | अविष्कृत | आविष्कृत |
| ९४ | ८ | विषणता | विषण्णता |
| १०० | ४ | होइल | होईल |
| १०३ | ११ | वाठत | वाटत |
| १०५ | पृष्ठशीर्षक | इच्छ | इच्छा |
| १०५ | १६ | नाशिबीं | नशिबीं |
| १०७ | २ | सोबता | सोबती |
| १०७ | ५ | विंश्वात | विश्वात |
| १०७ | १७ | सरेळ | सरेल |
| ११० | ११ | ओढीसि | ओढिसि |
| १११ | २७ | निप्प्रेम | निष्प्रेम |
| ११२ | ९ | करुन | करून |
| ११२ | २७ | याठिकाठीं | या ठिकाणीं |
| ११५ | १६ | स्वछंदवादी | स्वच्छंदवादी |
| ११९ | २९ | बडाच्या | घुबडाच्या |
| १२४ | २१ | झाल | झालें |
| १२८ | ६ | एतान्तांत | एकान्तांत |
| १३५ | १२ | अनत | अनत |
| १३७ | ११ | पुण्यप्रमाव | पुण्यप्रभाव |
| १३८ | ८ | आविष्कृ | आविष्कृत |
| १३८ | ९ | भे र | भेसूर |
| १४१ | ५ | भलाच | मलाच |
| १४३ | १३ | वोल | बोल |
| १४३ | १४ | कलगाच | कलगीचें |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १४५ | २२ | होतेय | होते. |
| १५१ | ६ | मोरोझॅफ | मोरोझॉफ |
| १५१ | ७ | हॅम्लट | हॅम्लेट |
| १५३ | १३ | गाराचा | गाराचा |
| १६२ | २८ | क्षितिजाव | क्षितिजावर |
| १७२ | १ | हा कार | हा प्रकार |
| १७५ | ११ | अपेक्षाभग | अपेक्षाभंग |
| १७५ | १४ | आत्यंतिक | आत्यतिक वृत्तीच्या |
| १८० | २ | प्रेसर्यीला | प्रेयसीला |
| १९९ | २८ | सादर्यांच्या | सौंदर्यांच्या |
| २१९ | ७ | जा | जो |
| २२१ | १७ | नस | नसे |
| २२१ | १८ | ह | हें |
| २२३ | २२ | प्रीात | प्रीति |
| २२७ | ३ | गडकऱ्याच्या | गडकऱ्यांच्या |
| २३९ | २२ | आहेत | आहेत. |
| २४४ | १ | जगाचा | जगाची |
| २४४ | १९ | दहभरी | देहभरी |
| २५८ | १९ | आर्हे. | आहे. |
| २५९ | १८ | हलत्या | हालत्या |
| २६० | १३ | भायाची | भाग्याची |
| २६३ | ५ | स्वर दार्ही ! | स्वर दार्ही !१० |
| २६३ | १३ | शर्दनदुर्लभ | दर्शनदुर्लभ |
| २६५ | १२ | गडकरो | गडकरी |
| २६९ | १४ | कवितिचे | कवितेची |
| २७१ | ५ | अनुभवास | अनुभवावयास |
| २७१ | १५ | केघ्हा | केव्हा |

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २७१ | १८ | लपडावांतहि | लपंडावांतहि |
| २७२ | १४ | आत | आर्त |
| २७६ | ६ | प्रकार | प्रकारें |
| २७९ | १९ | गडकऱ्याच्या | गडकऱ्यांच्या |
| २८१ | १२ | हा | ही |
| २८७ | २२ | पराकाष्ठच्या | पराकाष्ठेच्या |
| २८९ | २३ | गिर्भर्त्सना | निर्भर्त्सना |
| २९० | ११ | स्वभावाल पूर्ण | स्वभावाला पूर्ण |
| २९५ | १ | हंस | हंसे |
| ३०८ | २५ | आनं ाच्या | आनंदाच्या |
| ३११ | १९ | जवि | जीव |
| ३१५ | १ | निमाण | निर्माण |
| ३१९ | १० | ह्या | ह्या |
| ३१९ | २५ | सतचे बिल खत | नीरसतेचें चिलखत |
| ३२७ | २० | desparation | desperation |
| ३२९ | १७ | कवितत्तेंलि | कवितेंतील |
| ३३२ | ६ | गड ग ! | गडे ग ! |
| ३३६ | ४ | पायाखालन | पायांखालून |
| ३४५ | १३ | dear-nighted | diear-nighted |
| ३४६ | १८ | कल्पनेशीं | कल्पनेची |
| ३४६ | २१ | आळ...आड | ओळ...ओड |
| ३४७ | २ | उदाहरणीसाठा | उदाहरणासाठी |
| ३४९ | १ | कॅथारन् | कॅथरिन् |
| ३५० | १ | उत्तरामचरित | उत्तररामचरित |
| ३५१ | २३ | विज्ञानमुखी | विज्ञानविमुखी |

---